मुंबई इलाख्यांतील विद्याशाळाखातें.

# शिक्षण आणि अध्यापन.

हा ग्रंथ,

(मिस्तर फौलर यांच्या इंग्लिश ग्रंथाच्या आधारानें)

आबाजी विष्णु काथवटे बी. ए.

(डेक्कन कालेज)

ह्यांनीं रचिला.

आवृत्ति दुसरी.

प्रती १,०००.



मुंबई:

एजेंट्स—डी० व्ही० साधले व कंपनी, काळकादेवी रोड, मुंबई.

सन १८९३ इ०

किंमत १४ आणे.

या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रती बहुतेक खपल्यावर मुंबई इलाख्यांतील विद्याखात्याचे मुख्य अधिकारी मेहरबान **के. एम्. चाटफील्ड** साहेब यांजकडून ही दुसरी आवृत्ति तयार करण्याचा हुकूम झाला.

हा हुकूम झाला ते वेळेस, ज्या पुस्तकावरून प्रथम हें पुस्तक तयार केलें, त्याची नवीन आवृत्ति निघाली होती. त्या आवृत्तींत आणि या हल्लींच्या पुस्तकांत फारसा मेळ नाहीं. परंतु तिजमध्यें कितीएक इतर इंग्रेजी पुस्तकांतील चांगले चांगले उतारे घेतले आहेत; त्यांतून जे बरे उपयोगी वाटले त्यांचे तरजुमे करून यांत घातले आहेत.

**रा. सा. विष्णु बाळकृष्ण सोहनी** यांनीं या आवृत्तीच्या वेळेस ही उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल त्यांचे मजवर उपकार आहेत.

या आवृत्तीच्या शेवटीं, ट्रेनिंगकालेजांतील विद्यार्थ्यांच्या उपयोगासाटीं, त्या कालेजांतील परीक्षांमध्यें आलेले प्रश्न छापले आहेत. त्या प्रश्नांपैकीं सर्व च प्रश्नांचीं उत्तरें या पुस्तकावरून देतां येतील असें नाहीं. तरी पण एकंदरींत शिक्षणावर व अध्यापनावर प्रश्न कसे असतात तें विद्यार्थ्यांस समजावें म्हणून ते या पुस्तकांत दिले आहेत.

या पुस्तकांतील विषयाच्या संबंधानें हल्लीं मराठींत **रा० रा० वासुदेव गणेश सहस्रबुद्धे** यांनीं हर्बर्ट् स्पेन्सर यांचे ग्रंथावरून एक पुस्तक रचिलें आहे तें पाहण्यायोग्य आहे; व शाळापत्रकांत कांहीं निबंध येत असतात ते ही तसे च आहेत.

मेहरबान **कर्कहम** साहेब, एजुकेशनल इन्स्पेक्टर मध्यभाग, यांचे हुकुमावरून, शाळांतील विद्यार्थ्यांचे आरोग्यास हितावह अशा माहितीचे कांहीं कागद ही या पुस्तकास जोडले आहेत.

ता० १६ डिसेंबर
१८९२ इसवी. अमदाबाद.

**आबाजी विष्णु काथवटे.**

मुंबई इलाख्यांतील विद्याखात्याचे अधिकारी मेहेरबान **के. एम्. चाटफील्ड्** साहेब यांचे सूचनेवरून हें पुस्तक तयार केलें आहे. ह्याला आधारभूत ग्रंथ **फाउलर** नांवाचे साहेबांनीं मद्रास इलाख्यांतील शिक्षकांकरितां इंग्रजींत केलेलें पुस्तक होय. त्या पुस्तकांतील सर्व गोष्टी इकडील शाळांस विद्यार्थ्यांस व शिक्षकांस लागू नसल्यामुळें हें पुस्तक तयार करतांना त्यांतील कांहीं कांहीं मजकूर फिरविला आहे; व कांहीं मुळींच नवा ही घातला आहे.

हें पुस्तक तयार झाल्यावर साहेब महसूफ यांनीं तें **रावसाहेब विष्णु बाळकृष्ण सोहनी** यांजकडेस पाहण्याकरितां पाठविलें. त्यांनीं तें जपून साद्यंत वाचिलें आणि तें नीट करण्याकरितां पुष्कळ उपयुक्त सूचना केल्या. ह्या सूचनांपैकीं कितीएक मला मान्य झाल्या नाहींत. त्यामुळें त्या त्या ठिकाणीं मीं जें लिहिलें होतें तें तसें च ठेविलें. याकरितां हल्लीं या पुस्तकांत जे दोष आढळतील त्यांबद्दल कोणते ही प्रकारचा बोल **रावसाहेब** यांजकडे नाहीं. त्यांचा सर्व भार माझा मजवर च आहे. परंतु त्यांनीं फार श्रमानें पुष्कळ ठिकाणीं योग्य शोध घालून माझें लिहिलेलें पुस्तक सुधारलें; याबद्दल मी त्यांचे उपकार मानतों.

**आबाजी विष्णु काथवटे.**

अमदाबाद,

ता. १६ जून सन १८८१ इसवी.

# अनुक्रमणिका.

## उपोद्घात.

पृष्ठें.

पुस्तकाचा उद्देश–शिक्षणविधेविषयीं व्यापक सिद्धांत व नियम सांगणें. ... ... ... ... ... ... ... १

सिद्धांताचें ज्ञान आणि अनुभवावरून बांधलेले तांत्रिक नियम दोन्हीं परस्परांवांचून पंगु. ... ... ... ... ... ३

## शिक्षण.

### आरंभ व साधारण वर्तणूक.

शिक्षकानें आरंभ करतांना फार जपावें. ... ... ... १

शिक्षकानें मुलांवर वजन राखावें. ... ... ... ... २

शिक्षकाचे मनांत ममता आणि थोरपणा असावी. ... ... ,,

किरकोळ गोष्टींची किरकिर करूं नये पण अन्याय पाहिल्यावर मुलाजा करूं नये.... ... ... ... ... ... ३

शिक्षकाची वागणूक व्यवस्थित आणि नियमित पण साधी असावी. ... ... ... ... ... ... ... ,,

विद्यार्थ्यांच्या मनाची आरंभीं च खातरी झाली म्हणजे पंतोजीचें पुढें नीट चालतें याचें उदाहरण. ... ... ... ४

ग्रंथांतील विषयाचे मुख्य दोन भागः—शिक्षण आणि अध्यापन. ५

शाळेंत बंदोबस्त असल्याशिवाय विद्यार्थ्यांस लाभ नाहीं; तरी पंतोजीनें तीव्रपणा करूं नये. ... ... ... ... ,,

पंतोजीची आपल्या कामावर आसक्ति असावी ... ... ८

पंतोजीचें काम वस्तुतः फार थोर आहे; त्याची योग्यता अडाण्यांनीं जाणली नाहीं तरी पंतोजीनें स्वतः ओळखावी ... ९

टिंडाल साहेबांचा या बाबतींत अभिप्राय ... ... ... ,,

ज्याला शिकविण्याची खरी हौस तो च उत्तम पंतोजी होईल. १०

पृष्ठें.

सामान्यपक्ष काम हातून होण्यास देखील त्याजवर चित्त पाहिजे च. ... ... ... ... ... ... ... ११
आर्नोल्ड् साहेबांचें विद्यार्थ्यांवर कसें चित्त असे तो प्रकार. १२
पंतोजीस मुलें कहांत ठेवतां आलीं पाहिजेत... ... ... १४
हा गुण संपादन करतां येण्यासारखा आहे. ... ... ... १६
त्याचीं साधनें उमेद, निरीक्षण, अनुसंधान, उन्नयन, दृढपणा. ,,

## मुलें कहांत ठेवण्याकरितां पाळावयाचे नियम.

पुरता विचार करून हुकूम द्यावा. ... ... ... ... २३
जो हुकूम तोडला असतां पारिपत्य करावयाचें नाहीं असा हुकूम देऊं नये. ... ... ... ... ... ... २८
दिलेला हुकूम विसरूं नये ... ... ... ... ... २९
शाळेंतील बंदोबस्ताकरितां सूचना एके इंग्रेजी ग्रंथावरून. ... ३४

## शिक्षा.

शिक्षा अवश्य आहे. थोडे लोकांस शिक्षा केल्यानें सर्वांची वागणूक सुधारते—उदाहरण. ... ... ... ... ३७
मुलांस चांगली ओळ लावण्यांत केवळ शिक्षेवर भिस्त ठेवूं नये. ३९
अपराध करण्याची इच्छा च विद्यार्थ्यांचे पोटांतून निघाली पाहिजे. ... ... ... ... ... ... ... ,,
आर्नोल्ड्, कोल्रिज् आणि जान्सन् यांचे शिक्षेविषयीं अभिप्राय. ... ... ... ... ... ... ... ४१
शिक्षेचे उपयोग दोन. १ अपराध करणारास दंड घडावा; २ अपराध पुनः होऊं नये.... ... ... ... ... ४५

## शिक्षेचे प्रकार.

वर्गांत खालीं बसविणें. ... ... ... ... ... ४८
धडा शिकावयास बसूं न देणें. ... ... ... ... ५०
कांहीं दिवस शाळेंत येऊं न देणें. ... ... ... ... ५१
शाळेंतून घालवून देणें—ही शिक्षा फार च थोडे वेळ द्यावी. ५२
अधिक लिहावयास अगर पाठ करावयास देणें. ... ... ५३

| | | | |
|---|---|---|---|
| | | | पृष्ठें. |
| रागें भरणें.... | ... ... ... ... ... ... ... | ... | ५५ |
| एकीकडे रागें भरण्याचें फळ. | ... ... ... ... | ... | ५६ |
| शारीरदंड. | ... ... ... ... ... ... ... | ... | ५७ |

## सर्वप्रकारचे शिक्षेबद्दल सामान्य नियम.

| | | | |
|---|---|---|---|
| वय अधिक होईल तशी शिक्षा कमी करावी. | ... ... | ... | ६१ |
| शिक्षा करणें ती मोठे अपराधाबद्दल मात्र करावी. | ... ... | ... | ६४ |
| शिक्षा करण्यांत खासगी संबंध ठेवूं नये. | ... ... ... | ... | ६५ |
| शिक्षेंत धरसोड असूं नये; एक नियम असावा. | ... ... | ... | ७० |
| शिक्षा करणें ती गुण येईपावेतों करावी. | ... ... ... | ... | „ |
| शिक्षा समान असावी.... | ... ... ... ... ... | ... | ७१ |
| शिक्षा केल्यावर मुलांबद्दल मनांत वांकडें ठेवूं नये. शिक्षा केल्यावर ममतेनें उपदेश करावा. त्याबद्दल एक उतारा. | | | ७२ |
| **बक्षीस.** | ... ... ... ... ... ... | ... | ७३ |

## इतर साधनें.

| | | | |
|---|---|---|---|
| पंतोजीची कामावर आस्था असून त्यानें मनापासून शिकविलें म्हणजे त्याला मुलांकडून मेहनत करवितां येते. ... | | ... | ७४ |
| पंतोजीचे आंगीं समयसूचकता, धोरण, आणि निश्चय हीं पाहिजेत. ... | ... ... ... ... ... | ... | ७५ |
| कांहीं माणसें अडचणी असून ही काम नीट चालवितात, आणि कांहीं नसत्या काढतात; पंतोजीनें पहिलें धोरण राखावें. | | | ७६ |
| पंतोजीला मनाच्या वृत्तीचें थोडेंबहुत ज्ञान असावें व त्यानें तें वाढवीत असावें; ह्मणजे काम होतें, व कंटाळा येत नाहीं. | | | ७७ |
| चातुर्यानें काम करून घेण्याचीं उदाहरणें. | ... ... | ... | ७८ |

## शिक्षकाचा विद्यार्थ्यावर अंमल बसण्याचीं कारणें.

| | | | |
|---|---|---|---|
| शिक्षकाचा स्वभाव आणि वागणूक यांवरून उत्पन्न होणारें वर्चस्व.... | ... ... ... ... ... | ... | ८१ |

पृष्ठें.

त्याचा पंतोजी या नात्यानें असतो तो अधिकार. ... ... ८४
विद्यार्थ्यांच्या मनोवृत्ति. ... ... ... ... ... ८५
**विद्यार्थ्यांच्या आंगचे शिक्षकास उपयोगी गुण.**
१ ज्ञानसंपादन करण्याची इच्छा.... ... ... ... ८६
२ निरुद्योगी बसण्याचा कंटाळा.... ... ... ... ८८
३ कोणती ही अडचण दूर केल्यापासून होणारें समाधान. ,,
४ कोणतें ही काम चांगल्या रीतीनें करण्याची हौस. ... ८९
५ थोरपणची आपली तरतूद नीट ठेवण्याची इच्छा. ... ९२
६ प्रशंसेची आवड.... ... ... ... ... ... ९४
७ बढतीची हौस. ... ... ... ... ... ... ९५
सारांश ह्मटून चित्त लावून काम करणारे भारदस्त पंतोजीस शारीरशिक्षेवर भिस्त न ठेवतां बंदोबस्त ठेवतां येईल. ... ९६

---

# अध्यापन.

## अध्यापनाचें खरें स्वरूप.

अध्यापन म्हणजे शिष्याला काम करण्यास लायख करणें. ... ९७
अध्यापन ह्मणजे शिष्याच्या मनाची रचना करणें. ... ... ,,
अध्यापन म्हणजे कितीएक गोष्टी नकळत बराबर करण्याची शिस्त लावणें. ... ... ... ... ... ... ९८
अध्यापन ह्मणजे विद्यार्थ्यांचे हातून शिकणें खास होत आहे अशी योजना करणें... ... ... ... ... ... ९९
**व्याख्यानपद्धति, प्रश्नपद्धति, व संयुक्तपद्धति.** ,,
**उत्तम अध्यापनास साधनीभूत तीन गुण.**
**१ मुलास समजे अशा रीतीनें विषय सोपा करतां येणें.** ... ... ... ... ... ... १०४
त्याचीं उदाहरणें. ... ... ... ... ... ... १०५
शिक्षकास विषय पूर्णपणें येणें अवश्य आहे. ... ... १०८
शिक्षकानें वाचतांना आपलें कामाकडे चित्त ठेवावें. ... १०९

पृष्ठें.

शिक्षणपद्धति आणि विषयज्ञान यांचा संबंध. ... ... ११०
विषयांचे भाग करतां येणें.... ... ... ... ... ११२
मुलांचें मन बरोबर ओळखणें. ... ... ... ... ११३

## २ विषय सुलभ केल्यानंतर तो युक्तीनें वर्गास शिकविणें.

विद्यार्थ्यांचें सरासरी बरोबर असलेलें उत्तर सुधारावें... ... ११७
उत्तर अशुद्ध कां तें सांगावें. ... ... ... ... ... ११८
आधीं उत्तर योजून ठेवून दुराग्रह करूं नये. ... ... ... ११९
विद्यार्थ्यास स्वतः विचार व श्रम करण्याची संवय लावावी... १२०
या बाबतींत **आर्नोल्ड्** साहेबांचे मतासंबंधें उतारा. ... ... १२१
विद्यार्थ्यानें उत्तर देण्याबराबर तें खरें किंवा खोटें हें शिक्षकास जलद आणि खास समजलें पाहिजे. ... ... ... १२३
एका मुलाला प्रश्न विचारल्यावर दुसऱ्याला जलदीनें विचारावा. १२४
संज्ञा फार उपयोगी आहेत. ... ... ... ... ... ,,
या बाबतींत स्कॉटलंडांतील एका शाळेंतील कामाचें वर्णन.... १२५
पाठ सारखा चालवावा; त्यांत खंड पडूं देऊं नये. ... ... १२८
प्रश्न आधीं विचारावा मग उत्तर कोणाकडून यावें तें सांगावें. १२८
प्रश्न फार सोपे नसावे, फार अवघड नसावे; मुलांच्या योग्यतेप्रमाणें असावे. ... ... ... ... ... ... १२९
अर्थ सांगावयाचा तो मुळापेक्षां सोपा असावा. ... ... १३०
बहुतकरून शिकविणें तें प्रश्नद्वारा शिकवावें.... ... ... ,,
उत्तरें वाक्यरचनेच्या संबंधानें पुरीं असावीं.... ... ... १३२
प्रश्नपद्धतीसंबंधें उतारा. ... ... ... ... १३३
तिजविषयीं व व्याख्यानपद्धतीविषयीं विचार. ... १३४
शिकविणें आणि परीक्षा घेणें या गोष्टी पृथक् आहेत. ... १३६
गणितांतील उदाहरण.... ... ... ... ... १३७
भूगोलांतील उदाहरण.... ... ... ... ... १३९
शिकविण्याच्या आणि परीक्षेच्या प्रश्नांतील अंतर ... १४१

पृष्ठें.

सर्व पाठांची पूर्वी यत्न करून तयारी केली पाहिजे.... ... १४१
विद्यार्थ्यांचे उत्तरांतील चुकी ओळखून त्याची खातरी करून देणें शिक्षकाला आलें पाहिजे. ... ... ... ... १४३
प्रत्येक शिक्षकानें आवाज चांगला ठेवावा आणि चांगलें वाचण्याचा व बोलण्याचा अभ्यास करावा. ... ... ... १४४
उदाहरण. ... ... ... ... ... ... ... १४५
उत्तर निश्चित आणि प्रश्नास जुळेल असें देण्याचा विद्यार्थ्यास अभ्यास असावा. ... ... ... ... ... ... १४८
शिकवितांना द्यावयाचीं उदाहरणें मुलांच्या माहितींतलीं असावीं. ... ... ... ... ... ... ... १५१
कोणती ही गोष्ट स्वतःला येणें आणि शिकवितां येणें यांत अंतर आहे. ... ... ... ... ... ... ... १५३
प्रथम विशेष उदाहरण सांगून मग सामान्य नियम सांगावा.... १५४
शिकवितांना सोप्या भाषेनें बोलावें. ... ... ... ... १५५
अमुक पदार्थाच्या बोधाकरितां विशेष शब्दाचें कारण आहे असें सांगून मग नवीन शब्द सांगावा. ... ... ... ... १५७
भाषा सरळ आणि स्पष्ट असली ह्मणजे शिक्षकाचा आशय नीट समजतो. ... ... ... ... ... ... १५८
शिक्षकाला वर्ग चांगला वागवितां आला पाहिजे. ... ... १५९

## पाठ चालविण्याकरितां सूचना.

१ आपण शिकवितों तें सगळ्या वर्गाकरितां आहे हें ध्यानांत ठेवावें. ... ... ... ... ... ... १६२
२ वर्ग शिकवीत असतांना बाहेर जाऊं नये, किंवा दुसरें काम करण्याचें मनांत आणूं नये. ... ... ... ,,
३ बहुतेक प्रश्न निर्बुद्ध मुलांस विचारावे. ... ... १६३
४, ५ स्पष्ट जोरानें आणि हुशारीनें बोलावें; परंतु ओरडूं नये, किंवा घाईनें ही बोलूं नये; मुलास ताकीद करणें ती स्पष्ट आणि सर्वांस सारखी करावी.... ... ... १६४

पृष्ठें.

६ फळ्यावर लिहून अगर काढून दाखवितां येईल तें फळ्यावर च दाखवावें. ... ... ... ... ... ... १६४
७ वर्गांत आपण इकडे तिकडे फिरूं नये. आणि जाग्यावरून मुलांना उठूं देऊं नये. ... ... ... ... ... १६७
८ बोलण्यांत खोड असूं नये... ... ... ... ... ,,
**प्रश्नद्वारा शिकविण्यासंबंधें उतारा.... ... ... १६८**
**३ विद्यार्थ्यांचें मन आकर्षण करून घेणें व त्याची बुद्धि प्रौढ दशेस आणणें. ... ... ... ... १७३**

## शाळेंत नित्य आणि नेमल्या वेळीं येणें.

या संवयीचें महत्त्व. ... ... ... ... ... ... १७४
नेमलेल्या वेळीं शाळेंत न येण्यापासून तोटे. ... ... ... १७५
या बाबतींत जुने चालीच्या लोकांचा व युरोपियन लोकांचा कित्ता घ्यावा. ... ... ... ... ... ... १७६

## मुलांनीं नित्य शाळेंत यावें या करितां ध्यानांत ठेवावयाचे नियम.

शाळेचे कामावर मुलांचें मन लागेसें करावें. ... ... ... १७७
आपल्या शिकविण्यापासून उपयोग आहे, अशी लोकांची खातरी करावी... ... ... ... ... ... ... १८०
दरएक मुलाची रोजची हजेरी मांडण्याकरितां हजेरीवही ठेवावी. ... ... ... ... ... ... ... १८१
मुलें गैरहाजर असलीं ह्मणजे त्यांचे घरीं लिहून कळवावें. ... १८३

## मुलांनीं वेळचे वेळेस शाळेंत यावें यासाठीं कांहीं अधिक नियम.

१ पंतोजीनें स्वतः वेळचे वेळीं यावें.... ... ... ... १८४
२ सर्वांनीं येण्याची एक वेळ बांधलेली असावी व त्यापुढें येणारे सर्व उशीरां आले असें समजावें. ... ... ... ... ,,
३ रोजचा पहिला पाठ फार उपयोगी असून मुलांस त्याचा मोठेपणा वाटे असा असावा. ... ... ... ... ,,

पृष्ठें.

४ उशीर होण्याचें कारण लेखी अथवा तोंडजबानी घरच्या माणसांनीं न कळविलें तर मुलांस शिक्षा करावी च... ... १८५
५ गैरहाजिरीचें अगर उशीराचें कारण समजलें असतांही मुलास थोडी शिक्षा करावी च. ... ... ... ... १८५

---

पंतोजी शिकवीत असतां त्याच्या कामाची परीक्षा करण्याबद्दल. ... ... ... ... ... १८७

परिशिष्ट १.

शाळेंत मोकळी हवा व उजेड राहात, अशा तजविजीबद्दल. ... ... ... ... ... ...१– ६

परिशिष्ट २.

पुणे ट्रेनिंग कालेजांतील परीक्षांचे प्रश्नांपैकीं निवडून निवडून प्रश्न. ... ... ... ... ...१–२०

# शिक्षण आणि अध्यापन.

## उपोद्घात.

"दुसऱ्याचे वर्तणुकीस चांगलें वळण लावावयाचें जे मनांत आणतात त्यांनीं स्वतः आपली वागणूक उत्कृष्ट ठेवून त्या कामास आपण योग्य आहों अशी लोकांची खातरी केली पाहिजे."

"सर्व लोकांना आपापल्या धंद्याची चांगली माहिती असणें अवश्य आहे; आणि ज्या मनुष्याला रोज जें काम करावयाचें त्याविषयीं त्यानें चालना केलेली असावी, आणि त्याचे विचार शुद्ध असावे, असा नियम असावा; ही कल्पना योग्य आहे व याप्रमाणें व्यवस्था असणें अशक्य नाहीं."

शाळेची व्यवस्था कशी ठेवावी, मुलांला शिक्षा कशी लावावी, आणि त्यांला कसें शिकवावें ह्याविषयीं कांहीं सामान्य सिद्धांत आहेत; कोणाची शाळा चालविण्याची अथवा विषय शिकविण्याची कशी ही पद्धति असो; जर तिजपासून काम योग्य रीतीनें होत आहे तर ती या सिद्धांतांस अनुसरून असली च पाहिजे. या प्रकारचे व्यापक सिद्धांत संक्षेपानें सांगावे असा उद्देश मनांत धरून या चार ओळी लिहिल्या आहेत. कोणी ही शाळा चालवीत असतां त्याला कांहीं सुचेनासें झालें कीं त्यानें हा ग्रंथ काढून पाहावा म्हणजे त्याला पाहिजे तें ह्यांत हटकून सांपडावें च, अशा हेतूनें हा ग्रंथ लिहिला नाहीं./ असा हेतु असता तर, दरएक विषय कसा शिकवावा, व प्रत्येक शाळा चालविण्याच्या पद्धतीप्रमाणें प्रत्येक प्रसंगीं काय काय केलें पाहिजे, याचा सविस्तर विचार करणें अवश्य होतें; आणि त्यामुळें ग्रंथ विस्तीर्ण झाला असता. या ग्रंथांत, जे सामान्य सिद्धांत ध्यानांत धरल्यानें साधारण बुद्धीच्या मनुष्याला कोणते प्रसंगीं काय करावें हें सुचेल, असे व्यापक सिद्धांत मात्र लिहिले आहेत.

दरएक वेळेस कोणते रीतीनें वागावें, व दरएक वेळेस कोणते प्रकारानें विद्यार्थ्यांस शिकवावें, याविषयीं तपशीलवार नियम सांगण्यापूर्वीं वर जे सामान्य सिद्धांत ह्मणून सांगितले त्यांची पक्की माहिती असणें जरूर आहे. कारण, व्यवहारांत अनंत प्रकारचे प्रसंग येतात. देशांच्या स्थितींचे, मुलांच्या स्वभावांचे व शिक्षकांच्या योग्यतेचे प्रकार अनेक आहेत; त्यांचा नानातऱ्हांनीं मिलाफ होऊन शिक्षकास जे प्रसंग येतात त्यांची गणना करूं लागलें तर अंत लागणार नाहीं. अशा दरएक प्रसंगीं वागावें कसें हें निश्चयपूर्वक सांगणें म्हणजे अनंत विस्तार होईल; इतकें च नव्हे, तर तें काम पूर्णपणें होणें अशक्य आहे. हें कोणाचे ही ध्यानांत तेव्हां च येईल कीं, याकरितां उत्तम उपाय म्हटला म्हणजे मुख्य सिद्धांत प्रथम ठाऊक असावे; आणि नंतर घडेल तितकें दरएक प्रसंगीं काय काय करावें याचे ठरींव नियम ही ध्यानांत ठेवावे. या संबंधानें दुसरी एक गोष्ट मनांत आणण्यासारखी आहे. ती ही. कितीएक लोक व्यापक सिद्धांतांच्या ज्ञानाची हेळणा करितात. ते म्हणतात. "कोणते वेळेस काय करावें याविषयीं ठोकळ नियम मनांत घट्ट करून ठेवले म्हणजे बस आहे. जेथील तेथें नियम लागू केला म्हणजे झालें. खोकल्यावर अमुक औषध, पोट दुखण्यावर अमुक औषध, एवढें ठाऊक असलें म्हणजे झालें. कफ म्हणजे अमुक; अन्न पक्काशयांत असें जातें आणि तेथें त्याचें अमुक होतें, असली शुष्क वाटाघाट काय उपयोगी आहे? मुदलाशीं गांठ घालून अमक्याला अमुक उपाय इतकें तांत्रिक ध्यानांत ठेवलें म्हणजे झालें." असें मानणारे पुरुषांस तंत्रवादी म्हटलें तर चालेल. हे लोक ज्या नियमांना तांत्रिक नियम ह्मणून ह्मणतात त्यांजविषयीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे. "ज्या लोकांना वास्तविक सिद्धांत अवगत आहेत त्यांना ठोकळ नियमांचा फार उपयोग आहे; त्यांजपासून स्मरण ताजें होतें; परंतु सिद्धांतांचे ज्ञानावांचून, केवळ ते नियम च फारसे उपयोगी आहेत असें नाहीं. जसा एखादा दिवा असा असावा कीं रस्त्यानें जाऊं लागलें म्हणजे जोंवर खांचखळगा कांहीं नाहीं तोंवर त्याचा उजेड चक्क

असावा; जरा रस्ता अडचणीचा आला कीं त्याचा उजेड मंद व्हावा; आणि रस्ता अति खडतर आला कीं तो मुळीं च जावा; त्याप्रमाणें ठोकळ नियमांची गोष्ट आहे. थोड्या अडचणीच्या प्रसंगीं त्यांजविषयीं संशय उत्पन्न होतो; आणि फार अवघड प्रसंगीं त्यांचा कांहीं च उपयोग होत नाहीं." ही गोष्ट समजावयास अवघड आहे असें नाहीं. ज्या मनुष्याला एखाद्या व्यथेवर एक दोन ठोकळ औषधें ठाऊक आहेत तो धडधाकड्या मनुष्याला ती व्यथा झाली तर आपलें औषध देऊन बरें करील. पण रोगी अशक्त असला, आणि एक दुखणें बरें करावयास जावें तों दुसरें अधिक व्हावें असें होऊं लागलें, म्हणजे त्याचा उपाय हरतो; मग वैद्याकडे जावें लागतें. तसें च सर्व ठिकाणीं आहे. ज्याला एक दोन कायदे मात्र सरासरी ठाऊक आहेत, तो किरकोळ कामांत कशी तरी वेळ मारून नेतो; परंतु भानगडीचें एखादें काम आलें म्हणजे आतांची वेळ मारून न्यावी म्हणून एखादी तोडजोड काढतो, तिजमुळें भलतें च एखादें नुकसान होतें; यासाठीं शहाणे लोक वेळ पाहून खऱ्या माहितगारांशीं च गांठ घालतात. ह्याकरितां कोणता ही धंदा करावयाचा असला तर प्रथम त्या संबंधी सिद्धांतांचें ज्ञान करून घेऊन नंतर व्यावहारिक नियम शिकावे, म्हणजे त्या नियमांचा सारासार विचार करून प्रसंगानुरूप त्यांची योग्य योजना करतां येते. केवळ गुरूनीं सांगितलें आहे तसें करूं असें म्हणणाराप्रमाणें त्यांचें काम बिघडत नाहीं.

वर सिद्धांतांचा थोरपणा सविस्तर सांगितला खरा, पण त्यांवरून अभ्यास आणि प्रसंगांस उपयोगी नियम, यांची योग्यता कमती आहे असें समजूं नये. कोणीं अंकगणित अथवा बीजगणित यांतील केवळ सिद्धांत शिकून ठेविले, परंतु त्यांवरून उदाहरणें कशीं करावीं हें शिकून स्वतः उदाहरणें केलीं नाहींत, तर त्या मनुष्याचें ज्ञान कच्चें राहील आणि व्यवहारांत त्याचा त्याला कांहीं उपयोग घडणार नाहीं. परंतु, जर शिक्षक योग्य उदाहरणें निवडून विद्यार्थ्यांस सांगेल, तर जीं मूळतत्त्वें आपण शिकलों तीं प्रसंगास कोठें कशीं योजावीं, त्यांच्या साहाय्यानें इष्ट फळ कसें काढावें, हें त्यांस चांगलें समजूं लागेल

आणि ते व्यवहारांत पटाईत होतील. या प्रमाणें च सर्व विद्यांचें आणि कलांचें आहे. शिक्षणविद्येचा ही प्रकार असा च आहे. सिद्धांतांचें, आणि त्यांची व्यवहारांत योजना कशी करावी याचें, ज्ञान आणि दृढ अभ्यास, हीं एकत्र झाल्याखेरीज उत्तम सिद्धि कधीं ही होणार नाहीं.

जगद्विख्यात पंडित **बेकन्** यांनीं या दोन्ही प्रकारचे ज्ञानाचे गुणदोष आपल्या ग्रंथांत वर्णिले आहेत. केवळ सिद्धांतज्ञानवादी यांचा उपहास करून त्यांनीं म्हटलें आहे, "प्रत्यक्ष काम कसें करावें हें ज्यांना समजत नाहीं त्यांनीं लांब लांब बाता झोकल्या आणि दरएक कामाचे विशेष रूपाकडे लक्ष न देतां व्यर्थ भवति न भवति केली म्हणजे वहिवाटीप्रमाणें काम करणारे लोक सहज च त्यांना हंसूं लागतात. पृथ्वीच्या कवठाएवढ्या लहानशा गोलावरून जसें पुण्याहून सातान्यास कसें जावें हें कधीं समजणार नाहीं तसें च पोकळ सिद्धांतांची चर्चा करणारांस प्रत्यक्ष एखादें काम करावयास सांगितलें तर कधीं साधणार नाहीं." त्या च पंडितानें दुसरे ठिकाणीं केवळ ठोकताळ्याचे नियमांवरून काम करणारे लोकांस दोष दिला आहे तो एणेंप्रमाणें:—

"अशिक्षित लोक केवळ वहिवाटीचे जोरानें काम करितात त्यांजपेक्षां विद्वान् लोक थोड्याशा अनुभवानें उत्तम रीतीनें काम करूं लागतात आणि फार दिवस झाले नाहींत तों च त्यांना उलट्या गोष्टी सांगूं लागतात." "कांहीं वैद्य एक दोन गोडगोड औषधांवर फुशारकी मारीत असतात पण त्यांस शास्त्राचें ज्ञान नसतें. अशांचे स्वाधीन जीव करणें ही चूक आहे. त्याप्रमाणें ज्या वकिलांला ग्रंथांचें असावें तसें ज्ञान नसून जे केवळ वहिवाटीचे आणि अनुभवाचे जोरावर काम करतात त्यांजवर ही भरंवसा ठेवणें हें साहस च आहे. एखादे वेळेस काम त्यांच्या माहितीच्या बाहेर गेलें कीं ते घाबरून जातात आणि तेणेंकरून मालकाचें नुकसान होतें. आपल्या हयातींत जेवढा अनुभव मनुष्यास येतो तेवढ्यावर च मनुष्याचें जन्मभर निभत नाहीं." वर जे ग्रंथकारांचे अभिप्राय लिहिले त्यांवरून इतकें

स्पष्ट होतें कीं केवळ अनुभवानें कोणतें ही काम व्हावें तसें होत नाहीं; आपल्या पूर्वीं जे लोक होऊन गेले त्यांनीं आपले अनुभवांप्रमाणें लिहून ठेविल्यानें जीं शास्त्रें झालीं आहेत, त्यांचा परिचय करून घेऊन, नंतर वहिवाटीकरितां जे नियम बांधून ठेवले आहेत, ते ही पाहून, जसजसा प्रसंग येईल तसतशी दोन्ही धोरणांवरून व्यवस्था करावी; असें केल्यानें सर्व धंद्यांत आणि त्याप्रमाणें शिक्षकाचे धंद्यांत ही चांगलें यश येणार आहे. शास्त्रीय ज्ञान आणि केवळ ठोकताळ्याचे नियम हीं दोन्ही एकमेकांचे साहाय्यावांचून पंगु आहेत. याकरितां शिक्षकाचें काम करूं लागण्यापूर्वीं, आणि दरएक विषय शिकवितांना, व दरएक प्रकारची शाळेची व्यवस्था करतांना काय काय केलें पाहिजे यासंबंधीं नियम शिकण्याचे ही पूर्वीं, सर्व शिक्षणपद्धतींस बीजरूप जे सिद्धांत त्यांजविषयीं माहिती करून घेणें अवश्य आहे.

---

# शिक्षण.

मुख्य विषयावर लिहिण्यास आरंभ करण्यापूर्वी शिक्षकानें आपले कामास मूळ आरंभ कसा करावा याविषयीं थोडें लिहितों. हें लिहिणें शिक्षकाचे कामाकरितां जे तयार होत आहेत त्यांच्या उपयोगीं पडेल; व जे शिक्षकाचें काम हल्लीं करीत आहेत त्यांच्या ही उपयोगीं पडेल; कारण जेव्हां जेव्हां शिक्षकाची बदली होते तेव्हां तेव्हां तो आपले कामास पुनः आरंभ करितो असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. जेव्हां जेव्हां शिक्षकाची बदली होते तेव्हां पहिले वेळेस आपल्या हातून ज्या चुका झाल्या असतील त्या दुरुस्त करून व ज्या गोष्टी काम करितांना आपल्या ध्यानांत आल्या असतील त्या मनांत ठेवून नवीन कामास आरंभ करण्याची संधि त्याला सांपडते. ही सुधारणुकेची संधि न दवडण्याबद्दल हरएक शिक्षकानें कळकळ बाळगिली पाहिजे.

शिक्षकाची व विद्यार्थ्यांची प्रथम गांठ पडते ते वेळेस त्याची आपल्या विद्यार्थ्यांवर जशी छाप पडेल त्याप्रमाणें त्याचें पहिले दिवसाचें काम होतें, पहिले दिवसाचे कामाच्या रंगावरून पहिल्या महिन्याच्या कामाचें बस्तान बसतें; महिन्याचे कामावरून सालाचे कामाची घडी बसते; व पहिले सालच्या कामावरून अखेरपावेतों त्याचे कामाचा बस बसतो. एतावता पहिले तोंडीं च कामाचा जसा आरंभ होईल त्यावरून अखेरपावेतों काम चालतें. यासाठीं प्रथम च आरंभ करावयाचा तो फार जपून केला पाहिजे. मोठे पोक्त विचाराच्या मनुष्यावर देखील एखादे मनुष्याची पहिल्यानें छाप पडते ती उलटणें कठीण असतें. लहान मुलांचे मनानें तर एकदां जी गोष्ट घेतली ती कधीं च त्यांच्या मनांतून निघत नाहीं; यासाठीं, आरंभीं च मुलांवर आपलें वजन योग्य रीतीनें पडण्याकरितां शिक्षकांनीं फार जपावें. आतां कधीं कधीं मुलांचे मनावर प्रथम ग्रह होतो तो अगदीं

क्षुल्लक गोष्टींनीं ही होतो; परंतु तो ग्रह क्षुल्लक आहे असें कोणीं समजूं नये; उलट असें मात्र आहे कीं, एकदां मुलांस पंतोजी आवडेनासा जाहला, म्हणजे त्यानें कांहीं केलें तरी त्याला तीं नांवेंच ठेवितात; त्यानें कांहीं ही करावयाचें काढिलें तरी तीं वांकडीं च जातात; असें होऊं लागलें म्हणजे त्याचें काम चालेनासें होतें; व सहज च त्याला आपल्या धंद्याचा कंटाळा येतो. मग त्याला ही सुख होत नाहीं व विद्यार्थ्यांचें ही कल्याण होणें एकीकडे राहतें. या दोन्ही गोष्टींला विद्यार्थ्यांची व पंतोजीची एकचित्तता होणें अवश्य आहे. ही एकचित्तता होण्याला प्रथमदर्शनीं मुलांवर चांगलें वजन पडणें अवश्य आहे; याकरितां आरंभीं पंतोजीचें वजन कशानें पडेल याविषयीं विचार केला पाहिजे. अमुक च केल्यानें मुलांवर वजन पडतें असें हटकून सांगणें अशक्य आहे. मनुष्याच्या आंगीं हुशारी, तारतम्यज्ञान, व लौकिकचातुर्य असल्याखेरीज त्याचें वजन पडणार नाहीं; व या गोष्टी सांगून येतात असें नाहीं; त्या आंगच्या पाहिजेत; तरी याविषयीं कांहीं सूचना केल्या तर उपयोगीं पडल्याशिवाय राहणार नाहींत. प्रथम सूचना अशी आहे कीं, पंतोजीनें मुलांवर ममता ठेवावी, व अंतःकरणांत थोरपणा बाळगावा, म्हणजे त्यानें लहानसहान गोष्टींत जिकीर करूं नये. आपले मनाप्रमाणें एखादी गोष्ट न घडली तरी उगीच त्याबद्दल नसती कुत्सित कल्पना काढीत बसूं नये. कांहीं क्षुल्लक गोष्टींकडे थोर मनानें कानाडोळा करावा; आपला स्वतःचा संबंध ज्या गोष्टींत असेल त्या गोष्टींत तर नजर फार च सढळ ठेवावी. एखाद्या मनुष्याचा स्वभाव असा असतो कीं कांहीं वांकडें झालें कीं लागलीं च तें मुद्दाम आपला अपमान करायासाठीं दुसऱ्यानें केलें, असें मनांत वागवून त्याबद्दल वाटाघाट करीत बसावें; ही खोड मुलांनीं एकदां ओळखिली, म्हणजे तीं पंतोजीस वारंवार त्रास देऊं लागतात. कांहीं मनुष्यांस नेहमीं आपला अंमल मुलांवर आहे किंवा नाहीं, त्यांत कांहीं कमी झालें किंवा काय, हें च पाहण्याचा छंद असतो. अशीं मनुष्यें, दुसऱ्यांनीं नमस्कार करणें, उठून उभें राहणें, वगैरे गोष्टींकडे विशेष लक्ष

देतात; हा प्रकार अतिशय झाला म्हणजे पोकळ दिसाऊ मान मात्र शिलक राहतो, व खरी मान्यता एकीकडे राहते. खरोखरी मानाचा प्रकार असा आहे कीं तो जितका कमी मागावा तितका अधिक मिळतो. यासाठीं पंतोजीनें नेहमीं नजर थोर ठेवावी, व किरकोळ गोष्टींत मुलांबरोबर किरकिर करूं नये. परंतु पंतोजीची वागणूक अशी असली पाहिजे कीं, जेथें खरोखरी अन्याय घडला आहे तेथें याच्या हातून बिलकुल मुलाजा होत नाहीं, व हा दृढ निश्चयाचा मनुष्य आहे, असें विद्यार्थ्यांस तेव्हां च वाटलें पाहिजे. मुलांवर धाक तर असावा, व आपणांवर ममता आहे असें तर त्यांस वाटावें. ही खुबी पंतोजीनें मोठ्या कौशल्यानें साधली पाहिजे. नाहीं तर ममता दाखवितांना लाड फार च होऊं लागले तर बंडाळी होईल, किंवा जरब राखण्याची शिकस्त झाली तर जुलमी वागणूक होईल. स्वभावतः मुलांना व्यवस्थितपणा व नियमितपणा आवडत नाहीं असें नाहीं; व जो शिक्षक ते राखण्याविषयीं इलाज करितो त्याचा तीं द्वेष करितात असें ही नाहीं. परंतु एकेकाची व्यवस्था ठेवण्याची शिस्त विनाकारण इतकी त्रासदायक असते कीं मुलांना त्या शिस्तीचा तिटकारा येतो व तेणेंकरून अव्यवस्था होते. परंतु गोडीगुलाबीनें मुलांस व्यवस्थितपणाची सवय लावूं लागलें तर तीं मोठ्या आनंदानें सांगितलेलें ऐकतात. या गोष्टीकडे पंतोजीनें विशेष लक्ष दिलें पाहिजे; कारण पुष्कळ पंतोजींच्या आंगीं असलेले गुण या जुलमी स्वभावानें फुकट जातात; इतकें च नव्हे, तर, त्यांच्या चांगलेपणापासून च अपाय होऊं लागतो. जो दृढपणा व तरतरीतपणा पंतोजीच्या आंगीं असल्याशिवाय त्याचें काम कधीं च चांगलें व्हावयाचें नाहीं, तो च तरतरीतपणा व दृढपणा मुलांवर जुलूम चालविण्याच्या कामीं लागू केला म्हणजे उभयपक्षीं दुराग्रह वाढून कामाचें मातेरें होतें.

विद्यार्थी मंडळीस आपण चांगले आहों असें वाटावें असें पंतोजीच्या मनांत असल्यास त्यानें एक गोष्ट ध्यानांत ठेवावी; ती दिसण्यांत जरी अगदीं सामान्य दिसते तरी तिजपासून काम मोठें होतें. ती गोष्ट ही कीं त्यानें आपली वागणूक अगदीं साधी ठेवावी, नसती

आढ्यता आणण्याकरितां बिलकुल इलाज करूं नये. असें केल्यानें त्यास विद्यार्थ्यांपासून मान मिळेल; निदान इतकें तरी होईल कीं त्याचा उपहास होणार नाहीं. कांहीं अल्पवयी लोक पंतोजीचें काम करूं लागले म्हणजे मोठा डौल घालतात, त्यामुळें त्यांचें विद्यार्थी लोकांत हांसें होतें; इतकेंच नाहीं, तर ज्यांशीं ज्यांशीं त्यांना काम पडतें ते सर्व लोक त्यांना नांवें ठेवितात. वागणुकीचा असा प्रकार ठेविल्यानें लाभ तर कोणत्या ही प्रकारचा होत नाहीं च; परंतु त्याचा विद्यार्थ्यांस व इतर लोकांस असा तिटकारा येतो कीं, ज्या पुरुषांना ही खोड आहे असें एकदां समजलें, त्यांनीं पुढें किती ही चांगल्या रीतीनें काम केलें तरी ते त्यांना बरें म्हणत नाहींत. लोकांस सहज च वाटतें कीं, इतका खळखळाट आहे तेथें पाणी उथळ च असलें पाहिजे. यासाठीं दरएक पंतोजीनें आपली वागणूक नेहमीं फार साधी ठेवावी; व नेहमींच्या कृतीनें, हा गृहस्थ नेकीनें वागणारा आहे, अशी लोकांची खातरी करून द्यावी; यांत त्याचें फार कार्य होईल.

आरंभीं च, पंतोजीच्या आंगीं निश्चय व स्थिरपणा आहे, अशी विद्यार्थ्यांची खातरी जाहली म्हणजे पुढें काम कसें सुरळीत चालतें याविषयीं एक घडलेला दाखला लिहितों.

एका शाळेवरील पंतोजी अंमळसा मिळमिळीत असल्यामुळें शाळेंत कांहीं बंडाळी झाली; व शाळेवरील अधिकाऱ्यांनीं त्यास काढून त्याच्या जागीं दुसऱ्या पंतोजीची नेमणूक केली. पंचमंडळी शाळेंत जमून सरपंचांनीं नवीन पंतोजीची व विद्यार्थ्यांची परस्पर ओळख करून दिली, व त्या प्रसंगास योग्य असा थोडा उपदेश ही मुलांस केला. मुलें आधीं च बिघडलेलीं होतीं, त्यांनीं, नवीन आलेले पंतोजीचें पाणी कसें काय आहे, याची परीक्षा पंच मंडळी जातांच करावी, असा मनसुबा ठरविला; व पंतोजी पंचांस पोहोंचवावयास जातांच दार लावून घेऊन, बांकांवर पाय आपटून गडबड सुरू केली; व याहून अधिक पराक्रम करून दाखविणार, तों पंचांस घालवून पंतोजी परत आला. त्यानें हळू च दार उघडून, आपल्या जाग्यावर

येऊन, कांहीं वेळ स्तब्ध राहून, मुलांकडे जरबेचे नजरेनें रोखून पाहिलें; व कपाळास आंठ्याविठ्या घालून चिरडीस गेल्यासारखें तर दाखविलें नाहीं, परंतु मेजावर हातानें हळू आवाज करून मोठ्या गंभीरपणानें व शांतपणानें मुलांस "गडबड करूं नका" म्हणून सांगितलें. त्याची ती मुद्रा पहातांच दरोबस्त मुलांस एकदम वाटलें कीं, पहिलें बेबंद राज्य सरलें, आतां गडबड चालणार नाहीं. त्या क्षणापासून जो त्याचा अंमल बसला तो बसला च. पुनः मुलांनीं खोडसाळपणा ज्याचें नांव तो केला नाहीं. तात्पर्य प्रथमदर्शनीं च पंतोजीच्या नजरेवरून मुलांस वाटलें पाहिजे कीं याची मुलांवर जरी माया असते तरी हा जरबी आहे, पिळपिळीत किंवा अस्थिर बुद्धीचा नाहीं.

---

## ग्रंथांतील विषयांचे दोन भाग.

पंतोजीच्या कामाचे या ग्रंथांत मुख्य दोन भाग कल्पिले आहेत. एक शाळेची सामान्य व्यवस्था, अथवा शिक्षण[1]; व दुसरा शिकविणें, किंवा अध्यापन. काम करितांना या दोन्ही गोष्टी एकदम कराव्या लागतात, व जशी एक बरी वाईट असेल तशी दुसरी ही असते; यामुळें एकीविषयीं लिहीत असतां दुसरीविषयीं लिहिणें सहज च भाग पडेल. तथापि विषयाच्या निरूपणाच्या सोयीकरितां हे दोन भाग स्वतंत्र कल्पिले आहेत.

शाळेंतील बंदोबस्त जसा बरा वाईट असेल तसें अधिक उणें ज्ञान विद्यार्थी संपादन करतात आणि तशी च बरी वाईट त्यांची एकंदर वर्त-

---

१ शिक्षण या शब्दाचा सामान्य व्यवस्था असा अर्थ घेतांना त्याचा एऱ्हवीं जो अर्थ घेतात त्यापेक्षां कांहीं कोता अर्थ केला आहे. म्हणजे शिक्षण असें म्हटल्यानें अध्यापन याचा ही त्यांत समावेश होतो; तें अध्यापन सोडून देऊन पंतोजीचे बाकीच्या कामास तो शब्द लाविला आहे. असा अर्थ केल्यानें शिक्षण या विषयाखालीं मुलांस ताब्यांत ठेवणें आणि त्यांजपासून काम घेणें, शाळेचा बंदोबस्त आणि तिजमधील कामाचा नियमितपणा, व या सर्व गोष्टी सिद्ध होण्याचे उपाय, यांचा समावेश होतो.

णूक ही होते. ज्या शाळेंत मुलांना नित्य आणि नेमले वेळीं हजर व्हावें च लागतें,–जेथील विद्यार्थ्यांचा वर्ग मौज करण्याकरतां एके ठिकाणीं जमलेल्या मंडळीपेक्षां बरा च भिन्न प्रकारचा असतो—जेथें विद्यार्थी निर्बंधांत असतात,–जेथें दर एक विद्यार्थी आपलें स्वतःचें नेमलेलें काम करतो आणि आपल्यास विचारलेले प्रश्नाचें मात्र उत्तर देतो,–त्या शाळेंत विद्यार्थी जें ज्ञान संपादन करतो तें खास त्याच्या पदरीं पडतें; आणि प्रामाणिकपणा, स्वतःचे शक्तीवर भरंवसा, सत्यवक्तृत्व आणि कायद्याविषयीं व बंदोबस्ताविषयीं मान हे गुण शिक्षणामुळें जितके उत्पन्न होणें शक्य आहे तितके त्या विद्यार्थ्यांच्या आंगीं उत्पन्न होतात. मी फार आग्रहानें सांगतों कीं गुरु आणि विद्यार्थी यांजमधील व्यवहार प्रीतिपूर्वक असावा. तीव्रपणा आणि क्रूर स्वभाव यांचा मी अगदीं निषेध करतों.

बंदोबस्त चांगला राहिला पाहिजे आणि कामावर सर्वांचें चित्त असलें पाहिजे, असा जेथें शिक्षकाचा निर्धार असतो तेथें सर्व सुखांत असतात आणि जेथें बंदोबस्ताची ढिलाई असते आणि अव्यवस्था असते तेथें कोणास ही सुख लागत नाहीं. सगळा च दंगा आणि घोटाळा असला म्हणजे शिक्षकास सुख लागावयाचें च नाहीं आणि शाळेंत असा प्रकार चालूं देणाऱ्या पंतोजीस विद्यार्थी फारसे जुमानावयाचे ही नाहींत. पुष्कळ शिक्षकांना असें आश्चर्य वाटतें कीं, आह्मी इतकें शिकवितों, तरी विद्यार्थ्यांस, परीक्षेच्या वेळेस बंदोबस्तामुळें आपल्या बुद्धीनें च लिहावें पुसावें लागतें, तेव्हां कांहीं च येत नाहीं हें कसें. परंतु जेथें नेहमीं बंदोबस्त बरोबर नसतो तेथें असें होणें साहजिक च आहे. उलटें असें न झालें तर मात्र आश्चर्यास जागा खरी.

शाळेंत गणित शिकवूं लागलें म्हणजे जर कांहीं मुलगे आपल्याला येईल तितकें अगर आपल्याला आवडेल तितकें उदाहरण करून बाकी शेजारल्या कोणाचें तरी चोरून उतरून घेतील तर तो प्रकार चालावा; अथवा दुसरे विषय चालत असतां तोंडीं प्रश्न विचारतात, तेव्हां दहा पांच जणांनीं एकदम कल्ला करून जबाब द्यावा, अथवा ज्यांनीं पाहिजे त्यांनीं जबाब द्यावा आणि नको त्यांनीं देऊं नये, असा प्रकार ज्या शाळेंत असेल त्या

शाळेंत अति हुशार मुलांचें काय शिकणें होईल तें होईल. बाकीच्यांचें कांहींएक होणार नाहीं. आणि ज्यांना कांहीं ज्ञान संपादन होईल त्यांना तरी तें शिक्षकाच्या शिकविण्यानें येईल असें नव्हे. पण त्याच्या शिकवण्यांत कांहीं च अर्थ नसून देखील त्यांना येईल असें म्हटलें पाहिजे.

आणखी असें पहा कीं, ज्या मुलाला नेहमीं चोरून शेजारच्या मुलाचें पाहून लिहिण्याची खोड लागली, त्याला आपल्या जातीच्या शक्तीवर अथवा करण्यावर भरंवसा ठेवण्याचा चांगला अभ्यास कसा व्हावा ? आणि असलें लबाडीचें काम क्षणोक्षणीं करण्याची सवय लागल्यावर प्रामाणिकपणा, सत्यवक्तृत्व हे गुण त्याच्या आंगीं कसे यावे ?

शाळेंत अव्यवस्था पाहिली म्हणजे मला नेहमीं नवल वाटतें. अव्यवस्थेमुळें शिक्षकाला जें दुःख वेठावें लागतें तें पाहिलें तर अतिशय असतें. आणि त्यानें उगाच थोडें लक्ष पुरविलें तर तें सर्व दुःख एकीकडे होऊन त्याच्या कामापासून त्याला उलटें सुख होईल असें असतें. परंतु येथें बंदोबस्ताविषयीं लिहितांना शिक्षकावर फारसें लक्ष नसून विद्यार्थ्यांवर होणाऱ्या परिणामावर विशेष लक्ष आहे. बंदोबस्त चांगला नसल्यामुळें विद्यार्थ्यांच्या स्वभावाची वगैरे कशी खराबी होते, त्यांजमध्यें कर्तबगारी वगैरे जे गुण उत्पन्न व्हावयाचे असतात ते व्हावयाचे कसे एकीकडे राहतात, त्यावर नजर देऊन शाळेंतील बंदोबस्त सर्व प्रकारें चांगला राहिला पाहिजे.

जे दोष विद्यार्थ्यांच्या आंगीं असू नयेत असें आपणांस वाटतें ते कोणते ? आळस, उडत उडत वाचणें, फाजिलपणा, मन मानेल तसें वागणें, वगैरे. हे दोष कशापासून उत्पन्न होतात तें पाहूं गेलें असतां असें दिसून येईल कीं, जेव्हां त्यांपैकीं कांहीं दोषांत पडण्याचा मोह येतो, तेव्हां जरा बळ धरून 'मी या मोहांत नाहीं च पडणार' असें न म्हटल्यामुळें, व जें काम करणें अगदीं युक्त आहे असें पक्केपणीं माहीत आहे, तें करण्याचा खास निश्चय न केल्यानें, हे दोष आंगीं जडतात. विद्यार्थ्यांस हे दोष उत्पन्न न होतील असें वागण्याची सवय न लावली, आणि त्यांना पिळपिळीत, नरम आणि अतिशय लाडकेपणाच्या शिक्षेंत टेविलें, तर मोठेपणीं त्यांना त्याचीं फळें कशीं येतील तें बारीक नजरेनें

पहा. आपल्या मंडळीचीं जीं मतें असतील त्यांविरुद्ध कोणतीही गोष्ट करण्यापुरता ज्याच्या मनाचा निर्धारच होत नाहीं; आपल्या मंडळीचा एखादें काम करण्याचा ठरींव परिपाठ असल्यास त्याला नाहीं ज्याच्यानें ह्मणवत च नाहीं; आपल्याला जो खर्च आणि विनाकारण थाटमाट करण्याचें सामर्थ्य नाहीं तो ही केल्याशिवाय ज्याच्यानें राहववत नाहीं, आपल्या धंद्याच्या अगर व्यापाराच्या लोकांच्या ज्या आपस्वार्थी अगर कोत्या समजुतीच्या चाली असतील त्या सोडून देण्याचें ज्याचे हातून होत नाहीं असल्या माणसाची काय किंमत आहे त्याचा विचार करा, आणि विद्यार्थ्यांस चांगल्या सवयी न लावल्या तर ते असे होतील हें ध्यानांत ठेवा.

पंतोजीच्या हातून आपलें काम उत्तम रीतीनें होण्यास बहुत गोष्टी अवश्य आहेत, त्यांपैकीं मुख्य गोष्ट ही आहे कीं, पंतोजीची आपल्या कामावर आसक्ति असावी. जर मनुष्याची आपल्या कामावर वास्तविक आसक्ति आहे तर तो हर इलाज करून तें काम उत्तम रीतीनें करण्यास शिकल्यावांचून कधीं राहणार नाहीं. ही आसक्ति अवश्य आहे म्हणून सांगते वेळेस, ती फार च थोड्या पंतोजींच्या ठिकाणीं असते, ही गोष्ट सहज मनांत येऊन फार दुःख होतें. कितीएक पंतोजीचें काम करणारे आहेत त्यांस आपल्या धंद्याची लाज वाटते. ते पोट भरत नाहीं ह्मणून निरुपायास्तव हा धंदा करितात. व त्यांत कोणी इमानी च असले तर नियमाप्रमाणें जें करणें अवश्य आहे तें कसें तरी करितात. परंतु तसें त्यांनीं केलें तरी त्यांनीं आपलें कर्तव्यकर्म योग्य रीतीनें केलें असें ह्मणतां येत नाहीं. अशा लोकांस, शाळेचें काम जाहल्यावर आपण मुलांशीं बोलतांना अथवा मुलें आपणाशीं बोलतांना कोणीं पाहिलें तर, त्याची फार लाज वाटते. विद्यार्थ्यांची व आपली कोठें प्रसिद्ध ठिकाणीं गांठ पडली तर, कसें ही करून ते तोंड चुकवितात; कारण, त्यांना असें वाटतें कीं, शाळेंतल्या पोरानें आपणास नमस्कार केला तर लोक आपल्यास ‘तात्या’ म्हणतील व आपला उपहास होईल. आतां हा दोष सर्वस्वीं शिकविण्याचें काम करणाऱ्यांचा आहे असें नाहीं.

बहुतेक लोक पंतोजीच्या कामाची खरी योग्यता ओळखीत नाहींत. ते त्याला गुरें वळणार वगैरे हलकीं नांवें ठेवितात, व त्याची कुचेष्टा करितात. जर लोक या धंद्याची खरी योग्यता जाणते तर पंतोजीं-नाही आपल्या धंद्याची लाज न वाटती; परंतु लोकांस पंतोजीच्या कामाची थोरवी न समजल्यामुळें ते नेहमीं पंतोजीस हांसणार च. लहानापासून थोरापर्यंत सर्व लोक शिक्षकपणाचें काम किती महत्त्वाचें आहे हें ओळखूं लागण्यास किती काळ लागेल हें कांहीं च समजत नाहीं. परंतु हा काळ आल्यावर आपण आपलें काम मनापासून करूं असें समजणें हें अगदीं अप्रयोजक आहे. शिक्षकाच्या कामाची खरी योग्यता लोकांस समजविण्यास हीं, प्रत्येक शिक्षकानें आपलें काम उत्तम रीतीनें करणें, हें च साधन आहे. त्याअर्थीं आपोआप हा काळ येणार असें समजून त्या काळाची वाट पाहत बसणें उपयोगी नाहीं. यासाठीं, जे लोक हा धंदा पतकरितात, त्यांनीं तरी त्याची खरी योग्यता जाणून, त्याच्या योग्यतेच्या मानानें त्याकडे मन लाविलें पाहिजे. विद्यावृद्धीच्या कामाचें महत्त्व ज्यांस समजलें नाहीं असे मनुष्य या म्हणण्यास असें देखील उत्तर देतील कीं, “विद्या लोकांस यावी ह्मणून काय काय तरी प्रयास करावयास तुम्ही सांगतां? तुम्हांस वाटतें काय, कीं जीं कार्टीं शाळेंत राहिलीं तर पीडा करितात व निघून गेलीं तर गांवास उच्छाद आणितात, त्यांना ‘र ट फ’ करावयास शिकविण्याकरितां कोणी शहाणा माणूस आपला जीव तोडील? इतकीं नादिष्ट माणसें शंकडोंगणती सांपडतील कीं काय?” असें म्हणणारे लोक थोडे नाहींत; ते जेथें तेथें दृष्टीस पडतात च. पण या मासल्याची स्वारी जर शिक्षकाचें काम करूं लागली, तर त्या विद्यार्थी मंडळीचें नशीब फुटलें असें च समजलें पाहिजे. जगद्विख्यात प्रोफेसर **टिंडाल** यांनीं एके व्याख्यानांत शिक्षकांची खरी योग्यता काय आहे हें उत्कृष्ट रीतीनें वर्णिलें आहे. त्या वर्णनाकडे लक्ष दिलें म्हणजे असल्या शंकांचा निरास लागलाच होईल. त्यांनीं म्हटलें आहे. “या देशांतील लोक जे जे व्यवसाय करितात, त्या सर्वांत अतिशय महत्त्वाचा व्यवसाय कोणता, ह्मणून मला कोणीं विचारिलें तर, पंतोजीचा व्यवसाय अति मह-

त्वाचा आहे, असें मी सांगेन. हा व्यवसाय करणाराविषयीं सर्वांचे मनांत पूज्यबुद्धि असावी; त्याजपाशीं सर्वांनीं थोर अंतःकरणानें नेहमीं सत्य च वदत असावें हें योग्य आहे. परंतु या धंद्यांत स्वार्थाभिलाषी व अयोग्य लोकांचा प्रवेश जाहल्यामुळें, विद्यार्थिवर्गांत ती योग्य पूज्यबुद्धि आणि सत्यशीलता उत्पन्न न होतां, उलटी त्याचा अपमान करण्याची व त्याजपाशीं लबाडी करण्याची बुद्धि उत्पन्न होते. ज्याची बुद्धि अति उदार आहे व ज्याचा दुसऱ्याच्या अंतःकरणाशीं आपल्या अंतःकरणाचें तादात्म्य करण्याचा अभ्यास दृढ झाला आहे, असा गुरु जेव्हां विद्यार्थिजनांचीं मनें उन्मुख करून तीं आपल्या ज्ञानज्योतीच्या प्रकाशानें उज्वलित करितो; व जेव्हां तो आपलें स्वतःचें आचरण त्यांच्या भिन्न भिन्न अंतःकरणांवर पृथक् पृथक् रीतीनें फलद्रूप होऊन त्यांची कशी उन्नति करितें याच्या प्रत्यभिज्ञानानें संतोष पावतो; तेव्हां तो त्याचा व्यवसाय फार मान्य आहे, एवढें ह्मटल्यानें त्याच्या वास्तविक थोरपणाचें कांहीं च वर्णन केल्यासारखें होत नाहीं. त्या अधिकारांत सुखाची व परोपकाराची परमावधि आहे असें च ह्मटलें पाहिजे. इतकें च नव्हे, परंतु त्याचा तो व्यवसाय पाहून त्याच्या सहवासास असणारे लोक ही आनंदमय होऊन जातात.” या प्रकारचे गुरु आपल्या देशांत होऊन गेले नाहींत, असें कोण ह्मणेल आणि जर एकवार होऊन गेले आहेत तर आतां पुनः कां होणार नाहींत ?

शिकविण्याचें वेड मनुष्यास स्वाभाविक असल्याशिवाय तो कधीं च पंतोजीच्या कामास लायक होणार नाहीं, इतकें जरी साफ ह्मणवत नाहीं, तरी ज्या मनुष्यास भक्तिपुरःसर शिकविण्याचें काम आवडत नाहीं त्याच्या हातून जो या कामाची भक्ति बाळगितो त्याप्रमाणें कधीं च काम होणार नाहीं; इतकें च नव्हे, तर, मनांत हौस बाळगून काम करणारांची, व हौसेवांचून काम करणारांची, गोष्ट च वेगळी आहे, असें समजलें पाहिजे. कोणते ही कामाचा ज्यास कंटाळा आहे किंवा ज्यास मनापासून त्याची कळकळ नाहीं, त्याच्या हातीं तें काम पडलें म्हणजे त्या कामाचा घात झाला च. काम कडेस

ऱ्यावयास, किंवा रूपास आणावयास, त्यावर त्याचें मन च पाहिजे. पंतोजीला आपल्या कामाची स्वतःच हौस असावी. निरुपायास्तव अथवा पोट भरत नाहीं ह्मणून त्यानें या कामास लागूं नये. त्यानें तें काम करण्यालायक व मोठ्या प्रतिष्ठेचें आहे, अशा खातरीनें स्वीकारावें. ज्यानें अशा बुद्धीनें पंतोजीच्या कामाचा स्वीकार केला आहे, व ज्याचा आतां हा आपल्या जन्माचा रोजगार झाला आहे असा समज झाला आहे, त्याला उत्तम रीतीनें तें काम करितां आलें असतां आपलें महत्कार्य झालें असें वाटेल; व तें साधण्याकरितां तो आपलें आंग कांहीं तरी झिजवील च. कितीएक लोक पंतोजीचा धंदा करितात, परंतु, हा आपला जन्माचा रोजगार आहे, असें ते समजत नाहींत; पण अशी समजूत बाळगल्याशिवाय माणसाच्या हातून कांहींएक ह्मणण्यासारखें होणार नाहीं. इतर सर्व लोक एक एक धंदा पतकरून शेवटपर्यंत त्यांत च दिवस घालवितात; मग पंतोजीनें च तेवढें निरंतर आपल्या कामास लागून कां राहूं नये? जर तो राहील तर खास आपल्या कामांत यश मिळवील च मिळवील. त्यांतून असें आहे कीं, मनुष्यानें कोणतें ही काम हातीं घेतलें तर तें नीट करावें; करून करावयाचें, मग तें नीट कां करूं नये? मोठमोठ्या पंडितांनीं ह्मटलें आहे कीं जें काम करावयाचें तें बिलकुल कसर न करितां करावें; अंगीकारल्यावर त्याचा अव्हेर कधीं करूं नये. (निर्व्यूढं प्रतिपन्नवस्तुषु सतामेकं हि दीर्घं व्रतम्.)—जन्मास येऊन उद्योग केल्याशिवाय राहणें हें च काय तें साधावयाचें, असें म्हणून या दुनियेंत कधीं चालणार नाहीं. महाप्रसिद्ध तत्त्ववेत्ता **बेकन्** यानें म्हटलें आहे कीं, या प्रपंचांत देवगंधर्वादिकांस मात्र श्रम केल्याशिवाय सृष्टीचा चमत्कार पाहण्यास अधिकार आहे; इतर सर्वांनीं श्रम केले पाहिजेत व ते ही मनापासून केले पाहिजेत.

यासाठीं मनुष्यानें जें काम हातीं घेतलें त्याकडे त्यानें नेहमीं लक्ष ठेविलें पाहिजे, व त्यासाठीं जितकी मेहनत आपल्या हातून होईल तितकी केली पाहिजे. जे पंतोजी नामांकित म्हणून निवडले जातात, त्या सर्वांची पद्धति अशा च रीतीनें जीव लावून काम करण्याची अ-

सते; व असें केल्याखेरीज कोणत्याही पंतोजीस थोडेंबहुत सुद्धां यश येणें कठीण. ज्या मनुष्यास शिकविण्याचें काम मनापासून आवडतें, व जो आपल्या कामावर आसक्ति ठेवितो, तो वर्गावर गेला, आणि शिकवूं लागला, म्हणजे त्यास अवसान येऊन त्याची मुखश्री प्रफुल्लित होते; तो आपल्या विद्यार्थ्यांशीं अगदीं मिळून जातो, व त्यांच्या पोटांत शिरून, ते उत्तर देतात तेव्हां त्यांच्या मनांत काय आहे तें बरोबर समजतो; त्यामुळें त्यांच्या शंकांचें निवारण त्यास उत्तम रीतीनें करितां येतें. विद्यार्थ्यांच्या मनांतील कल्पना त्याला आपल्या मनांत आरशाप्रमाणें दिसतात. **आर्नोल्ड्** म्हणून एक अति विख्यात गुरु इंग्रेजांचे विलायतेंत होऊन गेला. त्याच्या एका विद्यार्थ्यानें असें म्हटलें आहे." मला वारंवार वाटे कीं **आर्नोल्ड्** साहेब बोलूं लागला ह्मणजे हा कोणी तरी आपल्या मंडळींतला च बोलतो आहे; फार तर काय, आपल्या मनांत ज्या शंका व कल्पना येतात, त्या आपल्या मंडळींतल्यांला देखील त्याच्यासारख्या समजत नाहींत व बोलून दाखवितां येत नाहींत. तो बोलूं लागला ह्मणजे विद्यार्थ्यांच्या मनांतला खडानखडा त्याला ठाऊक आहे असें कोणास वाटणार नाहीं?" अशी पंतोजीची आणि विद्यार्थ्यांची एकचित्तता झाली, म्हणजे विद्यार्थी असे त्याच्या हातीं येतात कीं, कांहीं सांगण्याची सोय नाहीं. मुलांची त्याजवर ममता जडते, व तो जवळ येतांच, प्रसन्न वदनानें तीं त्याजकडे पाहूं लागतात. तो वर्गावर येतांच मुलांची मुद्रा अशी प्रफुल्लित होते, व त्यांच्या तोंडावर अशी हुशारी दिसते कीं, जर तो सहृदय अंतःकरणाचा मनुष्य असेल तर, त्यांचा तो आनंद पाहून, आपल्या काळजीचें व श्रमाचें सार्थक्य झालें, असें त्यास वाटल्यावांचून राहणार नाहीं. सारांश विद्यार्थ्यांच्या बुद्धीस संस्कार होण्याकरितां भाषादिकांच्या अभ्यासाची योजना करा; अथवा शास्त्रीय विषयांची योजना करा; पंतोजीस जशी आपल्या उद्योगाची कळकळ असेल, जशी त्यावर तो आसक्ति ठेवील, व जीव लावून काम करील, त्याप्रमाणें च त्याला यश येईल. हा सिद्धांत होय, व हा सिद्धांत सर्व पंतोजींनीं मनांत बाळगिला पाहिजे.

जशी मनापासून शिकविण्याची हौस असणें ही गोष्ट तें काम चांगलें होण्यास अवश्य आहे, तशी च दुसरी एक गोष्ट अवश्य आहे; ती ही कीं पंतोजीस मुलांची आवड असावी; ज्याला मुलांची आवड नाहीं, त्याच्या हातून पंतोजीचें काम कधीं चांगलें होणार नाहीं. आतां ही आवड सांगून येते असें नाहीं; परंतु, ती असल्याशिवाय काम होणार नाहीं, हें खास समजावें. दुसरें असें ही आहे कीं, मूळची जरी फारशी मुलांची आवड नसली तरी एकदां माणूस मुलांत पडला व काम खरोखरी मनापासून करूं लागला, व त्यांचें मन आपल्या उपदेशानें कसें वळतें व त्यांस काय आवडतें, या गोष्टींवर नेहमीं लक्ष ठेवूं लागला म्हणजे मुलें त्यास आवडूं लागतात.

मागें **आर्नोल्ड** साहेबांचें नांव आलें च आहे; त्यांचा कित्ता सर्व पंतोजी लोकांनीं घ्यावा असें आहे. त्याजविषयीं एका ग्रंथकारानें लिहिलें आहे, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तो ह्मणतो "प्रसंगविशेषीं तर **आर्नोल्ड** साहेब आपल्या विद्यार्थ्यांशीं ममतेनें बोलत असत च; परंतु सर्वदा दरएक विद्यार्थ्यावर पोटांतून त्यांच्या ममतेचा ओघ सारखा वाहत असे; व नेहमीं जरी ते अति गंभीरपणानें वागत असत तरी वेळोवेळीं त्या ममतेचा पूर दृष्टोत्पत्तीस आल्याशिवाय राहत नसे. एखादे वेळेस त्यांच्या विद्यार्थ्यानें अति मोठा अपराध करावा आणि त्यांस अतिशय राग यावा; तेव्हां लोकांस वाटावें कीं आतां या मुलावर यांची ममता अगदीं राहिली नसेल; परंतु अशा वेळेस देखील त्या विद्यार्थ्यावरची त्यांची ममता तिळमात्र कमी होत नसे. शिक्षा सांगतांना त्यांचा कंठ दाटून येई, व त्यांच्या तोंडांतून अक्षर देखील निघत नसे. एकदां एका विद्यार्थ्याच्या हातून फार च मोठा अन्याय झाला होता; त्या वेळेस ते आपल्या एका स्नेह्याशीं त्याबद्दल बोलूं लागले. बोलतांना त्यांचे डोळे पाण्यानें अगदीं भरून आले. ते म्हणाले "मीं प्रथम ही गोष्ट ऐकिली तेव्हां माझ्या पोटच्या पोराच्या हातून अन्याय घडला असता तर मला जसें वाईट वाटलें असतें, तसें वाईट वाटलें आणि खरोखर तो अन्याय त्याच्या आंगीं लागे तोंपर्यंत मीं त्याबद्दल चकार शब्द देखील तोंडावाटे काढला नाहीं. फार तर काय, परंतु माझ्या हाताखाल-

च्या शिक्षकांबरोबर देखील मी ती गोष्ट बोललों नाहीं." बरें, विद्यार्थ्यांवर त्यांची अशी ममता जडत जडत जडत असे, असें नाहीं; मुलांचा व त्यांचा विशेष सहवास होण्यापूर्वीं च त्यांची त्यांवर ममता बसत असे. एकदां एक नवीन च मुलगा त्यांच्या शाळेंत आला; तो हुशार व होतकरू होता; त्याजविषयीं गोष्ट निघाली तेव्हां त्यांचा कंठ सद्गदित झाला आणि ते म्हणाले "हा मुलगा वाईट निघाला तर माझें काळीज फाटून जाईल." बाहेर जी त्यांची ममता व कळकळ दृष्टीस पडे ती कांहीं च नाहीं, असें अंतःकरणांतून त्यांचें प्रेम विद्यार्थ्यांवर असे. ज्या कोणास मनापासून शिक्षकाचें काम आपल्या हातून चांगलें व्हावें असें वाटत असेल, त्यानें या पुरुषाच्या उदाहरणावर निरंतर लक्ष ठेवावें.

आतां आपण असें घेऊन चालूं कीं, शिक्षकाचें खरें लक्ष आपल्या कामावर असून त्यास मुलें ही आवडतात. अशा शिक्षकाच्या आंगीं त्याच्या हातून काम उत्तम रीतीनें होण्यास प्रथम गुण कोणता पाहिजे म्हटलें तर "मुलें कह्यांत ठेवतां येणें" हा होय. हा गुण कांहीं मनुष्यांस आंगचा च असतो व इतरांस त्याचा गंध देखील नसतो; इतकें च नव्हे, तर त्यांच्या आंगीं तो कधीं येईल, असा संभव सुद्धां दिसत नाहीं. असा हा विलक्षण गुण, कीं जो थोड्या च मनुष्यांच्या आंगीं साहजिक असतो, तो पंतोजीमध्यें अवश्य असला पाहिजे, त्यावांचून त्याचें चालत च नाहीं, हें प्रथमदर्शनीं फार चमत्कारिक दिसतें. हें ऐकून ज्यास पंतोजीचा धंदा करणें आहे त्याचें धैर्य च खचेल असें ऐकणारास वाटेल खरें; परंतु वस्तुतः प्रकार तसा नाहीं; ही गोष्ट निर्विवाद आहे कीं, कांहीं लोकांचें तेज इतरांच्यापेक्षां लोकांवर सहज पडतें. परंतु हा गुण जात्या ज्यांच्या आंगीं नाहीं त्यांनीं प्रयत्न केला असतां, आपल्या ताब्यांतील लोक आपल्या कह्यांत कामापुरते ठेवणें हें त्यांस अगदीं च साधणार नाहीं, असें समजूं नये. कित्तीएकांच्या स्वभावांत च जर अशी कांहीं विलक्षण गोम असेल तर नाइलाज आहे. परंतु तसें नसेल तर जसे इतर गुण निश्चयानें व श्रमानें साध्य होतात तसा हा ही गुण साध्य होईल. हा गुण आपल्या

आंगीं मुळीं च नाहीं; तेव्हां आतां आपण कांहीं केलें तरी तो आपल्या आंगीं येणार नाहीं; आपण या कामास सर्वथा निरुपयोगी; असें ह्मणून बसूं नये. अशी निराशा करून घेऊन बसणें हा पुरुषाचा धर्म नव्हे. हळू हळू आपल्या आंगीं तो गुण येईल असा इलाज दर-एक पंतोजीनें केला च पाहिजे. कारण त्याखेरीज पंतोजीपणा व्यर्थ आहे. त्या गुणाखेरीज तो धंदा कोणी माणूस करूं लागेल तर त्यापासून त्याला इतका त्रास व संताप होईल कीं त्याचा जीव त्याला नकोसा होईल.

---

१ कांहीं मनुष्यांच्या आंगीं बंदोबस्त ठेवण्याचा गुण उपजत च असतो. परंतु हुकुमत चालविण्याची योग्यता जन्मत: आंगीं नसली तरी कोणी ही मनुष्यानें त्या कामांतील चतुर आणि अनुभवशीर लोकांच्या पद्धतींचें लक्षपूर्वक अवलोकन करून त्यांचा रफ्त ठेवला असतां त्याला चालीपुरतें कौशल्याचें संपादन करतां येईल यांत संशय नाहीं. आणि ज्यांना उपजत शिक्षकांचें काम साधतें त्यांचें तरी काय? जर त्यांनीं ज्या शिक्षकांना स्वत:च्या काम करण्याचे हातोटीनें यश मिळालें आहे त्यांच्या पद्धतींचें चांगलें अवलोकन केलें तर त्यांना आपल्या कामांतील कौशल्य अधिक लवकर आणि सुलभ रीतीनें आल्यावांचून राहणार नाहीं.

ज्या अगदीं लहानसहान गोष्टी शिक्षकांस करावयाच्या असतात त्यांविषयीं जो मनुष्य नेहमीं सावध राहील, आणि सतत काळजी बाळगील, आणि जसजशा अडचणी येतील तसतशा त्या मनापासून झटून दूर करावयाच्या च असा नेम ठेवील, त्याच्या त्या यत्नाप्रमाणें त्याला यश खास येईल; आणि चांगलें यश येण्याला हा यत्न जितका कारणभूत आहे तितकें दुसरें कांहीं नाहीं. या गोष्टीकडे नजर पुरविल्यानें ज्या लोकांना साहजिक शिक्षणचातुर्य कमी आहे त्यांना धीर येईल. केवळ जलद असतात ते च शर्यत जिंकतात, किंवा बलवान् मात्र रणांत सरशी करतात, असें नाहीं. जर शिक्षक अशी उदार बुद्धि ठेवील कीं आपलें काम लहानसहान नव्हे; यांत यश मिळविणें मोठें श्रेयस्कर आहे; आणि पुन: पुन: काम साधलें नाहीं तरी जो फिरून फिरून यत्न करतो च; त्याच्या ज्या चुक्या होतात त्या च बराबर ल-

प्रथमतः पंतोजीनें हा गुण आपणास संपादन करितां येणार नाहीं ही मिथ्या कल्पना मनांतून अगदीं निर्मूळ केली पाहिजे. एक पंतोजी एक वेळ आपल्या हाताखालच्या मदतनिसास म्हणाला "मी जर तुमच्या वर्गावर असतों तर अशी अव्यवस्था वर्गांत झालेली कधीं सहन केली नसती." तेव्हां मदतनीस म्हणाला "होय, खरें आहे, पण तुम्ही वर्गावर असतां तर अशी अव्यवस्था झाली च नसती; पण मीं काय करूं! माझ्यानें बंदोबस्त ठेववत नाहीं, विद्यार्थी माझें ऐकत च नाहींत." बरें, आपण विचार करूं कीं, या मदतनिसाचे विद्यार्थी त्याला कां जुमानीत नव्हते व त्याच्या हातून त्यांचा बंदोबस्त कां होईना? खरें पाहूं गेलें असतां याचें कारण इतकें च कीं, मुलें आपलें ऐकत नाहींत हें जो तो एकदां घेऊन बसला तो बसला च. हें वेड त्याचें सुटल्याखेरीज बंदोबस्त होतो कशाचा? जर त्यानें प्रथम गडबड होऊं लागली हें पाहतां च, शिकविण्याचें काम बंद करून, सर्व बंडाळी मोडेपर्यंत 'ब्र' काढावयाचा नाहीं असें केलें असतें, तर गडबड फार वेळ चालली नसती; व पुढें आपलें कोणी ऐकत नाहीं, ही तक्रार करण्याचें कारण उरलें नसतें. पंतोजीच्या मनांत अमुक एक गोष्ट झाली च पाहिजे असा पूर्ण निश्चय आहे हें विद्यार्थ्यांस पक्केपणीं समजलें म्हणजे झालें. पंतोजीनें तें जाजावून किंवा कातावून च सांगितलें पाहिजे असें नाहीं. त्याचा दृढ निश्चय विद्यार्थ्यांस समजतां च बहुतेक अंशीं त्याचें काम होतें. व एखाद्याच्या मनांत त्याचें न ऐकावें असें थोडेंबहुत असलें तरी त्या वाईट कल्पनेचा मोड जेथल्या तेथें च जिरून

---

क्षांत ठेवल्या आणि सुधरल्या तर हळू हळू त्याची चढती होत जाईल आणि अखेर तो उत्तम शिक्षक होईल.

शिक्षकानें नेहमीं आपले विषय शिकविण्याच्या चांगल्या चांगल्या पद्धति शोधून काढण्यावर चित्त ठेवावें; नवे नवे दाखले योजीत असावे, आणि सांगण्याचे प्रकार आपले आपल्याला सोपे दिसले तरी ते अधिक अधिक सोपे कसे होतील तें पाहत असावें. या विद्येच्या पूर्ण साधनाला मनुष्याचें सर्व आयुष्य देखील पुरेसें होणार नाहीं.

जातो. सारांश पंतोजीनें आपलें कोणी ऐकणार नाहीं हें च आधीं मनांत धरून त्या मानानें वर्तन ठेवूं नये. अशा भितरेपणामुळें त्याचा अंमल अगदीं च नाहींसा होईल. एका ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे. "ज्यांना दुसऱ्यावर आपली छाप बसविण्याची अटकळ एक वेळ समजली, व ज्यांना आपल्या आंगीं हा गुण आहे, असा खरा भरंवसा पोंहचला, त्यांना दुसऱ्यावर अंमल करणें हें अगदीं सोपें काम होऊन जातें. परंतु ज्यांना खरा पोंच नाहीं, व जे ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें मात्र मुलांवर अंमल करूं जातात, त्यांना तें काम साधत ही नाहीं; व त्यापासून उलटा मनस्वी त्रास मात्र होतो."

हा प्रकार शिक्षणांत च आहे असें नाहीं. कोणते ही कामाची गोष्ट अशी च आहे. ज्याला स्वतःविषयीं भरंवसा आहे तो च काम करणार. मनानें एक वेळ कचर खाल्ली ह्मणजे हातपाय च ढिले पडतात, मग काय काम होणार आहे? आपल्याला या कामांत यश येणार नाहीं अशी दहशत मनानें घेतल्यावर मग माणूस झटून इलाज करीत नाहीं व तो त्याच्या हातून होत ही नाहीं. मनुष्यास काम करीन असा दम असला म्हणजे हातास जोर चढतो; कामावर अखेर पावेतों नजर सहज पोहचूं लागते व त्यांतले बारीक बारीक रस्ते सहज सुचूं लागतात. जसजसें काम आपल्या हातीं आलें असें वाटूं लागतें तसतसा जो हुरूप चढतो, तो जो मनुष्य काम आपल्या हातून होत नाहीं हें वेड घेऊन बसला त्याच्या स्वप्नीं देखील दिसावयाचा नाहीं. शेक्सपियर या प्रसिद्ध इंग्रेज नाटककर्त्यानें ही च गोष्ट मनांत आणून आपल्या पात्रांकडून संभाषण करविलें आहे; त्यांत एक अंमळ अधीर गृहस्थ आहे तो म्हणतो "पण आपलें काम फसलें तर?" त्यास धीर देणारी मोठी हिंम्याची त्याची बायको त्यास म्हणते, "हातचें काम खास करावयाचें च असा निश्चय करा, व भरंवसा तिळमात्र सोडूं नका ह्मणजे काम होईल च होईल; कधीं फसणार नाहीं." 'रडत जाईल तो मेल्याची खबर आणील' असें म्हटलें आहे, त्याचा ही अर्थ हा च आहे कीं, हरएक मनुष्यानें काम करितेवेळेस आपण तें खास करूं, असा हुरूप बाळगिला तर च त्यास तें

करण्यास हुशारी असते. आधीं च ज्यानें हातपाय गाळले त्याचें पाऊल कधीं पुढें सरावयाचें नाहीं.

मनांत हुरूप असला ह्मणजे श्रम जड वाटत नाहीं. हुरूप एकाचा पाहून दुसऱ्याला येतो. शिक्षकाचे मनांत हुरूप असला कीं विद्यार्थ्यांच्या मनांत उत्साह उत्पन्न होतो. आणि मी काम करीन असें मनुष्याच्या मनांत बाणलें, ह्मणजे त्याच्या हाताला जोर चढतो आणि काम होऊन जातें. पण निराशेनें उत्साहाचा भंग होतो. थंडीच्या कडक्याचा वारा जमिनीवरून गेला, म्हणजे कशी दशा होते? ज्या ज्या पदार्थांवरून तो वाहतो तो तो पदार्थ करपून जातो. कळ्या सुकून जातात. पानें काळीं ठिक्कर पडतात. आणि जिकडे तिकडे बोडकीं खोडें मात्र राहतात. आणि सर्व शून्य आणि भयाण होऊन जातें. तसा निराशेचा प्रकार आहे. शिक्षकावरून निराशेचा वारा गेला कीं तो शिक्षक, आणि विद्यार्थी, आणि त्यांचें काम, सर्व नाश पावलें च.

या सांगण्यावरून, मनुष्यानें उगीं च फुशारकी मारून काम तृणवत् मानावें, असें कोणीं समजूं नये. ज्याला काम तुच्छ दिसूं लागलें व जो डौल मिरवूं लागला तो फजीती पावला च, असें समजावें. वर जो धीर म्हणून सांगितला तो असला पोकळ डौल नव्हे. धिराचा माणूस नेहमीं चित्तांत सावधपणा बाळगतो; त्यामुळें कधीं घाबरत नाहीं. एखादें संकट आलें तरी तो गोंधळत नाहीं; कारण संकटें येणार च ही गोष्ट तो पक्की ओळखून असतो. संकटाच्या वेळीं तो दम सोडीत नाहीं. कारण आपल्या आंगीं त्यांतून पार पडण्याचें बळ आहे हा भरंवसा त्यास पक्का असतो व त्यामुळें तो बिलकुल कचर खात नाहीं. कधीं कधीं जो माणूस उगा च ओढ्याच्या पाण्यासारखा खळखळ फार करितो, त्याच्या आंगीं या थोरपणाचा लेश ही नसतो. व जो खोटी प्रतिष्ठा मुळीं च मिरवीत नाहीं व सागराप्रमाणें शांत असतो त्याच्या आंगीं हें खरें धैर्य ओतप्रोत भरलेलें असतें. Further qualities Essential to a Schoolmaster

मनुष्याच्या आंगीं हातीं घेतलेलें काम जीव लावून करण्याचा गुण अवश्य असावा. या गुणाशिवाय मनुष्यांत कांहीं अर्थ नाहीं. आणि हा

असेल तर सर्व कांहीं आहे. मनुष्याची बुद्धि किती ही चांगली असो; हा गुण त्याच्या आंगीं नाहीं, तर त्याच्या हातून कांहीं काम होणार नाहीं; आणि मनुष्याची बुद्धि जरी मध्यम प्रकारची असली, आणि हा गुण त्याच्या आंगीं असला, तर त्याच्या बळावर तो अशीं मोठीं कामें करील कीं लोकांनीं उगीच नवल करीत राहावें.

हा—जीव लावून काम करण्याचा—गुण ज्याच्या आंगीं असेल त्याला दुसऱ्या लोकांपासून जसा मान मिळतो तसा इतर कोणत्या ही एका गुणापासून मिळत नाहीं. मनुष्य विरुद्ध पक्षाचा कां असेना; त्याचीं मतें अगदीं उलट कां असेनात; आणि त्याच्या उद्योगापासून आपल्या पक्षाचें पाहिजे तितकें नुकसान कां होईना; जर स्वसिद्धांतांवर त्याची पूर्ण श्रद्धा आहे आणि त्याप्रमाणें तो मनापासून वागत आहे, तर त्याचे शत्रू त्याजविषयीं गोष्ट निघाल्यास बहुमानपुरःसर इतकें तरी खास म्हणतील च कीं "आणखी कांहीं का असेना याच्या वागणुकींत मागेंपुढें कांहीं नाहीं; हा जें करतो तें मनापासून झटून करतो." गुलामगिरी बंद होऊन स्वतंत्रता स्थापन झाली ती त्या कामाच्या पुरस्कर्त्यांनीं अगदीं कसर न करतां झटल्यामुळें झाली. **रग्बी** येथील शाळा अगदीं हलक्या प्रतीची होती, ती पहिल्या प्रतीच्या शाळांचे तोडीस आली, ती **आर्नोल्ड्** साहेबांच्या मनापासून झटण्याच्या गुणामुळें आली. **आर्नोल्ड्** साहेबांवर एकदम मुलांची प्रीति जडे असा त्यांचा स्वभाव नसे. उलट त्यांच्या स्वभावांत असे कांहीं धर्म असत कीं त्यांमुळें विद्यार्थ्यांस त्यांचा कंटाळा यावा. परंतु त्यांच्या अतिशय मनापासून झटण्याच्या गुणापासून सुदैवेंकरून ज्यांना लाभ आणि सुख होई, त्या सर्वांच्या मनांत त्यांजविषयीं या गुणापासून जो मान उत्पन्न होई तो निरंतर जशाचा तसा च राही.

हा मोठा गुण इतर सर्व धंदे करणारांपेक्षां शाळा चालविणार यांच्या आंगीं असणें फार च इष्ट आहे. मुलगा मनापासून झटणार निवडणें, अगर बेफिकीर निवडणें; त्याच्या आंगीं कर्तृत्वशक्ति असणें, अगर आळस असणें; हें बहुत अंशीं जसा त्याच्या गुरूचा दाखला त्याच्या दृष्टीपुढें असेल तसें होणार आहे. आणि त्यामुळें मुलांच्या

आंगीं जे गुण उत्पन्न होणें इष्ट आहे ते गुण गुरूच्या आंगीं असणें ही गोष्ट फार च महत्त्वाची आहे. गुरूच्या आंगीं तरी हा गुण येण्यास, ह्मणजे त्यानें आपलें करावयाचें तें काम मनापासून आणि हुशारीनें करण्यास, त्याची आपल्या कामावर आसक्ति असावी हें अवश्य आहे. पंतोजीनें आपलें काम करणें तें अनन्यभावानें करावें. आपला कायमचा कार्यभाग शिक्षण हा च होय, हा वरचेवर बदलावयाचा नाहीं, अशी मनांत खातरी बाळगावी; आणि निखालस जीव प्राण करून कामांत गढून जावें. कोणत्या ही धंद्याचे कामांत शिक्षणाचे कामाइतका आनंद नाहीं; तसें च इतकें जबाबदारीचें व अवघड काम ही दुसरें नाहीं. तेव्हां या मानानें च, या धंद्यांत जे गृहस्थ पडले असतील त्यांचे मनाचें समाधान ही तसें च विशेष असावें, व आपलें काम करण्यांत ही त्यांनीं तशी च हुशारी दाखवावी व मनापासून झटावें.

एखादें काम जबाबदारीचें व श्रमाचें तर असतें; आणि पुनः त्यापासून आनंद तर होतो. या गोष्टीस रुकार देण्यास कोणी मागेंपुढें करतील हें अशक्य नाहीं; निदान, वरकांतीं दिसण्यांत तरी या गोष्टींत कांहींसा परस्परविरोध दिसतो, असें तरी लोक ह्मणतील च. आणि हें खरें आहे कीं, सगळीं च कष्टाचीं कामें आनंददायक असतात असें नाहीं; आणि जबाबदारी इतकी मोठी असली कीं तिच्या योगें मनुष्य अगदीं दडपून जाईल, तर असल्या जबाबदारीपासून काम करणारांस आनंद होईल असें नाहीं. परंतु अध्यापनाच्या आंगीं हे तिन्ही धर्म आहेत ह्मणजे त्यांत आनंद आहे, श्रम आहेत, आणि जबाबदारी आहे.

शिकवावयाचा विषय पंतोजीला चांगला येतो आहे, वर्गांतल्या मुलांचें आणि त्याचें मन मिळलेलें आहे, असा प्रकार असला ह्मणजे पंतोजीला आपलें काम करण्यापासून शुद्ध आनंद होतो त्याविषयीं फार लिहिण्याची जरूर नाहीं. ज्याला त्या आनंदाचा मुळीं च अनुभव नाहीं, त्याला असा आनंद होईल तरी कसा हें समजणें नाहीं. आणि ज्याला अनुभव आहे त्याला, या आनंदाची किती ही प्रशंसा केली तरी, अतिशयोक्ति केली असें वाटणार नाहीं. क्षणोक्षणीं शाळेंतील विद्यार्थ्यांचीं मनें कशीं विकास पावतात, आणि अनादि कालापासून

भरत आलेल्या ज्ञानभांडाराचे दर्शनानें सुख करून घेण्याची त्यांची शक्ति कशी वाढते, आणि हा प्रकार पाहून शिक्षकाच्या मनाला कसा आनंद होतो, हें बराबर वर्णन करण्याचें कोणाला सामर्थ्य आहे? मात्र हा अध्यापनाचा आनंद करून घेण्याला मनुष्याचा स्वभाव जीव लावून काम करण्याचा आणि उत्साहशील असावा लागतो.

शिकविण्याच्या कामांत श्रम फार आहेत आणि ते ही अवघड प्रकारचे आहेत यामुळें तर शिकविण्यापासून उत्साहशील शिक्षकाला होणाऱ्या आनंदाची वृद्धि च होते. कोणता ही विषय स्पष्ट करून दाखविण्यांत अथवा ग्रंथांतील वचनांचा अर्थ पूर्णपणें विद्यार्थ्यांचे मनांत आणून देण्यास जसजसे श्रम अधिक पडतात, तसतसा त्या विषयांतील अगर वाक्यांतील कठिणपणा जिंकून टाकल्यानें विद्यार्थ्यांचे चेहऱ्यावर चमकूं लागणारा बुद्धीचा उत्कर्ष आणि हर्ष पाहून होणारा शिक्षकाचा आनंद अधिक होतो. ज्याला त्याला जी गोष्ट करतां येते ती करण्यांत काय मजा आहे? ज्या कामास श्रम लागतात, ज्या कामांत सारासारविचार लागतो, त्या कामापासून जो आनंद होतो तो इतर कामापासून होत नाहीं. थोर काम कधीं च सोपें नसतें; आणि मनुष्याला, थोर कामासाठीं नाहीं, तर, जन्माला कशासाठीं घातला आहे?

जबाबदारीची ही गोष्ट श्रमासारखी च आहे. आपल्यावर जबाबदारी आहे असें शिक्षकाला पुरतें समजलें म्हणजे, ज्या कामांत आपण पडलों आहों तें कांहीं हलकेंसलकें नाहीं, त्याची हेलसांड करतां कामा नये, असें त्याच्या मनांत भरतें; तें काम बराबर करण्यासाठीं पाहिजे तसा यत्न त्याच्या हातून झाला म्हणजे त्याला समाधान वाटतें; आणि त्यापुढें होणाऱ्या समाधानाच्या संबंधानें तसा यत्न करतांना ही त्याला संतोष वाटतो.

विद्यार्थ्यांस योग्य शिक्षा लावण्याचें वर्म तीन गोष्टींत आहे असें म्हटलें तरी चालेल. प्रथम विद्यार्थ्यांच्या मनाची प्रवृत्ति कशी आहे हें बारीक नजर ठेवून ओळखावें. नंतर उगी च राहून ती प्रवृत्ति कसकशी वाढत जाते व हरएक कामांत ती आपला गुण कसा करिते, याचें अनुसंधान राखावें. व हरएक विद्यार्थ्यांच्या मनाच्या प्रवृत्ति कशा

आहेत व कोणते प्रसंगीं त्या प्रवृत्तींमुळें त्याचें आचरण कसें होतें, हें पक्केपणीं ओळखिल्यावर मग त्या प्रवृत्ति आपणांस ज्या ज्या मार्गास लावायाच्या आहेत त्या त्या मार्गास युक्तियुक्तीनें लावाव्या. ज्या प्रवृत्ति जन्मतः च असतील त्या अगदीं च मोडून दुसऱ्या उत्पन्न करणें हें अशक्य आहे. पण बेताबेतानें त्या सर्व प्रवृत्ति सोईवर आणून ज्या विषयाकडे त्या लाविल्या असतां विद्यार्थ्यांचें हित होईल, तिकडे त्या लावण्याविषयीं इलाज केला पाहिजे. हे तिन्ही प्रकार विशेषें-करून ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत, ह्मणून त्यांची स्फूर्ति लवकर होण्याकरितां त्यांस क्रमानें, **निरीक्षण, अनुसंधान,** आणि **उन्नयन,** अशीं तीन सांकेतिक नांवें देऊं. हे तिन्ही प्रकार पंतोजीनें लक्षांत ठेविले पाहिजेत. या नांवांच्या अवयवार्थावरून तिन्ही प्रकारांचा बोध सहज होईल.

पंतोजीस मुलें कह्यांत ठेवण्याचें काम साधण्याकरितां त्याच्या आंगीं दृढपणा पाहिजे. इतर गुणांप्रमाणें हा ही गुण आंगचा पाहिजे, ही गोष्ट खरी आहे; व ज्यास मुळीं च नाहीं त्यास शिकवणीच्या गोष्टी सांगून ही व्यर्थ आहे. कारण, त्या गोष्टींप्रमाणें चालण्यास तरी कांहीं दृढपणा आंगीं पाहिजे च. तेव्हां दृढपणा उत्पन्न करण्यासाठीं नियम सांगणें अशक्य च आहे, तरी ज्यांच्या आंगीं ही शक्ति थोडीबहुत आहे, त्यांस ती वाढवितां येण्याकरितां कांहीं नियम देतां येतील. खेरीज कांहीं कांहीं प्रसंगीं, मनुष्याच्या आंगीं दृढपणा मूळचा असून ही, दृढ मनुष्यानें काय करावें याची प्रसंगीं त्यास स्फूर्ति न झाल्यामुळें, त्याचे आंगीं असलेला दृढपणाचा गुण व्यर्थ जातो. याकरितां कांहीं नियम खालीं सांगितले आहेत, त्यांजवर लक्ष ठेविलें पाहिजे. ज्याच्या आंगीं या नियमांप्रमाणें वागण्यापुरता दृढपणा आहे, त्याचा दृढपणा उत्तरोत्तर अधिक वाढत जाईल.

---

## नियम.

१. पुरता विचार केल्याशिवाय कोणता ही हुकूम देऊं नये; परंतु

एकवार हुकूम दिला म्हणजे तो सर्वांनीं पाळला च पाहिजे असा बंदोबस्त ठेवावा; त्यांत अंतर जाहलें तर सहन करूं नये.

२. जो हुकूम तोडिला तरी पारिपत्य करावयाचें नाहीं, असा हुकूम कधीं ही देऊं नये.

३. दिलेला हुकूम कधीं ही विसरूं नये.

यांतील पहिला नियम आहे हा च सर्वांत मुख्य आहे. तो इतका व्यापक आहे कीं, त्याप्रमाणें कोणी वागलें असतां, अस्थिरपणाचा अथवा अव्यवस्थितपणाचा दोष त्याजकडे कधीं ही येणार नाहीं. तसेंच जर तो या नियमाकडे दुर्लक्ष करील तर कधीं ही पेंचांत पडल्याशिवाय राहणार नाहीं. कारण विचार केल्याशिवाय हुकूम देण्याची ज्याला संवय आहे, त्याला नेहमीं असा प्रसंग येतो कीं आपला हुकूम तोडलेला मुकाट्यानें पाहावा, अथवा अन्यायानें शिक्षा देऊन हुकमाचा अंमल करावा. परंतु या दोन्ही गोष्टी करणें अगदीं अप्रशस्त आहे, हें उघड च आहे; याबद्दल आपण एक दाखला घेऊन पाहूं.

एखादे वेळेस पुष्कळ विद्यार्थ्यांनीं नेमलेला धडा तयार केला नाहीं, व पंतोजी, धडा कां तयार झाला नाहीं, तो फार अवघड होता कीं काय, वगैरे बद्दल कांहीं विचार न करितां बोलून गेला कीं, पुनः तुह्मी असे धडा तयार केल्याखेरीज राहिलां तर मी एकूणएकास शिक्षा करीन. धडा अवघड असल्यामुळें पुनः पहिल्याप्रमाणें तो तयार केल्याखेरीज विद्यार्थी वर्गांत येऊन बसले; आतां त्यानें काय करावें? शिक्षा न द्यावी, तर बोललेलें फुकट जातें, आणि मग विद्यार्थी लोकांवर धाक राहतो कसा? बरें, द्यावी, तर अन्याय होतो; इतकें च नव्हे, तर शिक्षा देऊन फळ होत नाहीं. इतक्या विद्यार्थ्यांस एकसारखी शिक्षा देण्यापासून लाभ काय होणार आहे? उलट नुकसान मात्र होणार. थोड्या लोकांना शिक्षा दिली तर तिजपासून त्यांचा अपमान होतो, व ते वाईट वर्तणूक सोडून देतात. परंतु फार मुलांस एकदम शिक्षा दिली ह्मणजे पंतोजीचें आणि विद्यार्थ्यांचें वैर मात्र येतें. व विनाकारण शिक्षा झालेले विद्यार्थी एकत्र झाले ह्मणजे त्या शिक्षेबद्दल हांशा

मात्र पिकतो; व ज्यास शिक्षा मिळते, त्याच्या च बाजूचे सर्व होतात. मुलांना, शिक्षक अन्याय करणारा आहे, असें वाटूं लागलें म्हणजे, एकंदरींत त्याचा धाक कमी होऊं लागतो. लहान मुलें अडाणी असतात, त्यांना न्याय अन्याय कळत नाहीं, असें कोणीं समजूं नये. अन्याय झालेला पाहिला म्हणजे लहान मुलांचें सुद्धां चित्त खवळतें. बहुतकरून विद्यार्थ्यांच्या हातून अपराध झाला ह्मणजे त्यांचें त्यांस समजत असतें; व जरी ते तोंडानें कबूल न झाले तरी, त्या अपराधाबद्दल त्यांस शिक्षा झाली असतां, त्यांना आपणांस शिक्षा झाली हें ठीक च आहे असें वाटतें. परंतु त्यांच्या पदरीं अन्याय नसतां त्यांस शिक्षा केली, अथवा त्यांचा अन्याय असून त्याविषयीं त्यांची खातरी करून न दिली व त्यांच्या मनांत आपणांस विनाकारण शिक्षा झाली ही च कल्पना शिलक राहूं दिली, तर परिणाम बरा होत नाहीं. पंतोजीवर त्यांचा भरंवसा असतो तो नाहींसा होतो, त्याच्या ठिकाणीं त्यांची पूज्यबुद्धि असते ती नाहींशी होते, त्याजविषयीं मान सर्व उडून जातो. एक वेळ असें झालें ह्मणजे पहिल्याप्रमाणें पंतोजीचें व त्यांचें मन मिळणें कठिण. याकरितां मुलांस जें आपण करावयास सांगणार तें बरोबर आहे किंवा नाहीं, व त्यांच्या हातून तें होण्यासारखें आहे किंवा नाहीं, याबद्दल पुरता विचार करावा; त्यांत अंमळ वेळ अधिक लागला तरी चिंता नाहीं; त्यापासून हित च होईल. मुलास विनाकारण शिक्षा झाल्यापासून होणारे, व त्यास मला विनाकारण शिक्षा झाली असें वाटल्यापासून होणारे, दोन्ही वाईट परिणाम सहज बंद होतील. यासाठीं च मुलांच्या हातून जें मुळीं च होण्यासारखें नाहीं तें करण्यास त्यांस कधीं सांगूं नये; व जें आपल्या हातून घडण्यासारखें नाहीं, त्याचा धाक ही कधीं घालूं नये. ही गोष्ट दिसतांना अगदीं उघड दिसते, परंतु नकळत पंतोजी लोक असल्या चुका शेंकडों वेळां करितात. एखादे वेळेस मुलें वर्गांतून फार वेळ "बाहेर जाऊं का जाऊं का," ह्मणून विचारूं लागलीं म्हणजे, पंतोजीस राग येऊन तो म्हणतो, "आतां शाळा सुटेपावेतों कोणते ही कामास कोणास ही बाहेर धाडावयाचें नाहीं." थोडासा वेळ

गेला म्हणजे त्याचें त्याला च वाटूं लागतें कीं, आपण जें बोलून गेलों तें बराबर बोललों नाहीं. यांत खरीं खोटीं सारीं च मुलें सारखीं शिक्षेंत सांपडलीं; हें ठीक झालें नाहीं. नाहीं तर, वरच्यावर 'नाहीं बाहेर जावयाचें' हा पाढा जितका वेळ मुलगा विचारावयास येईल तितका वेळ वाचावयाचा, व पोरें जाण्यासाठीं जिकीर करूं लागलीं ह्मणजे, दर वेळेस त्यांना स्वस्थ बसविण्याच्या त्रासाला तो कंटाळतो; व एखादा मुलगा फार च अडून बसला ह्मणजे सहज म्हणतो 'बरें, तूं तेवढा जा.' तो गेला कीं त्याच्या मागें दुसरा आला च; त्याला नाहीं म्हणण्याची पुनः पंचाईत. सरासरी पहिल्या नियमाची माती होऊन जाते. असें च आणखी कांहीं कामांत होऊं लागलें कीं, झाली बंडाळी. याकरितां कोणता ही हुकूम देणें असेल, अगर कोणत्या ही गोष्टीबद्दल निश्चय सांगणें असेल, तर प्रथम त्याबद्दल खूब विचार करावा. आपण सांगणार तें बराबर आहे कीं नाहीं, व मुलांस त्याप्रमाणें खास वागतां येईल कीं नाहीं, हें प्रथम च पक्केपणीं पहावें; आणि एकवार सांगितलें म्हणजे मग ताबडतोब सर्वांकडून बराबर त्याप्रमाणें मनापासून करून च घ्यावें, कधीं सोडूं नये.

सृष्टींत मनुष्यांच्या व पशूंच्या कृतींचीं फळें जशीं अनिवार्य आणि सदासर्वकाळ एकसारखीं असतात तशीं विद्यार्थ्यांच्या अपराधाबद्दल जीं पारिपत्यें करावयाचीं तीं कायम एकसारखीं असावीं. मुलानें निखाऱ्याला हात लावला ह्मणजे भाजतो; पुनः लावला, पुनः भाजतो. याप्रमाणें नियमानें झालें ह्मणजे निखाऱ्याला हात लावूं नये हें त्याला बरोबर समजतें. त्याप्रमाणें च शिक्षकानें अमुक कृत्याचें अमुक पारिपत्य होईल असें एकदां सांगितलें म्हणजे, तें व्हावयाचें च, कधीं चुकावयाचें नाहीं च, असें अनुभवास आलें ह्मणजे, सृष्टिकृत नियमांला जसे लोक मानतात, तसे विद्यार्थी त्याच्या नियमांना मानतात.

कांहीं पंतोजीलोकांना अशी खोड असते कीं प्रथम मुलांस एक हुकूम सांगावा, आणि मग तो हुकूम बराबर आहे किंवा चुकीचा आहे याबद्दल मुलांशीं वाटाघाट करीत बसावें; मग त्यांनीं तो हुकूम बराबर नाहीं ह्मणून कुरकुरत असावें, व यांनीं तुम्हीं तो ऐकला च

पाहिजे, म्हणून सांगत असावें; ही खोड अति वाईट आहे. हा क्रम सुरू झाला म्हणजे मोठा उत्तम शिक्षक असला तरी तो आपली हुकमत नाहींशी करून घेईल यांत दिकत नाहीं. एक वेळ हुकूम सुटला म्हणजे मुलांनीं तो बिनहरकत ऐकला च पाहिजे. या नियमास कोणत्या ही तऱ्हेचा अपवाद असण्याचें कारण नाहीं. व अपवाद केला कीं हुकमत बुडाली च. एकदा हुकूम दिला म्हणजे मग तो हुकूम कां दिला, त्यानें काय होणार, याचा विचार करण्याची वेळ उरली नाहीं च. पूर्वीं सांगितलें च आहे कीं, हुकूम देणें तो च विचारपूर्वक द्यावा. त्याप्रमाणें हा विचार पंतोजीनें आपल्या मनांत पक्केपणीं केलेला असला पाहिजे. आपली हुकमत बिनतक्रार चालते किंवा नाहीं हें लक्षपूर्वक पाहून, नसेल तर तो दोष काढून टाकावा; या कामीं फार लोकांची कसूर दिसून येते, म्हणून या गोष्टीकडे मुद्दाम विशेष लक्ष ठेविलें पाहिजे. ज्या पंतोजीच्या आंगीं हा गुण कमी आहे तो अध्यापनाच्या कामीं कितीही उत्तम असला तरी त्याच्या हातून मुलांस शिक्षा कधीं च चांगली लागणार नाहीं. त्याच्या हाताखालीं तीं अव्यवस्थित मात्र होतील. कधीं कधीं आपला हुकूम एखाद्या मुलानें बराबर ऐकिला नाहीं तर पंतोजी मनांत म्हणतो, "जाऊं दे, एका पोरासाठीं आतां कोठें कटकट करीत बसा. एखाद्या वेळेस एखाद्यानें न ऐकिलें म्हणून काय होणार आहे ? घेऊं पुढें पाहून" असें म्हणून तेव्हांचा त्रास चुकवावा असा त्यास मोह होतो. परंतु या मोहांत तो पडला कीं त्याची अवघी हुकमत बुडाली असें समजावें. एकदा विद्यार्थ्यांच्या समजुतींत असें आलें कीं, एखाद्या वेळेस पंतोजीचें न ऐकिलें तर चालतें, म्हणजे जसजशी सवड सांपडेल तसतशीं तीं त्याचें न ऐकण्याची वेळ साधूं लागतात. ही संवय विद्यार्थ्यांना लागली ह्मणजे जी कटकट चुकवावयास ह्मणून तो कान्हाडोळा करितो ती कटकट हजारपट त्याच्या माथीं बसते. या मुलांचा बंदोबस्त ठेवावयाच्या कामीं 'आळशास दुप्पट काम' या ह्मणीप्रमाणें होतें. जो थोडी मेहनत पहिल्यानें च करितो त्याला ती पुढें फार पडत नाहीं, व थोडीशी चुकवावयास

जातो त्यास दसपट पडते. शिक्षकांच्या आंगीं हा दोष असल्यामुळें किती अनर्थ होतात हें इकडे लक्ष पोंहचविलें ह्मणजे इतकें उघड होतें कीं, या विषयावर अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

जो मनुष्य आपण सांगितलें तें मुलें ऐकतात कीं नाहीं ह्याकडे कांहीं लक्ष देत नाहीं, त्याला पुढें त्या मुलांपासून किती त्रास व दुःख होतें, याबद्दल **आबट्** साहेबांनीं "**टीचर्**" नांवाच्या आपल्या ग्रंथांत दाखला देऊन लिहिलें आहे तें खालीं लिहिल्याप्रमाणें.

"एका गृहस्थानें लिहून ठेविलें आहे कीं मी एकदां घोड्यावर बसून फिरावयास गेलों होतों, तों वाटेनें फार पाऊस लागला. तेव्हां शेजारीं एके शेतकऱ्याचा वाडा होता, त्यांत मी गेलों. तेथें पांच सात भारी उच्छृंखल व दांडगीं पोरें धुडगूस घालीत होतीं. त्यांनीं असा दंगा मांडला होता कीं, आगटीपाशीं त्यांचा म्हातारा बाप शेकत बसला होता त्याजपाशीं घटकाभर बोलेन म्हटलें तर एकमेकांचें बोलणें देखील आह्मांस ऐकूं येईना. तरी मी बोलतों आहें पण ऐकूं येत नाहीं असें त्या ह्मातार्‍यास समजलें; तेव्हां मोठ्यानें ओरडून तो म्हणाला 'गप्प बसारे पोरांनो.' पोरांनीं ह्मातारा काय म्हणतो तें ऐकिलें सुद्धां नाहीं. पुनः अंमळशानीं ह्मातारा आणिक चवताळून ओरडला 'कारट्यांनो, तोंडें मिटतां, कां मारूं एकेकाला चाबूक ? तुमच्या गळ्याशपथ, खचीत मारीन बरें का.' पण पोरांना या धमक्यांची संवय होती; त्यांनीं भांडण व आरडाओरड अधिक च चालविली. शेवटीं म्हातारा मला म्हणाला 'असलीं द्वाड मुलें कोठें ही नसतील, नाहीं ? कांहीं केल्यानें तीं माझें ऐकत च नाहींत' आतां खरें पाहूं गेलें असतां, म्हातार्‍याला पोरें द्वाड मिळालीं असें म्हणण्यापेक्षां त्या पोरांना बाप च वाईट मिळाला असें म्हणावें; कारण त्याचें शिक्षण असें पडलें कीं पोरांनीं कधीं कोणाचें ऐकूं नये हें त्या शिक्षणापासून त्यांना उत्तम यावें. त्यानें नित्य त्यांना हुकूम करावा व धमकी द्यावी आणि त्यांपैकीं कोणती च गोष्ट अमलांत आणण्याचें त्याच्या मनांत नसावें. ही गोष्ट एकवार मुलांना समजल्यावर तीं त्याचें कसें ऐकतील ?"

आतां इतके वाईट शिस्तीनें कोणी पंतोजी वागतात असें नाहीं;

हा दाखला जरा फाजील आहे. पण यावरून असें सहज लक्षांत येईल कीं, पंतोजीनें आपण सांगितलेली गोष्ट विद्यार्थ्यांनीं न ऐकिलेली पाहून तिकडे दुर्लक्ष केलें म्हणजे तो आपलें वजन घालवितो इतकें च नाहीं, पण एकंदरींत त्याच्या विद्यार्थ्यांना हुकमतींत राहावें कसें हें वळण च राहत नाहीं, व तेणेंकरून पुढें फार च पंचाईत व त्रास होतो आणि ते विद्यार्थी थोरपणीं अब्रूदार होण्यास अंतरतात.

दुसरा नियम सांगितला आहे तो असा आहे कीं **जो हुकूम तोडिला तरी पारिपत्य करावयाचें नाहीं, असा हुकूम कधीं ही देऊं नये.** हा नियम पाहतां च कोणी ही शिक्षक म्हणेल कीं, "यांत तुम्हीं काय सांगितलें ? जें मुलांनीं करावें असें आमच्या मनांत नाहीं तें आम्ही त्यांस करावयास कशासाठीं सांगूं." ही गोष्ट खरी आहे व उघड रीतीनें सांगितला म्हणजे हा नियम अगदीं सर्वांच्या ध्यानांत येण्यासारखा दिसतो खरा, परंतु काम करूं लागलें म्हणजे लोक तो नेहमीं विसरतात. शिक्षकांचें काम सारखें पाहत बसलें तर, फार तर काय, पण एक देखील शिक्षक असा सांपडणार नाहीं कीं, जो सबंध एक तरी दिवस आपलें काम हा नियम एकदां सुद्धां मोडल्याशिवाय करील.

वर्ग शिकवितांना एखादे वेळेस शिक्षक सहज "पुस्तकें मिटा," म्हणून सांगतो. असें सांगितल्यावर दोन तीन पोरें तरी हळू च पुस्तकांकडे पाहात असतात. हें त्याच्या लक्षांत च येत नाहीं. तसें च एखाद्या वेळेस शिक्षकाच्या मनांत फळ्यावर कांहीं समजावून दाखवावयाचें असलें म्हणजे तो त्यांस सांगतो "आतां उदाहरण करूं नका, फळ्याकडे पहा." आणि आपण फळ्यापाशीं जातो; पण सर्व मुलें उदाहरण करावयाचें सोडून देऊन आपणाकडे पाहूं लागलीं आहेत कीं नाहींत हें पाहण्याचें सहज विसरून जातो. याचा परिणाम असा होतो कीं हा उदाहरण समजावून देऊं लागतो, व कांहीं विद्यार्थी भलतें च कांहीं करीत असतात.

असें हुकुमाकडे दुर्लक्ष झालें म्हणजे शिक्षकाची हुकमत बिलकुल राहत नाहीं; व मुलांस शाळेंत शिक्षा म्हणून जी लागावयाची ती मुळीं

च लागत नाहीं. याला उपाय पाहूं गेलें तर थोडा आहे व तो नेहमीं शिक्षकाच्या हातीं आहे. दरएक विद्यार्थी सर्व काम सोडून आपणाकडे पाहूं लागला आहे, हें पक्कें पाहिल्याशिवाय एक शब्द बोलूं नये, किंवा अक्षर ही फळ्यावर काढूं नये. मागें एकवार सांगितलें च आहे कीं, विद्यार्थ्यांचें दुर्लक्ष झालें असें वाटलें तर सर्वांचें लक्ष लागे तोंपर्यंत कांहींएक केलें नाहीं म्हणजे झालें. या गोष्टी अगदीं साध्या दिसतात, पण साध्या आहेत म्हणून त्यांच्या आंगीं गुण कमी आहे असें समजूं नये. ज्या मनुष्याचे आंगांत कांहीं वजन म्हणून आहे, त्यानें हे नियम पाळिले म्हणजे काम उत्कृष्ट रीतीनें चाललें च पाहिजे. व ज्याच्या आंगांत कांहीं च वजन नाहीं, त्याला पुष्कळ सांगूनही काय उपयोग आहे? सारांश ह्या गोष्टी जरी साध्या दिसल्या तरी त्या सर्वांनीं लक्षांत ठेविल्या पाहिजेत.

तिसरा नियम सांगितला होता तो हा कीं—**दिलेला हुकूम कधीं ही विसरूं नये.** मागें सांगितलें आहे कीं पंतोजी एखाद्या वेळेस 'ही गोष्ट पुनः घडली तर जे चुकतील त्या सर्वांस झाडून एकसारखी शिक्षा करीन' वगैरे धमक्या देतात, व त्या ते सहज च विसरून जातात. कारण त्याप्रमाणें वर्तण्याचें मुळीं च त्यांच्या मनांत नसतें; उगीच बोलावयाचें म्हणून बोलतात. कधीं कधीं असें होतें कीं पंतोजींच्या हातीं एक काम असतें व तें करितां करितां तो दुसऱ्या एखाद्या गोष्टीबद्दल कांहीं करावयास सांगून जातो तें त्याच्या ध्यानांत राहत नाहीं; मग मुलें पाहिजे तर त्याप्रमाणें वागतात, नाहीं तर वागत नाहींत. या रीतीनें कांहीं हुकूम दिले म्हणजे पुढें केव्हां तरी असा प्रसंग येतो कीं त्या वेळेस सर्वांनीं ऐकिला च पाहिजे असा हुकूम करावयाचा असतो; आतां हा हुकूम महत्त्वाचा आहे ही गोष्ट शिक्षकास माहीत असते; पण विद्यार्थ्यांना सर्व हुकूम सारखे च. त्यांना त्यांतील भेद न समजल्यामुळें ते वहिवाटीप्रमाणें त्या हुकुमाची ही हेळसांड करितात; पण या वेळेस पंतोजी फार रागावतो, व त्यांना शिक्षा ही करितो. हें पाहून त्यांना विलक्षण चमत्कार वाटतो; व हा कोणत्या वेळेस काय करितो, याचा कांहीं नेम च नाहीं; असा त्यांचा

त्याजवर बेभरंवसा होतो. अशा शिक्षकाच्यानें मुलांचा बंदोबस्त कधीं होणार नाहीं, व त्यांस चांगली शिक्षा कधीं लागणार नाहीं. चांगल्या शिक्षेचें लक्षण हें आहे कीं, वडिलांनीं अगर योग्य अधिकाऱ्यांनीं जी आज्ञा केली ती पाळली च पाहिजे, या समजुतीनें विद्यार्थ्यांनीं ती पाळावी; न पाळली असतां पारिपत्य होईल, हें भय मनांत येऊन मग त्याप्रमाणें वागण्यांत अर्थ नाहीं. त्यांला अभ्यास च असा पाहिजे कीं योग्य ठिकाणची आज्ञा समजली कीं तीप्रमाणें वागणें हें च आपलें काम आहे, असें त्यांच्या मनांत यावें. अशी मुलांस संवय लागेल अशा प्रकारची शिक्षकानें वागणूक ठेविली पाहिजे; व आपण दिलेल्या हुकुमाची त्यास विस्मृति होऊं लागेल तर ही गोष्ट त्याच्या हातून कधीं कडेस जाणार नाहीं. तसें च जो आपण मुलांस काय सांगितलें तें वारंवार विसरतो त्याच्या वर्तणुकेंत सारखेपणा कधीं राहणार नाहीं. एक वेळ तो सांगितलेलें न ऐकिल्याबद्दल फार शिक्षा करील व दुसरे वेळेस तिकडे त्याचें लक्ष देखील जाणार नाहीं. असें झाल्यानें, मुलांस जी योग्य शिक्षा लागणें अवश्य आहे, ती कधीं लागणार नाहीं व त्यांचें अध्ययन ही व्हावें तसें होणार नाहीं.

हा नियम मोठमोठ्या गोष्टींत सहसा शिक्षक विसरत नाहींत. परंतु नित्यशः ज्या लहान सहान हजारों गोष्टी ते विद्यार्थ्यांस करावयास सांगतात, त्यांत फार विसरतात. वर्ग चालवितांना कित्येक शिक्षक लोक तर एकसारखे हा नियम मोडीत असतात. एकदां एक शिक्षक अंकगणित शिकवीत होता त्याचा प्रकार दृष्टीस पडला तो येणेंप्रमाणें— त्यानें सांगितलें कीं ज्याचें उदाहरण होईल त्यानें तें होतां च वर जावें. हें सांगणें ठीक होतें. एक तर त्यामुळें मुलांना उदाहरण जलद करावयास सहज उत्तेजन यावयाचें; दुसरें जलद कोण व चेंगट कोण हें पंतोजीस सहज समजावयाचें. व तिसरें पाट्या पाहतांना ज्यांनीं उदाहरण केलें ते अनायासें च एका ओळीनें सांपडावयाचे. या हुकुमाप्रमाणें ज्यांचें ज्यांचें उदाहरण संपलें ते ते पाळीपाळीनें वर गेले. मग पंतोजीनें सांगितलें कीं जितके वर गेले आहेत, तितक्यांनीं पाट्या दाखवाव्या; आणि आपण पाट्या पाहूं लागला. आतां खरोखरी म्हटलें

ह्मणजे जितके वर गेले होते, तितक्यांच्या पाट्या त्यानें पाहाव्या. इतरांच्या पाहण्याचें कारण नव्हतें. परंतु तो पाट्या पाहूं लागला तो शेवटपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं दाखविल्या त्यांच्या पाहात च सुटला. त्यामुळें त्यानें पहिल्यानें जे दोन हुकूम दिले ते दोन्ही त्यानें आपल्या हातानें च मोडल्यासारखे केले. प्रथम, ज्या मुलाचें उदाहरण होईल त्यानें वर जावें असें त्यानें सांगितलें होतें, तें उदाहरण होऊन ही जे खालीं च बसले होते त्यांनीं ऐकिलें नाहीं; त्याबद्दल त्यानें कांहीं च तजवीज केली नाहीं. दुसरें जे वर गेले होते त्यांनीं मात्र पाट्या दाखवाव्या, असें जें गर्भित सांगणें होतें तें मोडून ज्यांनीं मागाहून पाट्या दाखविल्या त्यांच्या ही पाट्या पाहिल्यामुळें, त्याची आज्ञा मोडिली तरी त्याला कांहीं वाटत नाहीं असें मुलांच्या मनांत वागावयास सहज च कारण झालें.

वर सांगितली ही गोष्ट क्षुल्लक आहे असें कोणी ह्मणेल, परंतु ती कमी महत्त्वाची आहे असें समजूं नये. सामान्य व्यवहारांत काय किंवा शाळा चालविण्याच्या कामांत काय, लहान लहान गोष्टी दिसतात त्यांजकडे दुर्लक्ष करून उपयोग नाहीं. त्यांजकडे नेहमीं चांगलें चित्त दिलें पाहिजे. कारण चुकी जरी लहान झाली तरी तिचें मूळ खोल असतें; व त्यापासून तशा कितीक चुक्या होण्याचा संभव असतो. खेरीज अशा चुक्या वरचेवर होत गेल्या, ह्मणजे च 'खोड' असें ज्यास ह्मणतात ती उत्पन्न होते. किंवा आधीं च खोड बनून राहिली असल्यामुळें या चुक्या होत असतात. कसें ही असलें तरी त्यांपासून शिक्षकाचें काम बराबर न चालून विद्यार्थी लोकांस सुशिक्षा म्हणून जो संस्कार आहे, तो लागत नाहीं. या क्षुल्लक गोष्टी दिसतात त्याविषयीं एका ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं जोंवर त्यांजवर नजर पोहंचत आहे, व त्या संभाळल्या जात आहेत, तोंवर त्या खरोखर च किरकोळ आहेत. परंतु त्यांजकडे दुर्लक्ष केलें म्हणजे त्या च मोठ्या होतात. 'कांट्याचा नायटा' होतो, म्हणून जी ह्मण आहे, त्याप्रमाणें ही गोष्ट आहे. विद्यार्थ्याची काय किंवा शिक्षकाची काय चुकी आरंभीं लहान च असते, परंतु तिजकडे लक्ष न दिलें ह्मणजे ती च व-

ळावून पक्की होऊन बसते. फार तर काय, जर एखादा शिक्षक मोठा विद्वान् आहे, परंतु त्याला लहान सहान गोष्टींस जपण्याची संवय नाहीं. व दुसरा माणूस विद्वत्तेंत अंमळ कमी आहे, परंतु किरकोळ गोष्टींकडे फार जपून चित्त ठेवितो; तर हा जो पांडित्यांत अंमळ कमी म्हणून सांगितला, त्याला जसें यश येईल, तसें त्या विद्वान् गृहस्थास येणार नाहीं; व त्याला थोडा त्रास सोसावा लागेल आणि या विद्वान् गृहस्थास अधिक त्रास पडेल.

वर जें सांगितलें आहे त्या सर्वांचा सारांश इतका आहे कीं पंतोजीच्या आंगीं दृढपणा अवश्य पाहिजे. हा दृढपणा कामापुरता सर्वांस संपादन करितां येईल. दृढपणानें वागलें असतां पंतोजीच्या कहांत विद्यार्थी पूर्णपणें राहतील. ज्या मनुष्याच्या कहांत आपले विद्यार्थी नाहींत त्याच्या हातून त्यांस चांगली शिक्षा लावणें अथवा शाळेचा बंदोबस्त ठेवणें या दोन्ही गोष्टी घडणें नाहींत.

या भागांत विद्यार्थ्यांनीं कांहीं तक्रार न काढितां शिक्षकाचे हुकमाप्रमाणें च वागलें पाहिजे म्हणून वगैरे सांगितलें आहे; परंतु त्यांत देखील सारासार विचार करण्यासारखीं वारंवार स्थळें येतात; तिकडे शिक्षकानें, चांगलें लक्ष पुरविलें पाहिजे. सारे च विद्यार्थी सारखे असतात असें नाहीं. एखादा असा द्वाड असतो कीं त्यावर पंतोजीचा अंमल चालत नाहीं. अशा अवघड ठिकाणीं पंतोजीनें आपला व विद्यार्थ्यांचा उघड मोकाबला न होई, अशा युक्तीनें तजवीज केली पाहिजे जेव्हां असें वाटेल कीं एखादा विद्यार्थी सांगितलेलें खास ऐकणार नाहीं, तेव्हां त्याला न सांगावें, हें च शहाणपण होय. जसें एखादे वेळेस जर पंतोजीस वाटलें कीं अमुक एक मुलाला हातावर छड्या देणें हें रास्त आहे; परंतु त्याच्या स्वभावावरून ह्मणा, किंवा इतर कांहीं गोष्टींवरून म्हणा, असा संशय येईल कीं त्याला "छड्या घे" म्हटलें असतां तो खास घेईल असें नाहीं, तर त्याला ती शिक्षा घे ह्मणून न म्हणणें हें च उत्तम. दुसऱ्या एखाद्या प्रकारें शिक्षा करावी; 'छड्या घे' म्हणून त्यानें न घेण्याचा प्रसंग कधीं आणूं नये. परंतु जर चुकून एक वेळ छड्या घेतल्या पाहिजेत असें आपण म्हणून चुकलों, तर मग

पुढें कोणताही दुसरा विचार करण्याचा समय राहिला नाहीं. मग तो नाहीं म्हणेल तर, नाहीं म्हणण्याबद्दल कांहीं तरी शिक्षा करून पुन: त्यास छड्या घेण्यास सांगितलें च पाहिजे. याउपर ही त्यानें आपला हट्ट सोडिला नाहीं, तर त्यास शाळेंतून काढिलें पाहिजे, त्याशिवाय इलाज च नाहीं. कारण इतक्या पल्यावर गोष्ट येऊन पोंहचल्यावर पंतोजीनें मागें सरणें हें त्याच्या अधिकारास लांछनास्पद व घातक होय. व ज्या विद्यार्थ्यानें एकदां आपल्या पंतोजीचा राग एथपर्यंत जिंकला, त्याचें त्या पंतोजीच्या हातून कधीं च कल्याण व्हावयाचें नाहीं; उलट त्यास वाईट शिक्षा लागून तो बिघडेल मात्र. याकरितां पुन: तो पंतोजी व तो विद्यार्थी एकत्र नसावे हें च उत्तम.

वर लिहिलेल्या मासल्याची गोष्ट एक वेळ एका मोठ्या शाळेंत घडून आली. त्या शाळेंत मुलें सुमारें दीडशें होतीं; व शिक्षक आठ होते. तेथें एका विद्यार्थ्यानें कांहीं फार मोठा अपराध केला. तेव्हां दिलेली शिक्षा सर्वांस समजावी म्हणून शाळेचें काम बंद करून पंतोजीनें त्या मुलास छड्या घेण्याकरितां हात पुढें कर म्हणून सर्वांसमक्ष सांगितलें; परंतु त्या विद्यार्थ्यानें साफ नाहीं म्हणून सांगितलें; तेव्हां अर्थात् पंतोजीचें यानें ऐकिलें नाहीं, ही गोष्ट सर्व लहान थोर विद्यार्थ्यांनीं पाहिली. शिक्षक विचारी व दृढ अंत:करणाचा होता. त्यानें विद्यार्थ्यास आपल्या गैरवर्तणुकीचा पस्तावा होऊन त्यानें पुन: नीट रीतीनें वागावें, असें मनांत आणून पुन: त्यास हात पुढें कर म्हणून अधिक स्पष्टपणें सांगितलें. पण पुन: देखील त्यानें हात पुढें केला नाहीं. इकडे मुलांस मध्यें दहा मिनिटें सुटी द्यावयाची वहिवाट होती, त्या सुटीची घंटा झाली; तेव्हां पंतोजीनें त्या मुलास खालीं बसविलें, व इतरांस चालीप्रमाणें सुटी दिली. मुलें गेल्यावर पंतोजीनें त्या मुलास समजावून सांगितलें कीं माझा हुकूम त्वां मोडिला याबद्दल तुला शिक्षा करणें भाग आहे; असें म्हणून त्यानें त्याच्या आंगावर छड्या मारून त्याला यथायोग्य शिक्षा केली, व आपल्या जाग्यावर बसावयास सांगितलें. थोड्या वेळानें सर्व मुलें परत आलीं; तीं सर्व व्यवस्थितपणें आपआपल्या ठिकाणीं बसतां च, पंतोजीनें त्या अपराधी विद्यार्थ्यास पुन: बो-

लाविलें, व आपल्या समोर उभें करून पुनः पहिल्याप्रमाणें च छड्या घेण्याकरितां हात पुढें कर ह्मणून सांगितलें. सांगतां च त्यानें हात पुढें केला व पंतोजीनें ज्याप्रमाणें शिक्षा त्यास द्यावयाची म्हणून पूर्वी ठर-विलें होतें त्याप्रमाणें शिक्षा दिली. अर्थात् सर्व च तंटा मिटला. पुढें कोणी त्याविषयीं एक अक्षर सुद्धां बोललें नाहीं; व सर्व काम पहिल्या-प्रमाणें यथास्थित चाललें. एवढा प्रयास पडला खरा, परंतु काम झालें तें असें पक्कें झालें कीं पुनः तिकडे पाहण्यास च नको. असें झाल्यावर पुनः विद्यार्थी पंतोजीची आज्ञा मोडील, असें कधीं च होणार नाहीं. सारांश—जमेल तेथपर्यंत इतक्या निकरावर गोष्ट आणूं नये, पण आली च तर तिचा शेवट असा नीट रीतीनें च लावावा, हें पक्कें ध्यानांत ठेवावें.

पंतोजीच्या आंगीं दृढपणा असावा याबद्दल फार विस्तारानें सांगि-तलें. कारण तो पंतोजीच्या आंगीं असेल तर त्याच्या हातून कांहीं तरी होईल, व नसेल तर कांहीं च होणार नाहीं. असें या दृढपणाचें माहात्म्य आहे.

शाळेंत बंदोबस्त नीट राहण्याकरितां एका इंग्रेजी ग्रंथांत शिक्ष-कास कांहीं सूचना दिल्या आहेत त्या उपयोगीं आहेत म्हणून त्यांचें भाषांतर एथें दाखल केलें आहे तें येणेंप्रमाणें:—

१ कोणते नियम अमलांत आणणें इष्ट आहे याचा प्रथम पूर्णपणें निश्चय करावा आणि मग ते नियम खास पाळावे.

२ अधिक महत्त्वाचे नियम लिहून ठेवावे ह्मणजे त्यांविषयीं को-णाच्या मनांत भ्रांति राहणार नाहीं. ते दरएक वर्गांत सहज दिस-तील अशा ठिकाणीं लावून ठेवावे. ते थोडे असावे, लहान लहान अ-सावे आणि असंदिग्ध असावे. ते वारंवार बदलूं नयेत.

३ अमलांत आणतां येणार नाहींत असे नियम करूं नयेत. मु-लांनीं नियम मोडले आणि त्यांना शिक्षा झाली नाहीं, म्हणजे ते नियम अमलांत आणण्याचें ज्याचें काम असेल, त्याजविषयीं त्यांच्या मनांत मान राहत नाहीं, आणि तशी च शिक्षा चुकावया जोगी असेल तेथें नियम मोडण्याचा मोह त्यांना होतो.

४ जेव्हां जेव्हां हुकूम करावयाचा तेव्हां तेव्हां सर्वांनीं तो मा-

नला किंवा नाहीं हें बरोबर पाहावें. आणि तो बरोबर अमलांत आला असें पाहिल्याशिवाय दुसरें कांहीं करूं नये. प्रथम असें वाटेल कीं हे पाहण्याकरितां थांबल्यानें वेळ फुकट जातो; परंतु एकंदरींत त्यामुळें वेळ ही थोडा लागतो आणि मेहनत ही थोडी पडते. जर हुकूम करण्यांत हांसल असलें तर तो अमलांत आला किंवा नाहीं हें पाहण्यांत ही हांसल असलें च पाहिजे. शिक्षक करीन ह्मणेल तें करील च असा आहे, किंवा मनाचा लेचापेचा आहे, तें विद्यार्थी तेव्हां च ओळखतात. आणि लेचापेचा आहे असें समजलें म्हणजे त्याच्या हुकुमाप्रमाणें वागल्यानें त्रास व्हावया जोगा असला तर ते त्या पंचाइतींत पडत च नाहींत. पण जर त्यांना समजलें कीं आपण जें करायाला सांगितलें तें बराबर करून घेतल्याशिवाय कधीं सोडावयाचा नाहीं असा हा माणूस आहे, तर ते मुकाट्यानें जें करावयाला पाहिजे तें करावयाच्या मार्गाला लागतात. जसे सृष्टिजन्य नियम चुकवितां येत नाहींत म्हणून मनुष्य त्यांप्रमाणें राहण्याची तजवीज करतो तशी च ते असल्या पंतोजीच्या नियमांबद्दल ही तजवीज ठेवतात.

५ आपण दिलेला हुकूम तोडावा असें विद्यार्थ्यांस वाटणार आहे असा गर्भित अर्थ निघेल असें बोलूं नये. धमकावणीच्या बोलण्यानें एखादे वेळेस धाक पडण्याचें एकीकडे च राहतें, आणि उलटें जे कोणी विद्यार्थी जरा धीट असतील त्यांना जें काम करूं नये म्हणून सांगितलें असेल तें करून तर पाहूं असें वाटतें. खेरीज गुरुशिष्यांमध्यें जी परस्पर प्रीति असावी, जो एकमेकावर भरंवसा असावा, ती प्रीति आणि तो भरंवसा, आणि वारंवार धमकी देणें यांत परस्पर विरोध आहे. आपला हुकूम अमलांत आणण्यास विद्यार्थी उत्सुक आहेत असें घेऊन चालावें आणि विद्यार्थ्यांना स्वतःची पत राखण्यासाठीं हुकूम मानावयाला लावावें हें फार बरें होय. शिक्षेच्या भयानें मात्र त्यांनीं आपण दिलेल्या हुकुमाची अमर्यादा करूं नये असा प्रकार असण्यांत कांहीं मजा नाहीं.

६ जो हुकूम करावयाचा तो दृढ व गंभीर स्वरानें करावा. फार ओरडूं नये. त्याच त्याच गोष्टीचा वारंवार उच्चार करूं नये. कोणी ही

आज्ञा मानतात ते ती मोठ्यानें ओरडून केली आहे किंवा पुष्कळ वेळा तिचा उच्चार केला आहे ह्मणून मानीत नाहींत; परंतु आज्ञा जेथून निघत आहे तेथें कर्तृत्वशक्ति जबरदस्त आहे आणि ही आज्ञा मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशी खातरी असते म्हणून मानतात. चांगली बंदोबस्ताची शाळा असली ह्मणजे पुष्कळ गोष्टी करावयाला मुळीं बोलून सांगावें लागत च नाहीं. उठणें, बसणें, जागा बदलणें वगैरे कामें हाताच्या वगैरे खुणांनीं च चालतात. धड्याचें काम चालत असतां तर बंदोबस्त राखण्याचें आणि दुसरीं लहानसान कामें सांगण्याचा प्रकार नुसत्या डोळ्याच्या इशाऱ्यावर होऊन जातात.

७ पुस्तकें अगर वह्या घेणें किंवा ठेवणें, पाट्या घेणें किंवा ठेवणें, नंबर बदलणें, वर्गांतून बाहेर जाणें, वगैरे कामें नेहमीं एका नेमलेल्या प्रकारें च करून घेत जावीं; आणि काय कसें करावयाचें तें दरएक विद्यार्थ्यास बराबर ठाऊक असावें.

८ एक विषय संपून दुसऱ्यास आरंभ करावयाच्या वेळेस जरा अधिक सावधगिरी राखावी. पूर्वीं सक्ती सोसलेली असते त्याजबद्दलची बाकी खोड्या करून फेडून घ्यावी असें त्या संधीस मुलांला वाटावयासारखें असतें.

९ नेहमीं वर्गाला कांहीं ना कांहीं तरी काम खास करावयाला असावें. काम नसलें ह्मणजे जशी बंडाळी होते तशी आणखी केव्हां सुद्धां होत नाहीं. वेळापत्रक चांगलें व्यवस्थित केलें असलें म्हणजे बहुतकरून दिवसभर काम भरपूर असतें च; परंतु अशी संधि पुष्कळ वेळ असते कीं वर्ग गुंतलेला खरा, पण थोड्या विद्यार्थ्यांला फुरसत सांपडते. अशा वेळेस ज्या विद्यार्थ्यांना जरा अधिक फुरसत असेल त्यांना कांहीं तरी लहानसें काम सांगावें; नाहीं तर पलटणींत जसें शिपायांस हातपाय जोडून उभें रहावयास सांगतात तसें उभें राहण्यास अगर बसण्यास सांगावें आणि त्यांजवर नजर ठेवावी. त्यांना रिकामें आणि सैल सोडलें तर, बंदोबस्तांत बिघाड होईल असें खास कांहीं तरी करतील; सोडणार नाहींत.

१० जरूर तर, जें विद्यार्थ्यास करावयास सांगावयाचें त्याचें कारण

ही त्यांना कळवावें ह्मणजे ते समजून उमजून आणि आपल्या मनाच्या हौशीनें आज्ञा मानतील; पण एकंदर हुकुमांचीं कारणें सांगत बसलें च पाहिजे असें समजूं नये. विद्यार्थ्यांनीं गुरुजींचें जसें ऐकलें पाहिजे तसा च त्याजवर त्यांचा भरंवसा ही पाहिजे आणि क्रमाक्रमानें अशी स्थिति झाली पाहिजे कीं गुरुजींनीं आज्ञा केली ह्मणजे ती सुयुक्तिक आहे असें विद्यार्थ्यांना विचार केल्याशिवाय वाटावें.

आतां यापुढें ओघानें विद्यार्थ्यांस अपराधाबद्दल शिक्षा कशी करावी व केव्हां करावी हा विषय येतो त्याविषयीं विचार करूं.

---

## शिक्षा.

शिक्षकानें आंगीं दृढपणा ठेवून आपलें काम करावयाचें ह्मटलें ह्मणजे त्याचें शिक्षेशिवाय चालत नाहीं. वारंवार शिक्षा करण्याचा प्रसंग त्यास येतो असें नाहीं; परंतु थोड्या ठिकाणीं तरी शिक्षा करावी च लागते. असें मात्र होतें कीं थोडे ठिकाणीं शिक्षा योग्य पोंहचली, ह्मणजे शिक्षा करण्याचा प्रसंग च कमी येतो. विद्यार्थ्यांचें अंतःकरण शुद्ध असल्यानंतर अपराध मुळीं च घडण्याचा संभव नाहीं. अंतःकरणाची शुद्धता हें आचरणाच्या शुद्धतेचें अंतरंग कारण होय. परंतु या शुद्धतेचीं अवांतर कारणें याखेरीज पुष्कळ आहेत; त्यांपैकीं चुकी झाली तर शिक्षा खास मिळेल, हें विद्यार्थ्यांस माहीत असणें हें एक मुख्य अवांतर कारण होय. मनांतून जरी अपराध करणें असेल तरी या बाहेरच्या धाकानें मुलें अपराध करण्यापासून मागें सरतात. यामुळें सहज असें घडतें कीं चार पांच ठिकाणीं कायदा मोडल्याबद्दल सक्तीनें शिक्षा केली म्हणजे शेंपन्नास लोकांच्या मनांतून त्या प्रकारचा अपराध करावयाचा असला तरी त्यांच्या मनांतील ती इच्छा जाते; व शिक्षा करावयाचा प्रसंग च तितक्या अंशानें कमी येतो.

**फ्लांडर्स्**मध्यें **इंग्रेज** व **फ्रेंच** यांची मिळून फौज स्वारीस गेली होती, त्या वेळीं **ड्यूक् ऑफ् मॉर्ल्बरो इंग्रेजी** फौजेचे सरदार होते; व **प्रिन्स् यूजीन्** दुसऱ्या फौजेचे सरदार होते. तेव्हां असें झालें

कीं **प्रिन्स् यूजीन्** यांच्या फौजेंतील एका शिपायानें लूट केली, सबब त्याला फांशीं देण्याचा हुकूम **प्रिन्स् यूजीन्** यांनीं केला. तो शिपाई फार चांगला होता म्हणून त्याजवर सर्व अंमलदार लोकांची मर्जी असे. त्यांनीं त्याच्या जिवाचा बचाव करण्याबद्दल **प्रिन्स् यूजीन्** यांजपाशीं बहुत रदबदली केली. परंतु त्यांनीं साफ ऐकत नाहीं म्हणून सांगितलें. मग ते **ड्यूक् ऑफ मॉर्लबरो** यांजपाशीं गेले, व त्यांस म्हणाले कीं आमच्याबद्दल आपण **प्रिन्स्** यांजपाशीं भीड खर्चावी. त्यावरून **ड्यूक्** **प्रिन्स्**कडे गेले, परंतु त्यांजला ही त्यांनीं साफ उत्तर दिलें कीं आजपर्यंत मीं लूट करणारास माफी करण्यास रुकार दिला नाहीं, व यापुढें ही देणार नाहीं. तेव्हां **ड्यूक्** म्हणाले "इतक्या सक्तीनें आपण काम पाहूं लागलों तर आपलें निम्में सैन्य आपणांस फांशीं द्यावें लागेल." त्यावर **प्रिन्स्** यांनीं प्रत्युत्तर केलें— "असें म्हटल्यामुळें च तुमच्या लोकांत इतकी बंडाळी आहे, व इतके लोकांस पारिपत्य करावें लागतें. माझ्या पथकांत मी एकाचा ही मुलाजा करीत नाहीं; त्यामुळें आमचे इकडे शिक्षेचा प्रसंग च कमी येतो." तथापि **ड्यूक्** आपला आग्रह सोडीनात. शेवटीं **प्रिन्स्** यांनीं सांगितलें "आतां असें करूं नका. तुमच्या फौजेंत किती लोक फांशीं गेले आहेत व आमच्या फौजेंत किती गेले आहेत याची चौकशी करूं. जर तुम्हीं माझ्यापेक्षां कमी लोकांस फांशींची शिक्षा केली असली तर मी याला माफी देतों. व तुमच्या लोकांत शिक्षा अधिक झाल्या आहेत असें ठरलें, तर तुम्ही माफीबद्दल शिफारस करूं नये." ही गोष्ट **ड्यूक्** यांनीं मान्य केली. पुढें दफ्तरांत तपास केला तों असें कळून आलें कीं **प्रिन्स् यूजीन्** यांच्या लष्करांत शिक्षा झाल्याचे दाखले **इंग्रेजी** फौजेपेक्षां फार च थोडे निघाले. तेव्हां **प्रिन्स्** **ड्यूक्** यांना म्हणाले "दहशतीची गोष्ट अशी आहे; तुम्ही फार लोकांची काकळूत करितां त्यामुळें तुमचें असें होतें. मी एकाची देखील क्षमा करीत नाहीं, त्यामुळें गुन्हा करण्याची छाती च मुळीं थोडक्यांची होते. तेव्हां सहज च मला शिक्षा ही फार थोडक्यांस करावी लागते."

यावरून इतकें च ध्यानांत ठेवावयाचें कीं अंमलदारानें काय अथवा

पंतोजीनें काय हाताखालच्यांस सईल सोडून बहुतांस शिक्षेस पात्र क-रण्यापेक्षां थोडक्यांस कायदेशीर रीतीनें शिक्षा करून इतरांस ओळी-वर आणावें ही गोष्ट बरी.

शिक्षा मुळीं च करूं नये असें ह्मणणार बहुतकरून कोणी आढळत नाहींत. परंतु यावरून विद्यार्थ्यांस सन्मार्गास लावावयास शिक्षा हा च सर्वांत अतिप्रशस्त मार्ग आहे असें कोणीं समजूं नये. कोणती ही शिक्षा वारंवार कधीं करूं नये. पंतोजीनें मुलांस वागविण्याच्या कामांत शिक्षेवर विशेष भिस्त ठेवणें हें चांगलेपणाचें लक्षण नव्हे. शिक्षा हें सन्मार्गास लावावयाचें सर्वोत्कृष्ट साधन आहे असें कोणीं समजूं नये. त्या साधनास नांवें ठेवणार लोक फार आहेत; आणि ज्या साधनांस कोणी च कधीं ही नांवें ठेवणार नाहींत अशीं साधनें अनेक आहेत. उपदेश हें त्यांपैकीं एक साधन होय व उदाहरण हें दुसरें होय. जर हरएक कामीं काय करणें उत्तम आहे तें मुलांस पक्केपणीं समजलें, व जर योग्य रीतीनें वागण्याचा त्यांस आपण स्वतः असा नमुना दाखविला कीं, त्यामुळें त्यांस त्या नमुन्या बाहेर कोणती च गोष्ट गोड लागूं नये; तर हें त्यांस सन्मार्गास लावण्याचें उत्तम साधन होय. या साधनानें काम करणाराची योग्यता मोठी होय. ज्याच्या आंगांत कुवत आहे व ज्याच्या पोटांत ममता नाहीं असा कोणी माणूस अ-गदीं अडाणी असला तरी मुलांस सहज धाक लावील; व धाकानें पोरें वाईट काम उघडपणें करण्याचें सोडून देतील, पण हें खऱ्या गु-रुजीचें काम झालें नाहीं. खरा गुरुजी अपराधाचें मूळ शोधून का-ढितो, व इलाज करणें तो तेथें करितो. तो मुलांचें मन प्रथम प-क्केपणीं ओळखितो व वाईट मार्गांतून हळू हळू दूर करून त्यांस चां-गल्या मार्गास लावितो. विद्यार्थ्यांच्या वासना हलक्या गोष्टींवर गुंतून राहिलेल्या असतात, त्या तेथून सोडवून योग्य पदार्थांवर जडवितो. ह्मणजे सहज च अश्लाघ्य कर्मांपासून विद्यार्थी दूर राहतात व बाह्य दंडाचें त्यांला प्रयोजन च उरत नाहीं. कवींनीं ह्मटलें आहे कीं,—" प्रायश्चित्तें पापें जळती मूळ वासना राहे ॥" हें विद्यार्थ्यांस पूर्णपणें लागू आहे. कधीं कधीं असें घडतें कीं शिक्षेच्या धाकानें मुलगा बाहेरून

वाईट कामाशीं अगदीं संबंध बाळगीत नाहीं. परंतु जसजशी त्याबद्दल शिक्षा मिळेल तसतशी त्याची आंतून त्या कामाविषयीं आसक्ति दुणावत जाते. तर खरा गुरु ज्याला म्हणावयाचें तो अशा प्रसंगीं बाह्य शिक्षेवर मुळीं च भिस्त ठेवीत नाहीं. तो मुलांची वासना ज्या वाईट कृत्याकडे गेली असेल त्या कृत्याचा वाईटपणा त्यांच्या ध्यानांत पुरता आणून देऊन त्या वासनेस योग्य असा दुसरा श्लाघ्य विषय त्या मुलांस दाखवून त्यांची वासना तिकडे वळवून त्यांचें अंतःकरण च त्या वाईट विषयापासून पराङ्मुख करितो. हें सामर्थ्य ज्याच्या आंगीं आहे तो च खरा गुरु होय. ही गोष्ट सर्व पंतोजींनीं ध्यानांत ठेविली पाहिजे. शिक्षा करणें अवश्य आहे व ती करण्यांत मागें पुढें पाहूं नये म्हणून सांगितलें, यावरून ती च विद्यार्थ्यांस सन्मार्गास लावण्याच्या कामीं मुख्य साधन आहे असें समजूं नये. वाईट वागण्याच्या वासनेचा मोड मनांतून निर्मूळ काढून टाकावा हा प्रयत्न प्रथम केला पाहिजे. तो न चालेल तेथें, व केव्हां केव्हां त्यास साहाय्यभूत म्हणून, शिक्षेचा प्रकार आहे.

एकंदर सर्व प्रकारच्या शिक्षेस दोष देणारे फार आहेत असें नाहीं; परंतु मुलांस शारीर शिक्षा देऊं नये असें म्हणणारे लोक बरे च आहेत. याजकरितां शिक्षेचे प्रकार वगैरे सांगण्यापूर्वी शारीर शिक्षा करावी किंवा न करावी याविषयीं मोठमोठ्या ग्रंथकारांचे काय अभिप्राय आहेत हें आपण प्रथम पाहूं. सर्व च जातीच्या शिक्षेस दोष देणारे लोक आहेत. मग शारीर शिक्षेस दोष देणारे आहेत यांत काय नवल आहे? छडी मारणें निंद्य आहे असें ते समजतात. ही गोष्ट खरी आहे कीं छडी मारणें हा पंतोजीनें नेहमीं अखेरचा इलाज आहे असें समजलें पाहिजे. असें जो न समजेल त्यास चांगला पंतोजी असें समजणें वाजवी नाहीं. परंतु होईल तितकी छडीवर मजल न आणावी हें जरी खरें आहे तरीं "छडी मारणें म्हणजे लांछनास्पद आहे; असें केल्यानें मुलांची योग्यता जाऊन त्यांस पशूंचें साम्य येतें" हें जें आलीकडे पांडित्य निघालें आहे, त्यांत कांहीं हासल नाहीं. कधीं कधीं एक चांगला खरपूस मार बसला म्हणजे पोराचें जन्माचें काम होतें, तें हजार

दुसऱ्या तोंडींनीं होणार नाहीं. आतां शिक्षेबद्दल नियम कोणत्या प्रकारचे असावे हें ध्यानांत येण्याकरितां शारीर शिक्षेचे गुणदोष थोर थोर ग्रंथकर्त्यांनीं कसे वर्णिले आहेत तें पाहूं.

**आर्नोल्ड्** साहेबांचें मत एकंदरीनें असली शिक्षा अप्रशस्त होय असें च होतें. तथापि लहान मुलांस ती फार गुणावह आहे असें त्यांचें म्हणणें असे. त्याजविषयीं त्यांचें चरित्र लिहिणारानें खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे:—

शाळेच्या वरील वर्गांत मोठमोठीं मुलें असत; तेथें ते शारीर शिक्षा फारशी करीत नसत, परंतु घडेल तेथपावेतों, ममता दाखवून व उत्तेजन देऊन मुलांच्या आंगीं चांगुलपणा व उदारता उत्पन्न करून, ते शारीर शिक्षेचा प्रसंग टाळीत असत. त्यांचा या विषयावर अभिप्राय असा असे कीं लहानपणीं मुलांची समजूत कोती असते; त्यांना अमुक कारणासाठीं अमुक गोष्ट करूं नये हें बराबर समजत नसतें. याकरितां त्यांच्या समजुतीच्या व वयाच्या मानानें शाळेंत शारीर दंडाचा पाठ तर ठेवावा च, परंतु कांहीं मुलें वयानें लहान असलीं तरी समजुतीनें प्रौढ असतात व त्यांचे वयाच्या इतर मुलांपेक्षां अब्रूची चाड त्यांस अधिक असल्यामुळें आपल्या वयास अनुरूप जी शिक्षा त्या शिक्षेंत न सांपडण्यास तीं फार इलाज करीत असतात; तर शिक्षा करण्याच्या पद्धतीनें अशा मुलांची उमेद खचवूं नये. त्यांतल्या त्यांत विचार पाहून, जीं मुलें साहजिक रीतीनें पोरपणा टाकून प्रौढ होऊं पहात असतील त्यांस शारीर दंड करून, त्यांची लाज नाहींशी करूं नये. इतकी अब्रू ज्या मुलांस नाहीं त्यांस मात्र शारीर शिक्षा करावी.

जेव्हां **आर्नोल्ड** साहेबांस कोणी म्हणत कीं, " मुलांनीं गैरवर्तणूक केली तरी त्यांस मारूं नये. मारल्यानें लहान मुलांची देखील अब्रू जाते. " तेव्हां ते आपल्या नेहमींच्या चालीप्रमाणें आग्रहपूर्वक प्रत्युत्तर देत, तें असें. "तुम्ही या कल्पना काढितां तेव्हां तुमच्या मनांत काय असतें हें मी पक्कें ओळखितों. ज्याची त्यास पाहिजे तें करण्यास मुखत्यारी असावी, ही जी खोटी व अतिगर्विष्ठपणाची कल्पना तुम्ही मनांत बाळगितां, त्या कल्पनेनें तुम्हास हें बोलणें सुचतें. परंतु ही क-

ल्पना अगदीं अप्रयोजक, व अडाणी लोकांस मात्र योग्य, अशी आहे. आपल्या हातून अपराध घडणें ही च आपल्या बेअब्रूची कमाल, हें लहानपणीं मुलांस समजत नाहीं; व त्यामुळें च त्यांच्या हातून वारंवार अपराध घडतात. अशा अज्ञान मुलांस 'मार खाणें हें आपल्या योग्यतेस कमीपणा आणणारें आहे. व ज्या प्राण्यास ज्ञान आहे त्याला पशूसारखी शारीर शिक्षा करण्याचा कोणास ही अधिकार नाहीं.' असला चावटपणा शिकविण्यांत कांहीं च शहाणपण नाहीं. असल्या कल्पना लहानपणीं च मुलांच्या मनांत आणून दिल्या, म्हणजे तीं बिथरून जातात. लहानपणीं मुलांच्या आंगीं विनय असावा, साधेपणा असावा, व अहंता नसावी हें च त्यांस भूषण आहे. व अशीं च मुलें मोठेपणीं उदयास येतात. लहानपणापासून च त्यांस गर्व व चौचालपणा जडला तर तीं थोरपणीं कधीं चांगलीं होणार नाहींत." हें **आर्नोल्ड्** साहेबांचें मत झालें.

**कोलरिज्** ह्मणून एक **इंग्लंडां**त मोठे कवि व तत्त्ववेत्ते होऊन गेले; त्यांच्या ही मतें शारीर शिक्षा ही विद्यार्थ्यांस नीचता आणणारी आहे असें नाहीं. ते ह्मणतात—"मला पण एक वेळ खूब मार बसला व तो फार योग्य कारणानें मिळाला. मी तेरा वर्षांचा होतों तेव्हां एका चांभाराच्या घरीं गेलों आणि त्याला ह्मटलें कीं तूं मला आपल्या घरीं ठेवून आपलें काम शिकीव. तो चांभार चांगला माणूस होता. तो मला घेऊन माझ्या पंतोजीकडे आला, व त्याजपाशीं सारा वृत्तांत सांगूं लागला. पंतोजी फार रागावले. त्यांनीं माझ्या तर तोंडांत मारली च, पण त्या बिचाऱ्या चांभारावर ही ते रागावले; आणि त्यांनीं त्यास घालवून दिलें. मग त्यांनीं मला असा मूर्खपणा करण्याचें कारण विचारिलें. तेव्हां मीं ह्मटलें कीं पाद्रीपणाचा धंदा मला अगदीं मनापासून नकोसा आहे, व चांभाराचा धंदा मला आवडतो, ह्मणून मीं असें केलें. पुढें त्यांनीं मला विचारिलें कीं तुला पाद्रीपणाचा धंदा कां आवडत नाहीं. तेव्हां मीं उत्तर केलें कीं खरोखर म्हणाल तर मी नास्तिक आहें. हे शब्द ऐकतां च पंतोजींनीं अधिक कांहीं एक पंचाईत न करितां मला खूब ठोक दिला; त्याची आठवण अझून मला पक्की आहे. पण त्या एका

ठोकानें काम पुरें करून टाकलें. असें न करितां पंतोजींनीं जर नास्तिकपणावर वाद करण्याचा प्रसंग आणिला असता तर फुकट माझा डौल मात्र वाढला असता व तर्कटांत पडून मी बिघडून गेलों असतों. पण पंतोजींनीं यथास्थित ठोक दिल्याचें सर्वांस समजल्यामुळें माझें जिकडे तिकडे हांसें झालें आणि आपल्या मूर्खपणाची माझी च मला अशी लाज वाटूं लागली कीं मी पुनः त्या वाटेनें गेलों च नाहीं.”

**डाक्तर् जान्सन्** यांचा अभिप्राय खालीं लिहिल्याप्रमाणें आहेः—“शिक्षा करणें हें निर्दयपणाचें चिन्ह आहे असें नाहीं. लहान मुलांची समजूत कोती असते, तेव्हां अर्थात् त्यांजकडून चांगलें आचरण करवावयाचें तें धाकानें च करविलें पाहिजे. याकरितां मुलांस वागविण्याचें ज्यांचें काम आहे त्यांनीं मुलांवर धाक ठेवण्यास प्रथम जपलें पाहिजे. आईबापांचें धाक ठेवणें हें काम आहे, व ते धाक ठेवितात, म्हणून त्यांची त्याजवर माया नसते असें कोणी म्हणत नाहीं. पंतोजीनें आपलें काम उत्कृष्ट रीतीनें करण्याची सीमा म्हटली म्हणजे त्यानें बापाप्रमाणें मुलांस वागवावें ही होय. व जर बाप शिक्षा करितो तर पंतोजीनें ही केली च पाहिजे. परंतु कोणती ही चांगली गोष्ट सुद्धां अति झाली ह्मणजे वाईट च; त्याप्रमाणें शिक्षा ही अति झाली म्हणजे वाईट च. परंतु शिक्षा अति झाली असें केव्हां ह्मणावें? जितकी अभ्यासाकरितां व वागणूक नीट करण्याकरितां केली च पाहिजे तीहून अधिक झाली म्हणजे शिक्षा अतिशय झाली असें म्हटलें पाहिजे. जर विद्यार्थी हट्ट च करूं लागला तर त्याचा हट्ट मोडे तों शिक्षा केली च पाहिजे. मग ती किती झाली तरी तिला निर्दयतेनें केली असें दूषण देतां येत नाहीं. कारण अपराधी विद्यार्थ्याची खोड न मोडिली तर तो बिघडून जाईल. त्यास पुरा मार मिळाला नाहीं तर तो माराच्या भीतीस ही खाऊन बसणार; व रागें भरून तर त्याच्या काळजास मुळीं च घाम येणार नाहीं. अशा विद्यार्थ्यास पुरा चोप न देऊन त्यास मूर्ख व हट्टी करून ठेवणें यासारखा त्याशीं दुसरा निर्दयपणा करितां येणें कठिण. **लॉक्** साहेबांनीं आपल्या एका ग्रंथांत एके ठिकाणीं एका बाईची वाहवा केली

आहे. तिनें आपल्या मुलीस आठ वेळां ठोक दिला व तिच्या हातून घ्यावयाचें होतें तें काम घेतलें. ते ह्मणतात कीं जर तिनें तिला सात च वेळ मारिलें असतें आणि आतां ऐकत नाहीं म्हणून सोडून दिलें असतें, तर त्या पोरीचा सर्वस्वीं नाश झाला असता. कारण तसें झालें असतें तर तिला आपला हेका न सोडण्याची संवय पक्की च लागली असती; व तेणेंकरून तिनें नाहीं ते अनर्थ केले असते. वेगवेगळे मुलांचा हट्टीपणा कमजास्त असतो. माराचें खरें प्रमाण हें च होय कीं त्यामुळें मुलानें आपला हट्ट सोडावा. जोंवर मुलानें आपला हेका सोडिला नाहीं, तोंवर त्यास पाहिजे इतका मार च मिळाला नाहीं असें समजावें. शाळेचा बंदोबस्त आणि लष्करी बंदोबस्त हे दोन्ही सारखे च आहेत. दोन्ही ठिकाणीं असें च आहे कीं एक बिलकुल प्रतिबंध तरी करूं नये, किंवा, केला च तर पुरा तरी करावा. एखाद्या विद्यार्थ्यानें ऐकिलें नाहीं म्हणजे पंतोजी त्यास जी शिक्षा करितो ती केवळ त्याच्या एकट्याच्या हिताकरितां च करितो असें नाहीं. परंतु त्यांत सर्व शाळेचें हित होतें. कारण हा एक दाखला नजरेस पडला म्हणजे सर्व शाळेंतील मुलें हुकूम न मोडण्याविषयीं अधिक जपतात. व तेणेंकरून सर्वांचें च बरें होतें. एका मुलानें हट्ट केला व तो पंतोजीच्या मऊपणामुळें कडेस गेला, ही गोष्ट मुलांत प्रसिद्ध झाली ह्मणजे मग पंतोजीनें शाळेंत बंदोबस्त चांगला व्हावा व शिकणें बिनहरकत व्हावें ह्मणून किती ही जीव तोडिला तरी तें व्यर्थ आहे. तेवढ्या च एका दाखल्यानें सर्व शाळा बिघडण्यास कांहीं उशीर लागत नाहीं. याकरितां कोणीं ही विद्यार्थ्यानें पंतोजीचें न ऐकण्याचा हट्ट धरिला कीं पंतोजीनें हरएक इलाज करून त्याचा हट्ट मोडिला च पाहिजे; दुसरा इलाज नाहीं."

या सर्व थोर थोर लोकांच्या अभिप्रायांवरून सहज कळून येईल कीं कांहीं कांहीं प्रसंगीं शारीर शिक्षा करणें अगदीं अवश्य आहे हें उघड आहे. पण हा शिक्षेचा एक प्रकार आहे, असे दुसरे ही बहुत आहेत, तेव्हां या शिक्षेच्या प्रकारांबद्दल लिहिण्या पूर्वीं एकंदर शिक्षेविषयीं दोन गोष्टी लिहिणें अवश्य आहे.

शिक्षेपासून उपयोग होतो तो दोन प्रकारचा होतो. म्हणजे एका अंशीं शिक्षा हा झालेले अपराधाबद्दल दंड आहे; व शिक्षेचा दुसरा उपयोग हा होय कीं तिच्या योगानें पुढें होणारे अपराधांचा प्रतिबंध होतो. या दोन्ही गोष्टी ध्यानांत आणून त्या धोरणानें जरी शिक्षा देणारानें शिक्षा दिली नाहीं, तरी शिक्षा दिली कीं तिजपासून थोड्या बहुतानें हीं दोन्हीं कामें झालीं च पाहिजेत; परंतु या दोन्ही गोष्टी ध्यानांत ठेवून मग जर कोणते ही अपराधाबद्दल शिक्षा ठरविली, तर हीं दोन कार्यें जेणेंकरून अधिक साधतील अशा प्रकारची शिक्षा सहज च मनुष्य ठरवील, यांत संदेह नाहीं. कारण हे शिक्षेचे उपयोग पक्के ध्यानांत असले तर मनुष्य शिक्षा देतांना तशी तोडजोड केल्याशिवाय राहणार च नाहीं. आतां शिक्षा हा पूर्वीं झालेल्या अपराधाबद्दल दंड आहे अशा दृष्टीनें शिक्षेकडे पाहिलें म्हणजे तिचा संबंध ज्यास शिक्षा द्यावयाची आहे त्याशीं मात्र आहे; म्हणजे तिची योग्यता व अयोग्यता, आवश्यकता व फाजीलपणा, यांजबद्दल विचार करतेवेळेस जो शिक्षेस पात्र असेल त्याच्या मानाप्रमाणें शिक्षा आहे किंवा नाहीं, एवढें पाहिलें म्हणजे झालें. परंतु तिच्या आंगीं प्रतिबंधकता ह्मणून जो गुण आहे असें सांगितलें आहे, त्या गुणाच्या संबंधानें शिक्षेचा विचार करूं लागलें तर त्यांत सर्वांचा संबंध येतो. शिक्षा भोगणाराचा येतो, व ज्या लोकांत तो राहतो, व त्यास झालेली शिक्षा पाहून ज्यांनीं तसा अपराध करूं नये असा शिक्षा करणाराचा उद्देश असतो, त्यांचा ही येतो; आणि त्या संबंधानें शिक्षेस फार महत्त्व येतें.

प्रथम.—कोणीं ही अपराध केला तर दंडार्थ शिक्षा असावी हें योग्य च आहे. सृष्टिक्रम च असा आहे कीं, ज्याच्या ज्याच्या पाठीमागें जे जे नियम लागले आहेत, त्यांचा त्यांचा अतिक्रम केला म्हणजे त्यामागें शिक्षा सदैव येते च; ती कांहीं केल्यानें ही टळत नाहीं. पहा, कोणीं मनुष्यानें आपल्या शक्तीबाहेर आहारविहार केला तर त्याच्या दंडार्थ रोग मागें उभे च आहेत; तेवढ्यानें ही मनुष्य सावध न होई तर त्यामागून त्याहून ही अति भयंकर परिणाम होतात च; म्हणजे मनुष्यास

वेड लागतें, किंवा कधीं कधीं मृत्यु ही येतो. आतां या सर्व शिक्षांचे आंगीं झालेले अपराधाबद्दल दंड असणें हा गुण आहे च; व त्या जातीच्या अपराधांचा प्रतिबंध करण्याचें ही सामर्थ्य थोडेंबहुत आहे, परंतु ज्या मनुष्यास त्या घडतात त्याच्या हातून तसे अपराध न घडूं देण्याचें सामर्थ्य त्यांचे आंगीं अगदीं च थोडें आहे असें म्हटलें पाहिजे. त्यांचें मुख्य कार्य, झालेल्या अपराधाचें पारिपत्य हें होय. ही सृष्टिक्रमाची गोष्ट झाली. राजनीतींत ही हा च प्रकार दृष्टीस पडतो. राजानें केलेल्या नियमांचा अतिक्रम केला तर दंड, कैद, व शेवटीं मरण हीं नेमिलीं आहेत. त्यांचा तरी मुख्य उद्देश झालेल्या अपराधाबद्दल पारिपत्य हा होय. कारण इतके दिवसांच्या अनुभवावरून कळून आलें आहे कीं या शिक्षांपासून जो शिक्षा पावतो त्याची अपराध करण्याची बुद्धि जात नाहीं, एवढें च नाहीं, परंतु त्यास झालेली शिक्षा पाहून इतरांस देखील अपराध करण्याची बुद्धि न होई अशी दहशत बसत नाहीं. बसती तर शिक्षाक्रम अनादि कालापासून चालत असल्यामुळें मनुष्याच्या अपराध करण्याच्या इच्छेंत कांहीं तरी अंतर पडलें असतें. परंतु तसा प्रकार नजरेस येत नाहीं; ही इतर शिक्षांची गोष्ट झाली. देहांत शिक्षेचा विचार केला म्हणजे ज्या व्यक्तीस ती होते त्या व्यक्तीस पारिपत्याहून इतर कोणता ही उद्देश लागू होत नाहीं, हें स्पष्ट आहे. सारांश या जगताची रहाटी पाहूं गेलें असतां शिक्षेचा मुख्य उद्देश पारिपत्य हा होय. इतर सर्व फळें आनुषंगिक समजलीं पाहिजेत. आतां लहानपणीं विद्यार्थ्यांस जें शिक्षण द्यावयाचें त्याचा मुख्य हेतु हा आहे कीं, तेणेंकरून त्यांला जगतांत रहावें कसें, व आपल्या बंधुजनांस उपयोगीं पडावें कसें, हें पुरतेपणीं आलें पाहिजे. पुढें ज्या रीतीनें दुनियेंत रहावें लागणार आहे, ज्या गोष्टी कराव्या लागणार आहेत, व ज्या गोष्टी भोगाव्या लागणार आहेत, त्या सर्वांची मुलांची सिद्धता करून देणें याचें च नांव शिक्षण. तर अर्थात् पुढें अनुभवास येणारी जी गोष्ट, म्हणजे पारिपत्यार्थ वाईट कृत्याबद्दल शिक्षा मिळणें, या गोष्टीचा लहानपणीं च मुलांस परिचय करून देणें हें शिक्षणाचें एक उत्तम लक्षण समजलें पाहिजे. तात्पर्य—आ-

ज्ञेच्या उल्लंघनाबद्दल पारिपत्य मुलांस घडावें हा शिक्षेचा मुख्य उद्देश असावा.

दुसरें.—विद्यार्थ्यांच्या सर्व वाईट बुद्धि जाऊन त्यांस चांगला मार्ग लागावा हा त्यांस शाळेंत घालण्याचा मुख्य हेतु आहे; व शाळेच्या व्यवस्थेसंबंधी हरएक गोष्टीनें हा हेतु कितपत सिद्धीस जात आहे हें नेहमीं पाहिलें पाहिजे. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे शिक्षा बरी वाईट म्हणतांना दोन गोष्टींचा विचार केला पाहिजे. प्रथम ही कीं, त्या शिक्षे-पासून ज्या विद्यार्थ्यास शिक्षा करावयाची त्याचा स्वभाव तिनें किती सुधारतो; व दुसरी, ज्या अपराधाकरितां त्यास शिक्षा केली असेल तो किंवा दुसरा तसा एखादा अपराध पुनः न करावा असें सर्व विद्या-र्थ्यांस कितपत वाटतें. ज्याला शिक्षा केली त्याच्या हातून पुनः तसा अपराध होऊं नये असें झालें म्हणजे त्या विद्यार्थ्यापुरतें शिक्षेचें पूर्ण फळ झालें; व दुसऱ्या मुलांनीं ती शिक्षा पाहिल्यानें त्यांची तो च, किंवा तसला दुसरा, अपराध करण्याची वासना मोडली म्हणजे शाळेंतील एकंदर मुलांच्या वागणुकीच्या संबंधानें त्या शिक्षेचा पूर्ण उपयोग घ-डला असें समजलें पाहिजे. हीं दोन्ही कार्यें ज्या शिक्षेपासून उत्तम होतील, ती च शिक्षा उत्तम असें मानिलें पाहिजे. यावरून पूर्वीं जें सांगितलें आहे तें च दृढ होतें; ह्मणजे शिक्षेच्या आंगीं मुख्य दोन गुण असावे.

१ शिक्षेनें अपराध्यास योग्य शासन घडावें.

२ शिक्षेपासून, ज्यास शिक्षा घडते त्याजकडून, व इतरांकडून, तसा अपराध पुनः घडूं नये.

आतां शाळेंत शिक्षा किती प्रकारांनीं देतां येते याचा आधीं वि-चार करूं आणि मग शिक्षेंत वर सांगितलेले गुण कोणत्या रीतीनें अ-धिक येतील हें पाहूं. शिक्षेचे मुख्य प्रकार खालीं लिहिल्याप्रमाणें आ-हेत. १ वर्गांत खालीं बसवून अप्रतिष्ठा करणें. २ धडा शिकावयास बसूं न देणें. ३ शाळेंत येण्याचें कांहीं दिवस बंद करणें. ४ सर्व मुलां-हून अधिक पाठ करावयास, किंवा लिहावयास देणें. ५ रागें भरणें. ६ शारीर दंड करणें. या शिक्षेच्या प्रकारांपैकीं प्रथम तीन प्रकारांपा-

सून, शिक्षा झाली असें विद्यार्थ्यास वाटविणें हें शिक्षकाच्या अकलेचें काम आहे. जर पंतोजी शाळेचें काम हुशारीनें करील, व तेणेंकरून शाळेंत जाणें व वर्गांत बसणें ही लाभाची गोष्ट आहे असें विद्यार्थ्यास वाटेल, व जर वर्गांत वर असल्यापासून भूषण आहे असें मुलांस वाटत असेल, तर च प्रथम तीन प्रकार शिक्षारूप आहेत असें विद्यार्थ्यास वाटणार आहे. जेथें वर्गांत बसलें अथवा न बसलें सारखें च, व जेथें पहिल्या विद्यार्थ्यास थोरपणा नाहीं, व शेवटल्याचा उपहास होत नाहीं; तेथें मुलास शाळेंत येऊं नको, किंवा पहिला बसूं नको, असें सांगितल्यानें त्यास काय वाईट वाटणार आहे? व ती गोष्ट मनास च न लागेल तर तिजपासून पारिपत्य तरी काय घडणार आहे, व विद्यार्थ्यास पुनः अमुक एक गोष्ट करूं नये, असें तरी काय वाटणार आहे? परंतु ही स्थिति अति निकृष्ट प्रतीच्या पंतोजीची व त्याच्या शाळेची आहे. विचारपूर्वक जो आपला धंदा करीत आहे त्याच्या शाळेची अशी स्थिति कधीं ही असणार नाहीं. व अशा लोकांविषयीं च आपण विचार करीत आहों, तेव्हां हे सर्व च प्रकार मुलांस शिक्षारूप भासतील अशी आपण कल्पना करून चालूं.

मुलगा वर्गांत खालीं घालविला म्हणजे त्याची अप्रतिष्ठा होते व त्याच्या मनास वाईट वाटतें, म्हणून च तो खालीं जावयास सांगितलें ह्मणजे ती शिक्षा आहे असें समजतो; याकरितां वर्ग अशा रीतीनें चालविला पाहिजे कीं आपली जागा गेली तर मुलाला वाईट वाटावें. एखादे पंतोजीची वर्ग चालविण्याची हातोटी अशी असते कीं त्याच्या वर्गांत मुलें जागा वर मिळण्यासाठीं फार च कासाविशी करूं लागतात. तो वर्गांतील जाग्यांवर त्यांचा असा जीव लावितो कीं एखादे मुलास खालीं घालविलें तर तो रडूं लागतो. इतकी वर्गांतील जाग्यांविषयींची चढाओढ लागण्यास पंतोजीचे आंगीं फार च कौशल्य पाहिजे, हें खरें आहे. पण सर्वांनीं होईल तितकी आपल्या वर्गाची अशी स्थिति करण्याच्या यत्नांत असावें ह्मणजे त्यांना थोडेंबहुत तरी तें साधेल यांत संशय नाहीं. दरएक विषयाच्या शेवटीं गुण मांडिले व त्याप्रमाणें महिन्याच्या आरंभीं नांवें मां-

डीत गेलें तर मुलांना वर्गांत जागा वर मिळविण्याची आस्था लागते. कदाचित् बक्षिसें देतांना ज्यांची जागा नेहमीं वर असते त्यांस बक्षिसें दिलीं, किंवा ज्यांचीं नांवें सदोदित वर असतात त्यांच्या हुशारीची खबर त्यांच्या आईबापांकडे कळविली, तर मुलें जाग्याविषयीं याहून ही आस्था बाळगितील. कारण जीं मुलें जागा वर राखणार नाहींत त्यांस त्यांच्या आंगीं जागा वर राखणारा इतकी हुशारी असून ही बक्षीस अगर अब्रू न मिळेल तर ती आपणांस शिक्षा च झाली असें त्यांस वाटेल; परंतु मुलांची नजर इतकी दूर पोंहचत नाहीं. या जाग्यांवरून वर्षाच्या शेवटीं आपणांस बक्षीस मिळणार आहे, किंवा आपली हुशारी वडिलांस कळणार आहे, ही गोष्ट लहान मुलांच्या ध्यानांत राहणें कठिण आहे. तूर्त जेणेंकरून बरें वाईट वाटेल, अशा गोष्टींनीं मुलांचें मन कामावर लाविलें पाहिजे. याकरितां मुख्य गोष्ट ही च आहे कीं वर्गांत जागा खालीं जाणें हा मोठा अपमान आहे असें च मुलांस वाटेल, अशी तजवीज ठेविली पाहिजे. मुलांस वारंवार खालीं घालविल्यानें सहज च त्याबद्दल वाईट वाटण्याचें मान कमी होणार आहे. याकरितां ही शिक्षा वारंवार देऊं नये; वारंवार दिली म्हणजे मुलांत तिची थट्टा होत असते. एका मोठ्या शाळेंतील पंतोजीस ही शिक्षा करण्याचा चाळा फार असे. एवढें तेवढें झालें कीं त्यानें सांगावें 'जा दहा जागा खालीं.' व मुलगा जाऊं लागला असतां त्यानें अशी उतावळ करावयाची कीं तो मुलांची संख्या मोजून आपली जागा पहात आहे, इतक्यांत दहा, अकरा, बारा, म्हणत म्हणत शेवटीं जाऊन बस असें ह्मणावें. मुलगा अंमळ लबाड असला म्हणजे त्यानें जागा मोजल्याशिवाय पांच सहा च जागा खालीं जावें, मग पंतोजीनें त्यास बोलूं नये. बरें, इतक्यांत कोणीं तक्रार केली कीं अमुक मुलगा दहा जागा खालीं गेला नाहीं; सहा च जागा खालीं गेला, तर तक्रार करणारास सांगावें, 'तूं चार जागा खालीं जा.' असा क्रम चालावयाचा. दर तासांतून दहा पांच मुलांस ही शिक्षा व्हावयाची. अर्थात् प्रथम ज्यांस खालीं घालविलें ते क्रमाक्रमानें दुसऱ्यास शिक्षा मिळत गेली ह्मणजे वर यावयाचे; असा कांहीं दिवस वर्गांत क्रम चालला; त्याचा परिणाम असा झाला

कीं त्या वर्गांत दोन तीन मुलें जागा खालीं गेल्यामुळें जीव देणार होतीं परंतु त्यांला देखील जाग्यांची चाड उरली नाहीं. व जोंवर ते पंतोजी होते तोंवर त्या वर्गांत जाग्याला कोणीं पुसलें नाहीं. सारांश, या शिक्षेचा बोज जसा पंतोजीनें ठेवावा, तसा राहणार आहे. विद्यार्थी वर्गांत जें चाललें आहे त्याजकडे लक्ष न देतां भलतें च कांहीं करीत बसला, अगर पहात बसला, तर ही शिक्षा करण्याची चाल आहे; परंतु विद्यार्थ्यांचें दुर्लक्ष होणें ही खरोखरी पाहूं गेलें असतां पंतोजीची च कसूर आहे. जर पंतोजी मनापासून काम करीत आहे, तर त्याला मुलें लक्ष देत नाहींत, ही तक्रार करण्याचा प्रसंग बहुधा येणार नाहीं. मुलांचें वारंवार दुर्लक्ष होऊं लागलें तर पंतोजीनें आपली च चूक कोठें आहे हें पाहून ती सुधारावी हें अधिक योग्य आहे. कधीं कधीं वर्गांत एखादी गोष्ट विचारिली असतां मुलगा अगदीं च असंबद्ध उत्तर देतो. याचें कारण बहुधा असें असतें कीं पंतोजीनें प्रश्न काय विचारिला याकडे त्याचें मुळीं च लक्ष नसतें. वेळेस जें तोंडास येईल, तें तो बोलून जातो. असें झालें असतां त्या विद्यार्थ्यास चांगलें रागें भरून वर्गाच्या शेवटीं घालवावें हें योग्य आहे. कारण विद्यार्थी इतकें दुर्लक्ष करूं लागेल, व विचार केल्याशिवाय बोलण्याची खोड त्यास लागूं लागेल तर त्याकरितां पंतोजीस राग येणें हें साहजिक आहे. व ती खोड घालविण्याकरितां मुलाच्या मनास लागेल अशी कांहीं तरी शिक्षा त्यास करावी हें उचित आहे.

एके इंग्रेज ग्रंथकारानें म्हटलें आहे. मुलांना नांवें ठेवण्यासारखें त्यांचें दुर्लक्ष वर्गांतील विद्याभ्यासाकडे असावें यास आणखी कांहीं कारणें असतील, परंतु सर्वांहून मोठें कारण शिक्षकाच्या आंगची उणीव असणें हें होय. मनुष्य हुशार आहे, मनापासून झटत आहे आणि जर आपल्या वर्गावर चित्त देत आहे तर त्याच्या नजरेस नेहमीं असें च पडेल कीं, आपला वर्ग ही आपल्यावर तसें च चित्त देत आहे.

धडा शिकावयास बसूं न देणें.—ही शिक्षा तरी जेव्हां मुलाला मनापासून धडा शिकावयाचें अगत्य असेल तेव्हांच 'शिक्षा' असें वाटणार आहे. नाहीं तर, जर मुलाला शिकण्याचें अगत्य नाहीं तर,

आवडतें च कपाळाला आल्यासारखें त्यास होणार आहे. ही शिक्षा वारंवार विद्यार्थ्यास देणें बराबर नाहीं. ही शिक्षा देण्यास योग्य प्रसंग म्हटला म्हणजे मुलानें धडा शिकण्याच्या पूर्वीं जी तयारी घरून करून आलें पाहिजे ती तयारी केल्याशिवाय तो येईल तर तो एक होय; किंवा जर मुलगा फार उशिरां शाळेंत येत असेल तर तो एक होय. कारण ज्या मुलानें धडा शिकण्याच्या पूर्वीं जी तयारी करणें अवश्य होतें ती केली नाहीं, त्याला त्या धड्याला जरी बसूं दिलें तरी त्यापासून त्याला काय उपयोग आहे? तसें च जो विद्यार्थी धडा सुरू झाल्यावर फार वेळानें येतो त्याला पंतोजीच्या बोलण्याचा पूर्वापर संबंध माहीत नसल्यामुळें तो समजणार नाहीं; न समजला म्हणजे तो आपल्या शेजारीं बसलेल्या विद्यार्थ्यास त्रास देणार च. जरी त्यानें न दिला तरी, विद्यार्थ्यांचें मन पंतोजीच्या बोलण्यावर चांगलें वेधून गेलें असलें, व पंतोजी पाठाचा उपक्रम चांगला करून ऐन शिकविण्याच्या भरांत आला असला तर, मध्यें च कोणी मुलगा वर्गांत आल्यानें अध्यापनाच्या कामास मात्र हरकत होणार आहे. व नवीन येणारास लाभ नाहीं तो नाहीं च. अर्थात् तयारी न करून येणारास, व वेळ चुकवून येणारास चाललेल्या धड्यास न बसूं देणें ही च योग्य शिक्षा होय. व प्रसंग पाहून तिची या च अपराधावर योजना करावी.

कांहीं दिवस शाळेंत येण्याचें बंद करणें.–वक्तशीर शाळेंत न येण्याबद्दल एखादा तासपावेतों वर्गांत बसूं देऊं नये म्हणून सांगितलें, त्याप्रमाणें च जो विद्यार्थी मुळीं च शाळेंत येण्याची चुकवाचुकव करितो त्यास ही शिक्षा होय. परंतु बहुतकरून या कारणाखेरीज ही शिक्षा देऊं नये. आतां एखादे वेळेस फार च मोठा गुन्हा विद्यार्थ्यांचे हातून झाला तर तेथें ही ही शिक्षा योजावी; व अशा प्रसंगीं शाळेंत न येण्याची मुदत कांहीं दिवस वाढवावी; परंतु ही शिक्षा अपराध पाहून च केली पाहिजे. अभ्यासाची खरी आस्था बाळगणाऱ्या एखाद्या मुलानें आपल्या शिक्षकावर दोषारोप केला, किंवा त्याचा उपमर्द केला, तर त्याला अशा प्रकारची शिक्षा देणें योग्य आहे.

शाळेंतून घालवून देणें.—नेहमीं देण्याच्या शिक्षेपैकीं च ही एक शिक्षा आहे असें कोणीं समजूं नये. शाळेंत येण्याचें कांहीं दिवस बंद करणें या शिक्षेची कमाल ही होय. तेव्हां अर्थात् ही शिक्षा तिजहून ही कमी केली पाहिजे. व ती च फार वेळा करूं नये, असें सांगितलें आहे; यावरून ही किती थोडे वेळा करावी हें ध्यानांत आणावें. दरएक विद्यार्थ्यानें सुशिक्षित व्हावें, हा शाळा असण्याचा उद्देश आहे; म्हणजे, मुलगा शाळेंत घालावयाचा याचा अर्थ तो वाईटाचा बरा होण्याकरितां पाठवावयाचा असा आहे; तेव्हां वाईट मुलास काढून टाकणें म्हणजे शाळा घालण्याच्या उद्देशाच्या मुळाला च कुऱ्हाड घालण्यासारखें आहे. एवढा तेवढा वाईट गुण मुलांच्या आंगीं असला कीं लागलें च पंतोजीनें हात टेंकणें व याजपुढें आपला इलाज चालत नाहीं, असें म्हणणें हें अगदीं अप्रशस्त आहे. ज्याला आपणास पंतोजीचें काम कांहींतरी येत आहे असा भरंवसा आहे तो दरएक वेळेस असे हातपाय कधीं गाळणार नाहीं. वास्तविक पहातां किती ही वाईट मुलगा असला तरी त्याला मार्गास लावणें हें काम पंतोजीचें आहे. ज्याचा धंदा मुलांस ओळीस लावण्याचा आहे, त्यानें त्यास हातचा सोडल्यावर त्याला ताळ्यावर आणावें कोणीं? याकरितां वास्तविक मार्ग हा आहे कीं, किती ही वाईट मुलगा असला तरी पंतोजीनें त्याला हातचा सोडितां कामास नये. परंतु जर एखादा मुलगा इतका वाईट असला कीं त्याच्या संगतीनें दुसऱ्या विद्यार्थ्यास खचीत अपाय होईल व एकासाठीं बहुतांचा घात होईल, तर मात्र पंतोजीनें त्याला दूर करणें भाग आहे; परंतु इतर मुलांचे नुकसानाखेरीज दुसऱ्या कोणत्या ही सबबेनें मुलास शाळेंतून काढूं नये.

एखाद्या मुलास चोरीची खोड असेल व कितीएक वेळ शारीर शिक्षा करून ही ती खोड जाईना, तर त्याला शाळेंतून घालवून देणें भाग आहे; किंवा एखाद्या मुलानें कांहीं सांगितलेली गोष्ट न ऐकण्याचा उघडपणें हट्ट केला, व त्याला त्याबद्दल एक दोन वार शिक्षा केली तरी तो आपला हट्ट सोडीना, व पुनः पुनः बोध केला, धाक घातला, मार दिला, तरी गुण येई च ना; व इतर मुलें त्याची क-

रणी पाहून बिघडूं लागलीं, तर दुसरा मार्ग नाहीं; त्या मुलाला शाळेंतून अप्रतिष्ठा करून काढून च टाकिलें पाहिजे. परंतु असल्या अपराधाखेरीज इतर कोणत्या ही अपराधासाठीं मुलास काढून टाकणें वाजवी होणार नाहीं.

पूर्वीं सांगितलें च आहे कीं जेव्हां पंतोजीचें अध्यापन चांगलें, लोकांनीं त्याचें अगत्य बाळगावें असें असेल, तेव्हां मात्र या तिन्ही शिक्षांत अर्थ आहे. पंतोजीच्या शिकविण्यांत च जीव नसेल, तर या शिक्षांपासून कोणास च कांहीं वाटावयाचें नाहीं; परंतु दुसरें असें आहे कीं ज्याच्या आंगीं अध्यापनाचें कौशल्य आहे, त्याला शिक्षा देण्याचा प्रसंग ही विशेष येत नाहीं. यावरून अध्यापन करण्यांत प्रावीण्य असण्याचें किती अवश्य आहे, हें पंतोजींनीं ध्यानांत आणावें. बहुतकरून शाळेंत शिक्षेचा प्रसंग येतो तो मुलें वर्गांत काय चाललें आहे त्याकडे लक्ष देत नाहींत, किंवा अभ्यासाची काळजी बाळगीत नाहींत, म्हणून येतो. अर्थात् पंतोजीला मुलांचें लक्ष चाललेल्या विषयाकडे कसें लावावें, व अभ्यासांत मुलांस गोडी कशी लावावी, हें साधत नाहीं, म्हणून या अवांतर साधनांनीं आपला हेतु त्याला सिद्धीस न्यावा लागतो. आपल्या कौशल्यांत जो खळगा आहे, तो भरण्याकरितां पंतोजी शिक्षेची भर घालतो असें म्हटलें पाहिजे. तेव्हां अर्थात् जसजसा खळगा जास्ती, तसतशी भर अधिक घातली पाहिजे. यास्तव पंतोजींनीं हें नेहमीं ध्यानांत ठेवावें कीं आपणांस आपलें काम उत्तम साधूं लागल्याची खूण च ही आहे कीं आपणांस शिक्षा करण्याचा प्रसंग कमी कमी येत जावा. "शाळेच्या सुधारणुकीची कमाल झाल्याची निशाणी ही च आहे कीं शिक्षा अतिशय थोडी देणें पडावी."

सर्व मुलांहून अधिक लिहावयास अगर पाठ करावयास देणें.—ही शिक्षा बहुतकरून ज्या मुलांनीं धडा केला नसेल त्यांना द्यावी. ही शिक्षा देते वेळेस दोन गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत. प्रथम ही कीं जें लिहावयास अगर पाठ करावयास द्यावयाचें तें मुलाच्या शक्तीबाहेर नसावें; दुसरी ही कीं जें काम द्यावयाचें तें असें असावें कीं कारण पडल्यास तें मुलांकडून सक्तीनें करून घेतां यावें. यावरून

सहज ध्यानांत येईल कीं मुलास तोंडपाठ करून आणण्याची शिक्षा देऊं नये. कारण एखाद्या वेळेस मुलगा हट्टी असला तर तो सांगितलेला धडा आपल्याला पाठ होत नाहीं म्हणून सांगेल. असें झाल्यावर त्याजकडून पाठ करून घेण्याचा इलाज नाहीं. खेरीज असें आहे कीं धाकानें कोणती ही गोष्ट पाठ होऊं शकत नाहीं. व एखादे वेळेस फार धाक दाखविल्यानें तर घाबरून पोराची बुद्धि जाते. व त्याला कांहीं च पाठ करवेनासें होतें. असें झाल्यावर तर त्याजपासून धडा पाठ करून घेण्याचा इलाज रहात नाहीं. हें सांगण्याचा उद्देश असा नाहीं कीं मुलांना कांहीं पाठ करावयास दिलें व त्यांनीं आपल्याला होत नाहीं ह्मणून म्हटलें म्हणजे स्वस्थ बसावें. पूर्वीं च सांगितलें आहे कीं एक वेळ जी गोष्ट करावयास सांगितली ती झाली च पाहिजे; तें पक्केपणीं ध्यानांत ठेवावें, त्यांत बिलकुल अंतर करूं नये. ही गोष्ट येथें सांगण्याचा उद्देश असा आहे कीं शिक्षेसाठीं पाठ करावयास देण्याचा प्रघात घातला तर त्यापासून हजारों पंचाइती निघतील, व असल्या पंचाइती जितक्या कमी होतील तितक्या कराव्या, इकडे पंतोजीचें लक्ष असलें पाहिजे. याकरितां अशी धडा पाठ करावयाची शिक्षा देऊं नये. पण अमुक एक लिहून आणा असें सांगण्यास कांहीं च हरकत नाहीं. कारण इतकें लिहिणें मुलाच्या हातून होईल किंवा नाहीं हें समजण्यास सुलभ आहे. व हें समजल्यावर इतकें झालें च पाहिजे असें विद्यार्थ्यास पंतोजीनें सांगण्यांत कांहीं च अडचण नाहीं. शिक्षेकरितां पाटीवर किंवा कागदावर लिहिण्याचें काम सांगण्यांत दुसरा ही एक फायदा आहे. तो हा कीं त्यामुळें हें काम करण्यास विद्यार्थ्यांस इतका वेळ मान मोडून बसावें लागेल असें सहज समजतें. पाठ करावयास किंवा उदाहरण करावयास दिल्यानें हें समजत नाहीं. एखाद्याची स्मरणशक्ति चांगली असते, किंवा एखाद्याची उदाहरण सोडविण्यांत बुद्धि चांगली चालते. तेव्हां त्यावरून अमुक वेळपर्यंत विद्यार्थ्यास शिक्षा केली असें या शिक्षेवरून पंतोजीस समजत नाहीं. लिहावयास देणें तें देखील जो धडा विद्यार्थ्यास तयार करावयास सांगितला असून त्यानें तयार केला नसेल तो देऊं नये. त्या जातीचें

कांहीं तरी दुसरें लिहावयास द्यावें. तसें च जी गोष्ट करावयास तो चुकला असेल ती च करावयास त्यास सांगू नये, इतकें च नव्हे, परंतु ज्या नियमाचें उल्लंघन त्यानें केलें असेल तो नियम किती हितकारक आहे अशाविषयीं ग्रंथांत कोठें प्रतिपादन केलें असेल तर तें प्रतिपादन सुद्धां लिहावयास देऊं नये. एखाद्या मुलानें अप्रामाणिकपणा केला असला, तर त्याला मराठी तिसऱ्या पुस्तकांतील "प्रामाणिकपणा"चा धडा पाठ करावयास किंवा उतरावयास दिल्यानें फायदा होईल असें नाहीं; परंतु उलटा तो धडा त्यानें आपल्या खुषीनें वाचिला असतां त्यापासून त्याला जो लाभ झाला असता तो मात्र होण्याचा संभव नाहींसा होईल. शिक्षेकरितां जें काम करावयाचें तें मनुष्य सहज च कंटाळ्यानें व तिरस्कारानें करितें, तेव्हां मुलगा जुलमानें तो धडा वाचूं लागला म्हणजे त्यापासून, सहजवृत्त्या वाचूं लागला असतां त्याच्या मनास जो बोध व्हावयाचा, तो न होतां त्याजविषयीं विरुद्ध बुद्धि त्याच्या मनांत यावयाचा संभव विशेष आहे. मुलगा मूळचा हट्टी असला तर असें ही होईल कीं जर प्रथम तो खोटें बोलला, तें दुर्लक्षानें व हालगरजीनें झालें असलें, तर पुढें हट्टानें तसें च करूं लागेल. याकरितां शिक्षेसाठीं जें लिहावयास द्यावयाचें तें असें शोधून काढावें कीं त्याचा त्या मुलाच्या चुकीशीं अगर शाळेंतील अभ्यासाशीं कांहीं संबंध नसावा. व तें असें असावें कीं तें लिहावयास कठिण, व कंटाळा येण्यासारखें असावें, ह्मणजे मुलास ती शिक्षा असें वाटेल. तसें न करितां मुलानें प्रीतिपूर्वक व लक्षपूर्वक जी गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे तीसंबंधी लिहावयास दिलें तर ज्याअर्थी हें शिक्षेकरितां लिहावयास दिलें आहे त्याअर्थी तें द्वेषास पात्र आहे अशी मुलांची समजूत सहज होईल.

रागें भरणें.—रागें भरण्याचा पाठ जितका कमी ठेवावा तितकें तें विद्यार्थ्यांच्या मनास अधिक लागतें. व जसजसा पंतोजी अधिक विचारपूर्वक व तारतम्यानें रागें भरण्याचा पाठ ठेवील तसतसा त्याच्या रागें भरण्याचा गुण अधिक अधिक अनुभवास येईल.

वारंवार दोष देण्यानें मुलाला तें नित्यकृत्याप्रमाणें होतें व दोष देणें तो फार लोकांसमक्ष दिला, व देतांना फार रागावून बोलूं लागलें,

तर मुलाला त्याबद्दल शरम व दिलगिरी वाटत नाहींशी होते. पंतोजी या कामांत मुलांची वृत्ति जशी नाजुक ठेवील तशी ती राहते. एखादा पंतोजी थोड्या गोष्टीसाठीं देखील मुलांची सर्वांत अति फजिती करितो व त्यांस मर्मभेदक शब्द बोलतो, तेणेंकरून मुलांच्या अंतःकरणांस जसे काय घट्टे च पडतात. चांगला पंतोजी शाळेंतील मुलांचीं अंतःकरणें अशीं कोमल ठेवितो कीं एखाद्या मुलास दुसऱ्याच्या समक्ष थोडासा उणा शब्द बोलला तर त्याला तो मरणप्राय वाटावा; परंतु जो मुलांचें अंतःकरण असें कोमल ठेवण्यास प्रयत्न करीत नाहीं तो घसा फुटे तोंपर्यंत ओरडून ओरडून शिव्या देऊन दमला तरी मुलें तें मुळीं च मनावर घेत नाहींत. याकरितां मुलांस वारंवार रागें भरून आपल्या रागाचा उपहास करून घेऊं नये. फार मोठा अपराध झाल्याखेरीज सर्व लोकांसमक्ष रागें न भरण्याचा पाठ ठेवून एखाद्या मोठ्या प्रसंगीं च त्याची योजना करावी; ह्मणजे सर्व लोकांत ज्याला रागें भरावें त्याचा अपमान होतो. नाहीं तर ' सकट घोडे बारा टक्के ' झाले म्हणजे आपल्या हातचें एक शिक्षा करावयाचें साधन अजीबात नाहींसें होऊन जातें.

पंतोजीनें मुलास एखादी शिकवणीची गोष्ट सांगावयाची असेल, ती त्याला एकीकडे बोलावून सांगितली तर मुलाची वृत्ति फार चमत्कारिक रीतीनें पालटते. शाळेच्या वेळाखेरीज मुलांशीं बोलण्याचा व त्यांच्या मनांत काय असेल तें ऐकून घेण्याचा पाठ पंतोजीनें नेहमीं ठेवावा. त्याखेरीज मुलाचें हृद्गत त्यास बराबर समजत नाहीं. असें हृद्गत समजल्यानें मुलांचें अंतःकरण वळविण्याचें सामर्थ्य पंतोजीच्या आंगीं विशेष येतें. व नेहमीं एकीकडे मुलांशीं ममतेनें बोलण्याचा पाठ असला म्हणजे शिकवणीची गोष्ट सांगितली तर ती मुलांच्या ध्यानांत पक्की राहते. एका शाळेवर दोन पंतोजी असत. एक एक च विषय शिकवीत असे, व दुसरा इतर सर्व विषय शिकवीत असे; तेथें एका वर्गांत एक मुलगा हुशार पण उनाड होता. तो, जो पंतोजी एक च विषय शिकवीत असे, त्याशीं सहसा उनाडपणा करीत नसे, परंतु दुसऱ्याच्या वर्गांत फार च खोड्या करी व त्रास देई. एका दिवशीं हे

दोघे पंतोजी बोलत असतां त्या मुलाची गोष्ट निघाली. तेव्हां एक त्यास वाखाणूं लागला व दुसरा नांवें ठेवूं लागला. ती गोष्ट ज्याचें तो मुलगा ऐकत असे, त्यानें ध्यानांत ठेवून त्या मुलास एकीकडे बोलावून आणून, त्यास सांगितलें कीं "तूं मजवर जसें लक्ष ठेवितोस तसें इतर शिक्षकांवर ठेवीत नाहींस, ही गोष्ट वाईट आहे. माझी देखरेख तुझ्या सर्व अभ्यासावर नेहमीं नाहीं. तूं केवळ माझे धडे नीट केलेस, व मजशीं नीट वागलास म्हणजे झालें असें नाहीं. सर्व ठिकाणीं तूं तसा च न वागलास तर तुझें हित होणार नाहीं. तूं हुशार आहेस म्हणून इतर ठिकाणीं कसा वागतोस हें मी नेहमीं पाहात असतों; व तुझें वर्तन सर्वत्र सारखें नाहीं असें पाहून मला खेद होतो, तर तूं असें आचरण सोडून दे." एवढें सांगितल्यानें त्या मुलाची वृत्ति अगदीं बदलली. तो दुसऱ्या वर्गांत ही चांगल्या रीतीनें वागूं लागला; व ज्यानें त्यास बोध केला त्या शिक्षकास तर तो फार च मानूं लागला. त्यानें झालेली गोष्ट आपल्या वडिलांस कळविली. त्यापासून तो दुसरा पंतोजी त्याच्या घरच्या माणसांसारखा झाला. व कोणते ही कामांत तो मुलगा त्या पंतोजीस विचारिल्याशिवाय पाऊल टाकीनासा झाला. वर्गाच्या शिक्षकास त्या मुलाच्या वर्तनांत अंतर झालें हें तेव्हां च समजलें, व तो ही त्या मुलास चांगलें म्हणूं लागला. सारांश मुलांस, आपणांवर पंतोजीचें लक्ष सदैव असतें असें समजण्याकरितां पंतोजीनें नेहमीं त्यांची विचारपूस करीत असावें; व त्यांस एकीकडे बोलावून त्यांस शिकवणीची गोष्ट एकांतीं सांगण्याचा पाठ ठेवावा म्हणजे त्या पंतोजीच्या रागें भरण्याचा बोज राहील.

आतां एका च शिक्षेविषयीं बोलावयाचें राहिलें आहे, ती शारीर दंड ही होय; हिचा सर्वांत प्रशस्त प्रकार म्हटला म्हणजे मुलास छडीनें मारणें हा च आहे. आतां या शिक्षे खेरीज जितकें चालेल तितकें बरें च हें खरें. परंतु जरूर पडेल तेथें ही शिक्षा करणें पंतोजीस लांछन आहे किंवा तिनें मुलांची अब्रू जाते अशी गोष्ट नाहीं. कांहीं लोकांची अशी कोती समजूत असते कीं शारीर दंड दूषणार्ह आहे असें म्हणतात, तें फक्त छड्या मारण्यास मात्र लागू आहे. अशा समजुतीनें ते छड्या

मारण्याबद्दल दुसरे शिक्षांची योजना करितात, व ते प्रकार बहुतकरून छड्या मारण्यापेक्षां अधिक दूषणास्पद असतात. वास्तविक विचार पाहतां ज्या शिक्षेपासून शरीरास इजा होते त्या सर्व शिक्षा सारख्या समजल्या पाहिजेत. बाकावर उभें करणें, कोलदांडा घालणें, घोडी देणें, डोकीवर पाटी देऊन उन्हांत उभें करणें, खुर्ची देणें, थोबाडींत देणें, लाथ देणें, कान उपटणें, या सर्वांचा शारीर दंडांत च समावेश होतो. यांपैकीं कितीएक शिक्षा देणें म्हणजे इतकें क्रूर कर्म आहे कीं कोणत्या ही सबबेनें तें ज्या पंतोजीच्या हातून घडेल तो मुलास शिक्षा लावण्याच्या कामास केवळ नालायक असला च पाहिजे; परंतु नेमस्तपणें शारीर दंड केल्यानें फार उपयोग होतो, व कितीएक प्रसंगीं त्याजपासून जें कार्य होतें तें दुसऱ्या कोणत्या च उपायानें घडत नाहीं. याकरितां ती शिक्षा कायम ठेविली च पाहिजे. यापूर्वीं एक दोन वेळा सांगितलें च आहे कीं मुलांवर अंमल चालविण्याची भिस्त फारकरून अध्यापनाच्या खुबीवर असावी, आणि मारणें हाणणें यांवर भरंवसा ठेवणें ही अगदीं च नाइलाजाचे प्रसंगीं पत्करण्याची गोष्ट होय; व यापुढें ही पुनः असें च सांगणें आहे. परंतु कधीं कधीं असा च प्रसंग येतो कीं त्या वेळेस चवदाव्या रत्नाखेरीज होत च नाहीं. कांहीं पोरें अशीं हट्टी असतात कीं त्यांना माराचे धाकाखेरीज आकळून धरितां च येत नाहीं. लहान मुलांला समजूत कमी असते. त्यांची दुसरा समजूत घालूं लागला तरी लवकर पडत नाहीं. कारण त्यांची बुद्धि कोती असते. त्यांची छडीनें जशी समजूत होते तशी बोध करून कधीं च होणार नाहीं. याकरितां थोर मुलांपेक्षां लहान मुलांस मारण्याची गरज अधिक पडते. खेरीज मागें **कोलरिजू**चा दाखला घेऊन सांगितलें आहे, त्याप्रमाणें एखादे मुलास पोकळ डौल फार असतो, किंवा हेकडपणा फार असतो; तसल्या मुलाशीं समजूत घालण्यासाठीं जों जों अधिक बोलावें तों तों तो अधिक च विथरत जातो. त्याला असें वाटतें कीं पंतोजी माझें आर्जव करूं लागला, आणि त्यामुळें तो अधिक च शेफारतो. अशा ठिकाणीं ही मार खूब काम करितो. एक मार सडकून बसला कीं आपोआप मूल ताळ्यावर येतें,

व पुनः बिघडत नाहीं. तसें च एखाद्या वेळेस एखादा मुलगा चांगला हुशार असतो, परंतु सर्वांबरोबर जें काम त्यास नेमून द्यावें तेवढें तो सहज करून टाकितो, व त्याला करावयास कांहीं उरत नाहीं; यामुळें म्हणा, किंवा दुसऱ्या कांहीं असल्या च कारणावरून म्हणा, तो बिघडून जातो. व समजून उमजून असली एखादी खोडी करितो कीं तेथें ती त्यानें अमुक सबबीनें किंवा अमुक गैरसमजुतीनें केली असेल अशी शंका सुद्धां काढितां येत नाहीं. अशा ठिकाणीं त्या मुलाशीं उपदेशाच्या गोष्टी सांगत बसून त्यास चढवून देणें हें अगदीं उपयोगी नाहीं. या विकारावर मार हें च उत्तम औषध आहे.

एके शाळेंत एक हुशार मुलगा होता. त्याची हुशारी पाहून त्याला लहान मुलांस शिकविण्याचें काम सांगितलें; व त्याचें वय लहान असतां ही पंतोजी, तो अंमळ प्रौढ आहे, असें समजून त्याशीं वागूं लागला. एवढ्या च निमित्तानें त्या मुलाची वृत्ति बिघडली. त्याला विनाकारण असें वाटूं लागलें कीं आपल्या योग्यतेप्रमाणें आपला मान राहत नाहीं. असें होतां होतां एके दिवशीं त्या मुलानें फार च उच्छृंखळपणा केला. मुख्य गुरु बाहेर गेले होते, व शाळेचें काम एक उपगुरु करीत होता. इतक्यांत असें झालें कीं त्या मुलाच्या धाकट्या भावानें कांहीं अपराध केल्यावरून त्याला उभें करण्याचा प्रसंग उपगुरूस आला. तसें करितां च हा उच्छृंखळ मुलगा जाग्यावरून उठून पुढें आला व त्यानें सर्व शाळेंतील मुलांच्या देखत उपगुरूस तुला असें करण्याचा अधिकार नाहीं, असें दरडावून सांगितलें. वास्तविक पाहतां हें त्या मुलाचें वर्तन इतकें गैरशिस्त होतें कीं जरी तो वयानें मोठा होता तरी त्या वर्तनाबद्दल त्याला सर्वांसमक्ष फरमाशी मार देणें ह्याखेरीज दुसरें योग्य पारिपत्य नव्हतें. पुढें गुरुजी शाळेंत आल्यानंतर उपगुरूनें झालेला वृत्तांत त्यांस सांगितला. वर सांगितल्याप्रमाणें गुरुजींस ही असें वाटलें कीं ह्या पोरास मार च दिला पाहिजे. याप्रमाणें निश्चय करून त्यांनीं त्यास ताबडतोब शिक्षा केली. व त्या दिवसापासून पुनः त्या मुलानें द्वाडपणा असा केला नाहीं. त्याच्या काळजांतली अभिमानाची कीड मेली, व त्याची वृत्ति आ-

नंदी जाहली; व तो मनापासून उद्योग करूं लागला. गुरुजींविषयीं ही त्याची पूज्यबुद्धि वाढली; व ते बोलतील केव्हां आणि मी काम करीन केव्हां असें तो त्यांच्या आज्ञेस जपूं लागला. पुढें दोन वर्षेपर्यंत मीं या मुलावर नजर ठेविली होती. तितक्या मुदतींत त्याच्या वृत्तींत काडीमात्र भेद जाहला नाहीं. अशीं दुसरीं ही उदाहरणें पुष्कळ नजरेस पडतात. तेथें वर सांगितलेला उपाय च सर्वत्र सर्व प्रकारें गुणास येतो. त्याच्या योगानें मुलांची त्या वेळची वागणूक सुधारते, व थोरपणीं ही त्यांचें हित होतें. कांहीं प्रौढ वयाचीं मनुष्यें अशीं नजरेस येतात कीं त्यांच्या मनास संतोष हा पदार्थ च माहीत नाहीं. त्यांस विनाकारण असें वाटत असावें कीं आपल्या आंगच्या गुणांची या दुनियेंत चीज होत नाहीं. असें म्हणून त्यांनीं उगी च आपल्या मनांत कुढत असावें. त्यांचें म्हणणें अगदीं निराधार व निरुपयोगी आहे अशी त्यांची बहुत प्रकारें समजूत घातली तरी त्यांच्या मनाचा रोग जात नाहीं. ते वयानें प्रौढ असल्या कारणानें मुलांप्रमाणें त्यांस शारीर दंड करितां येत नाहीं. यामुळें ते जसे जसे मोठे होतात तसतशी त्यांची खोड वाढत च जाते; आणि दिवसानुदिवस ते स्वतः अधिकाधिक दुःखी होऊन दुसऱ्यास ही त्रासदायक होतात. परंतु अंमळ लहानपणीं च अशा मनुष्यांना जरा विचारी पण खरमरीत गुरु भेटता तर त्यांचें काम ठीक होतें; व त्यांची वृत्ति सदां दुःखी न होतां ते नेहमीं समाधानी राहिले असते, व उल्हासवृत्तीनें दुसऱ्याच्या उपयोगीं पडले असते. सारांश योग्य प्रसंगीं थोडाबहुत शारीर दंड करण्यास पंतोजीनें मागें पुढें पाहूं नये; व लोकांनीं ही त्यांत मुलांची अप्रतिष्ठा होते, व त्यांना गुरांप्रमाणें वागविल्यासारखें होतें, असे कुतर्क काढूं नयेत.

एथपावेतों शिक्षेच्या वेगवेगळाल्या प्रकारांचें वर्णन जाहलें. मागें शिक्षेपासून दोन गोष्टी साधावयाच्या असें सांगितलें च आहे. ह्मणजे तिजपासून झालेल्या अपराधाबद्दल अपराध्यास शासन व्हावें, व तसा अपराध पुनः घडूं नये. हीं दोन्ही कार्यें सिद्ध होण्याकरितां शिक्षा देतांना कोणते नियम ध्यानांत ठेविले पाहिजेत, याचा आतां थोडासा

विचार करूं. या संबंधानें खालीं लिहिलेल्या नियमांप्रमाणें वागलें असतां फार हित होईल.

१. जसजसें विद्यार्थ्यांचें वय अधिक होईल तसतशी शिक्षा कमी असावी.

२. शारीर शिक्षा करणें ती फार मोठ्या अपराधाबद्दल मात्र करावी.

३. शिक्षा केवळ शाळेचा नियम मोडल्याबद्दल मात्र असावी. शिक्षेंत पंतोजीच्या मर्जीप्रमाणें किंवा मुलांवर पंतोजीची ममता असेल त्याप्रमाणें कमजास्तपणा कधीं होऊं नये.

४. अमुक अपराधास अमुक शिक्षा करावयाची असा नियम केल्यावर त्या त्या अपराधाबद्दल ती ती शिक्षा केली च पाहिजे. कोणत्या ही कारणानें ती कोणास ही चुकवूं देऊं नये.

५. शिक्षा करणें ती गुण येईपावेतों करावी.

६. शिक्षा समान असावी.

७. शिक्षा केल्यावर मुलाबद्दल वाईट कल्पना मनांत अगदीं बाळगूं नये.

हे वर लिहिलेले नियम व त्यांजविषयीं पुढें थोडथोडें विवरण केलें आहे तें विशेषेंकरून शारीर शिक्षेस लागू आहे. परंतु शिक्षेचे जे इतर प्रकार सांगितले आहेत त्यांस ही थोडेंबहुत लागू आहे च.

लहानपणीं मुलांस एखादी गोष्ट करूं नये किंवा करावी म्हणून सांगितलें तर त्यांस तेवढें समजतें; परंतु ती गोष्ट कां करूं नये, अगर कां करावी हें समजत नाहीं. तसें च अब्रू म्हणजे काय, ती जाते कशानें हें ही त्यांना कळत नाहीं. त्यांस कोणतें ही काम कर म्हटलें म्हणजे करावें, नको म्हटलें म्हणजे न करावें, याखेरीज कांहींएक समजत नाहीं. याकरितां त्यांजकडून पाहिजे तशी वर्तणूक करविण्यास शिक्षा करून धाक लावावा लागतो. त्यांची समजूत करून त्यांस मार्गास लावावयाचा इलाज नसतो. परंतु जसजसा मुलगा प्रौढ होऊं लागतो तसतसा त्याला कार्याकार्यभाव समजूं लागतो, व अब्रू म्हणजे काय हें ही समजूं लागतें. परंतु ही समजूत अगदीं च आपोआप येते असें नाहीं. ती येण्याला त्याला वारंवार बोध करावा लागतो, व त्याचें मन मार्गास

लावावें लागतें. पंतोजीनें मुलांमध्यें आपलें वर्चस्व ठेवावयाचें तें या च द्वारें ठेवावें; म्हणजे वारंवार असा बोध करावा, व त्यांची वर्तणूक अशी फिरवावी कीं तेणेंकरून मुलांस पंतोजी हा कोणी थोर योग्यतेचा, व मान देण्यास योग्य, पुरुष आहे असें वाटावें; व त्याच्या उपदेशानें मुलांचीं मनें अशीं व्हावीं कीं त्यांस अपराध करण्याची इच्छा च होऊं नये. अपराध झाला तर शिक्षा जबर होईल असा पंतोजीचा धाक असणें यांत कांहीं विशेष नाहीं. पंतोजीच्या वागणुकीनें मुलांस अपराध करूं च नये असें वाटावें; हें उत्तम आहे. उद्योगाशिवाय काळ घालविणें, जे नियम घालून दिले असतील ते मोडणें, वगैरे गोष्टी आपल्या हातून घडणें हें च अनुचित व निंद्य आहे, हें मुलांस समजूं लागेल अशी पंतोजीनें तजवीज ठेवावी. अमुक एक गोष्ट केली असतां मार बसेल ह्मणून ती करूं नये अशी लहान मुलांची समजूत असते; परंतु मुलगा थोर होत जाईल तसतशी त्याची अशी समजूत व्हावी कीं शिक्षा होवो अगर न होवो, अपराध करणें हें कृत्य च अयोग्य आहे. असें झाल्यानें मुलें सहज च आपल्याहातून अपराध घडूं नये म्हणून झटतील. तसेंच मुलांस असें समजवावें कीं जर मी 'शिंगें मोडून वासरांत शिरूं लागेन' ह्मणजे वयानें मोठा झाल्याप्रमाणें अधिक समजूत धरून खोड्या वगैरे करावयाचें सोडून न देईन व लहान मुलांप्रमाणें च असमंजसपणानें खोड्या वगैरे करूं लागेन, तर लहान मुलांप्रमाणें च मी ही शिक्षेस पात्र होईन. ज्याला थोरपणा संपादून लहान मुलास योग्य अशा मार वगैरे शिक्षा चुकवावयाच्या असतील, त्यानें थोरपणानें वागलें पाहिजे, व अपराध करावयाचें ही सोडून दिलें पाहिजे. जर मी लहान मुलांप्रमाणें असमंजस वर्तन ठेवीन तर त्यांच्याप्रमाणें शिक्षेस ही पात्र होईन, हें त्यास पक्कें समजावून द्यावें. व त्याची अशी खातरी करावी कीं असें असून ही पंतोजी मला मार वगैरे देत नाहीं, तें माझी योग्यता मोठी म्हणून नव्हे, परंतु इतके मोठे मुलास शिक्षा देण्यानें वयाचा अपमान होतो ह्मणून. त्या मुलास असें जाणवावें कीं मी स्वतः आपल्या वयाचा जितका मान राखितों त्यापेक्षां पंतोजी अधिक राखितात. असें मुलास जाणविल्यानें हजार वांद्यांनीं

तो पोरपण टाकून देईल; व शारीर शिक्षेचें कारण राहणार च नाहीं. परंतु पंतोजीचें अशा तऱ्हेच्या मुलावर वजन राहणें तें पंतोजी आपल्या विद्येंत वगैरे परिपूर्ण व शिकविण्याच्या कामीं तत्पर असून मुलांनीं मान देण्यास योग्य असा असल्याशिवाय राहणार नाहीं.

मुलाचें वय सोळा वर्षांचें जाहलें ह्मणजे त्यास सहसा मारूं नये. आपली जुनी ह्मण आहे कीं 'लालयेत्पंचवर्षाणि दश वर्षाणि ताडयेत् । प्राप्ते षोडशवर्षे तु पुत्रे मित्रवदाचरेत्' म्हणजे प्रथम पांच वर्षें मुलाचे लाड करावे, पुढें दहा वर्षें त्यास मारण्याची वहिवाट ठेवावी, व सोळावें वर्ष लागलें म्हणजे त्याशीं स्नेहाच्या रीतीनें वागावें. ह्मणजे सोळावे वर्षापुढें जशी आपण मित्राची समजूत घालून त्यास नीट रीतीनें वर्तावयास लावितों त्याप्रमाणें मुलाची समजूत घालावयास इलाज करावा, त्याला मारूं नये. कारण त्या वयांत जर समजुतीनें तो ताळ्यावर न येईल तर मारानें देखील येणें दूरापास्त च आहे; व जरी वेळेपुरतें एखाद्या वेळेस त्यानें मार खाऊन सांगितलेलें काम ऐकिलें तरी त्यापासून त्याला कांहीं फायदा होईल असें नाहीं. मुलास समजूं लागल्यावर, त्याची समजूत घालून दिली, व त्याच्या बुद्धीचें व स्वभावाचें मान ध्यानांत धरून त्यास काम दिलें, ह्मणजे शारीर शिक्षेशिवाय त्यास हुकमाप्रमाणें वर्तविण्यास बहुतकरून कांहींएक अडचण नाहीं. जर पंतोजी चांगला आहे, व एक च वर्ग त्याच्या ताब्यांत आहे तर अगदीं शारीर शिक्षा केल्याशिवाय तो काम चालवील यांत संदेह नाहीं. परंतु सबंध शाळेचें काम अशा रीतीनें होण्याचा संभव नाहीं. कारण शाळेंत लहानमोठ्या मुलांचे वर्ग कितीएक असणार; शिक्षकांच्या बदल्या कितीएक वेळ होणार. तेथें माराशिवाय कधीं चालावयाचें नाहीं. मोठा समुदाय असेल तेथें म्हणजे मार खाणार मंडळी असली च पाहिजे, असें खातरीनें म्हणतां येईल असें नाहीं; परंतु शिक्षक वरच्यावर बदलत असले ह्मणजे त्यांत कोणी तरी मध्यम मनुष्य येतो च व केव्हां तरी मुलांचें त्याचें बनेनासें होतें. असें झालें म्हणजे क्रमाक्रमानें शारीर शिक्षेचा प्रसंग येतो च. खेरीज, वर्गांचें काम चांगल्या शिक्षकास शारीर दंडाशिवाय

करितां येईल असें म्हटलें तरी, प्रसंग पडल्यास शारीर दंड व्हावयास चुकणार नाहीं, असा मुलांस धाक असल्यानें शिक्षकास मोठी मदत होते, व याकरितां जरी शिक्षकास प्रत्यक्ष शिक्षा करावयाची नसली, तरी त्यानें विद्यार्थ्यांची ही शिक्षा मुळीं च काढून टाकिली आहे अशी समजूत बिलकूल होऊं देऊं नये.

थोर मुलांस माराची शिक्षा देऊं नये असें ह्मटलें, एवढ्यावरून लहान मुलांस नेहमीं मारीत जावें असें कोणीं समजूं नये. हें सांगण्याचें तात्पर्य इतकें च कीं लहान मुलांस प्रसंग पाहून मारिलें तर चालेल, पण थोर मुलांस कधीं ही मारूं नये; याहून अधिक कांहींएक नाहीं. प्रौढ मुलें असलीं ह्मणजे जें काम समजुतीनें होतें तें लहान मुलें असलीं तर ममतेनें होतें. वर सांगितलें आहे कीं कोणतें ही काम, वाईट कां आहे, किंवा चांगलें कां आहे, असें मुलांस समजावून दिलें म्हणजे तीं वाईट काम करणार नाहींत, व चांगलें केल्याशिवाय राहणार नाहींत. तसें च, पंतोजीनें आपल्या विद्यार्थ्यांवर ममता ठेविली, व आपलें काम झटून केलें, तर त्यावर मुलांची ममता तेव्हां च जडेल व मुलांचें प्रेम त्यावर एकवार बसलें ह्मणजे त्याचें ह्मणणें तीं कधीं मोडणार नाहींत. याकरितां पंतोजीनें आपले सर्व विद्यार्थ्यांवर मनःपूर्वक ममता करावी ह्मणजे तीं त्याजवर दुप्पट ममता करतील, आणि ममता करूं लागलीं म्हणजे त्याची आज्ञा त्यांस नेहमीं प्रमाण होईल. दुसऱ्या कांहीं तरी युक्तीनें त्यांनीं आपलें ऐकावें अशी योजना करण्याचें बिलकुल कारण नाहीं.

**दुसरें.**—शिक्षा मोठ्या अपराधाबद्दल मात्र करावी. कोणती ही गोष्ट फार जाहली ह्मणजे तिचा बोज राहत नाहीं. लहानसहान चुकीबद्दल सुद्धां शिक्षा करावयाची असा पाठ घातल्यानें शिक्षा वारंवार करावी लागते; व शिक्षा वारंवार केली म्हणजे मुलें ती फारशी मनास आणीत नाहींत. कारण वारंवार शिक्षा होऊं लागल्यानें तिजबद्दल मुलांस जी शरम किंवा धाक असावयाचा तो नाहींसा होतो. शिक्षा म्हणजे त्यांना नित्यकृत्य होऊन जाते. परंतु शिक्षा प्रसंग पाहून थोडे च वेळ करावयाची व ती करितांना जसें एखाद्या मोठ्या पात-

काबद्दल प्रायश्चित्ताचें विधान करावयाचें असा डौल ठेविल्यानें होईल तितकें करून आपण शिक्षेस पात्र होऊं नये अशाविषयीं मुलें झटूं लागतात. एके पंतोजीची अशी रीत असे कीं मुलाला शारीर शिक्षा द्यावयाची झाली ह्मणजे त्याला एका वेगळे खोलींत न्यावयाचें, तेथें त्या वेळेस दुसरे कोणास आंत येऊं द्यावयाचें नाहीं. व शिक्षा केल्यावर त्याला एक घटकाभर बाहेर जाऊं द्यावयाचें नाहीं. अशी तजवीज ठेविल्यानें मुलें शिक्षेस फार भिऊं लागलीं. जरी खोलींत नेल्यावर आंत पंतोजी त्यांस फार मारीत नसे तरी तेथें जाऊन बसणें हें च मुलांना प्राण गेल्याच्या पलीकडे वाटे. हा सर्व गुण, त्याला तेथें न्यावयाचा आणि कांहीं वेळ बसवावयाचा हा जो प्रकार शिक्षेस जोडला होता, त्याचा होय. मुलास असें वाटे कीं हें काय प्रकरण आहे कोण जाणे! दुसरें असें आहे कीं ज्या पंतोजीची नजर अपराध कोणीं केला हें ओळखण्याच्या कामांत चांगली चालते त्यापुढें ज्याच्या हातून चुकी झाली असेल त्या मुलाच्यानें उभें राहवत नाहीं. त्यानें डोळे वटारून मुलाकडे पाहिलें म्हणजे तो गर्भगळीत होतो. त्याचें मन च त्याला खाऊं लागतें. व त्याची सर्व मस्ती जाऊन तो गरीब होतो. दुसऱ्याच्या व विशेषेंकरून सोबत्याच्या समोर मुलास शिक्षा करूं लागलें ह्मणजे एखादे वेळेस असें होतें कीं मुलगा अधिक च धट्टाई करूं लागतो, व आपल्या सोबत्यांस असें दाखवूं लागतो कीं आपण असल्या शिक्षेची काडीमात्र परवा करीत नाहीं. जरी त्याच्या मनांत आलें कीं, आपल्या हातून चुकी घडली खरी, तरी दुसऱ्या मुलांस तसें दाखविल्यानें आपली त्यांजमध्यें बेअब्रू होईल असा खोटा गर्व मनांत धरून, शिक्षा घेतां घेतांच तो धट्टाई करूं लागतो. याकरितां बहुतकरून किरकोळ अपराधासाठीं शिक्षा करणें ती एकीकडे च करावी.

**तिसरी** गोष्ट सांगितली ती ही कीं, शिक्षा करण्याच्या कामांत पंतोजीचा अगर मुलांचा खासगी संबंध मुळीं च नसावा. ह्मणजे, पंतोजीस कांहीं खोडी केलेली समजली तर त्यानें "कोणी केली रे ती खोडी?" "गोंद्यानें." तर "दे त्याला चार छड्या." "छे छे मुरारराावानें." "बरें तर त्याला जाऊं दे; त्याला पुनः असें करूं नको ह्मणावें." असा प्रकार

मात्र करूं नये. शिक्षा देण्याचा प्रकार किंवा थोडीफार शिक्षा देणें तें सर्व अपराधाच्या मानानें ठरवीत असावें. पाटलाच्या मुलानें माशी मारिली तर सोन्याची माशी करून जोशीबावांस द्यावी; व जोशीबावांच्या मुलानें मारिली तर 'विष्णवे नमः' म्हणावें ह्मणजे झालें; असा प्रकार नसावा. अमुक अपराधास अमुक शिक्षा असा नियमितपणा असावा. मग तो अपराध कोणीं केला तरी ती च शिक्षा असावी.

मुलानें मला स्वतः राग आणिला असें म्हणून त्याला पंतोजीनें शिक्षा करूं नये. मुलाच्या हातून नीतीचें अथवा कायद्याचें उल्लंघन झालें आहे व त्यांचें संरक्षण करण्याचें काम माझें आहे, असें समजून त्या बेतानें पंतोजींनें मुलास शिक्षा केली पाहिजे, उदाहरणार्थ–मुलगा एखादा शब्द अमर्यादेनें बोलला तर त्याजबद्दल सूड उगविण्याकरितां त्यास शिक्षा करूं नये परंतु मुलास तशी संवय लागली असतां वाईट, व मुलास कोणते ही प्रकारें न बिघडूं देण्याचें आपलें काम आहे, या समजुतीनें पंतोजीनें मुलास जें शासन करायाचें तें केलें पाहिजे. तसें च आपल्या आज्ञेचें उल्लंघन केलें तरी हा आपला उपमर्द झाला, या रागानें मुलास शिक्षा करूं नये; तर, माझ्या आज्ञेचें हा उल्लंघन करूं लागला तर याचें पुढें बरें होणार नाहीं, ह्मणून त्यास उल्लंघन करूं न दिलें पाहिजे, व तसें करण्याकरितां शिक्षा करणें अवश्य आहे; अशा समजुतीनें च मुलास शिक्षा केली पाहिजे.

कांहीं मोठमोठ्या शाळांत शिक्षा देण्याचें काम एका च शिक्षकाकडे नेमिलेलें असतें. कोणत्या ही शिक्षकाला मुलास शिक्षा करणें झाली तरी तो न्यायाधीशाप्रमाणें शिक्षा सांगतो मात्र. परंतु प्रत्यक्ष छड्या मारणें वगैरे असेल तें तो नेमिलेला माणूस करितो. यामुळें असें होतें कीं रागाच्या झपाट्यानें कोणती ही शिक्षा दिली जात नाहीं. अन्याय ज्याच्या पुढें झाला असेल तो च शिक्षा करूं लागला म्हणजे तो रागाच्या स्वाधीन होतो, व त्याचा शांतपणा जातो. परंतु असा बंदोबस्त केला असला ह्मणजे कोणास च आवेश न येतां शिक्षा होणें ती विचारानें होते व त्यांत खासगी संबंधाची अदावत कोणत्या ही प्रकारची येत नाहीं.

शिक्षा करणें ती अपराधास लक्षून असावी. आपणांस अगर विद्यार्थ्यांस लक्षून नसावी. असें म्हटलें यांत च पंतोजीनें निष्पक्षपातानें वागावें हें आलें. अगदीं निष्पक्षपातानें काम चालतें अशी विद्यार्थ्यांची पूर्ण खातरी असल्याशिवाय त्यांचा आपणावर भरंवसा बसेल अथवा आपल्या मनांत आहे तें कडेस जाईल अशा रीतीनें ते वागतील, हें पंतोजीनें कधीं मनांत आणूं नये. पक्षपात करून ही या गोष्टी साधण्याचा तो आव घालूं लागेल तर त्याचा व्यर्थ उपहास मात्र होईल. पंतोजीनें निष्पक्षपात असलें पाहिजे, ही गोष्ट इतकी उघड आहे कीं तिजविषयीं कारणें देत बसण्याची जरूर नाहीं. परंतु निष्पक्षपात म्हणजे काय हें पक्कें ध्यानांत येण्याकरितां कांहीं सांगणें जरूर आहे.

बहुतकरून लोकांस पक्षपात ह्मणजे काय, व समदृष्टि म्हणजे काय हें सांगावयास पाहिजे असें नाहीं; परंतु असे कांहीं अडचणीचे प्रसंग आहेत कीं त्या वेळेस मनुष्याची नजर चकण्याचा फार संभव आहे. सामान्यतः हा नियम बरा च आहे कीं एका अपराधास एक च शिक्षा असावी; म्हणजे एकानें एखादा अपराध केला असतां जी शिक्षा त्यास दिली, तिजहून अधिक अथवा कमी, दुसऱ्यानें तो च अपराध केला असतां, त्यास देऊं नये. परंतु मूल पाहून शिक्षा न केली तर ऐखादे वेळस या नियमापासून निष्पक्षपात न साधतां उलटा अधिकउणी शिक्षा केल्याचा दोष येईल. समजा कीं दोघां मुलांनीं एक च अपराध केला आहे, व त्याबद्दल त्यांस रागें भरून ताकीद देणें ही शिक्षा ठरविली आहे. या दोन मुलांपैकीं एक मुलगा फार च कोमल अंतःकरणाचा व शरम बाळगणारा आहे. आणि दुसरा निरढावलेला व निगरगट्ट आहे. या दोघांस एकसारखी च ताकीद दिली तर कसें होणार आहे, पहा. दुसऱ्या मुलास ज्या रीतीनें ताकीद द्यावयाची त्यापेक्षां पहिल्या मुलास देणें ती अंमळ एकीकडे दिली पाहिजे. कारण जो निरढावलेला गृहस्थ आहे त्याला दहाजणांच्या समक्ष जरी बोललें तरी त्यास कांहीं शरम वाटणार नाहीं. परंतु जो अंमळ अब्रूचा आहे त्याला त्याचप्रमाणें ताकीद दिली तर जीव गेल्याहून ही अधिक वाईट वाटणार आहे. या

उभयतांस अपराध सारखा च म्हणून सारखी शिक्षा देऊं लागलें असतां अधिकउणी शिक्षा दिल्यासारखें होणार आहे, याकरितां जसा मुलगा अधिक निर्लज्ज असेल तशी त्याला शिक्षा अधिक प्रसिद्धपणें दिली पाहिजे. आणि मुलगा जर शरम बाळगणारा असेल, तर त्याला शिक्षा त्या च मानानें एकीकडे केली पाहिजे. तसें च एक च अपराध करणारे दोन मुलांपैकीं एक अंमळ जलद कलमी व दुसरा सावकाश लिहिणारा आहे, व शिक्षा द्यावयाची ती लिहावयास द्यावयाचें असें ठरविलें, तर दोघांस सारखें लिहावयास देऊन काय उपयोग आहे? एकास त्याचें ओझें कांहीं वाटणार नाहीं, व दुसऱ्यास तें फार वाटेल. ही शिक्षा देण्याचा खरा उद्देश अमुक एक लिहिणें आटोपलें पाहिजे असा नाहीं, परंतु लिहिणारास इतका त्रास झाला पाहिजे असा आहे. तेव्हां अर्थात् सारखी शिक्षा द्यावयाची ह्मणून दोघांस तितक्या च ओळी अगर तितकींच पानें लिहावयास देणारा पंतोजी नकळत पक्षपात च करितो, असें कां म्हणूं नये? मुलाची योग्यता पाहून शिक्षा प्रसंगानुसार कमीजास्त करावी लागते, हें खरें आहे तरी हें काम करणें असेल तेव्हां फार जपून केलें पाहिजे. नेहमीं अशी तफावत करण्याचीं कारणें मुलांस समजावून सांगितली पाहिजेत. कधीं कधीं तर कारणें सांगून देखील मुलांचें समाधान होत नाहीं; तथापि आपल्याकडून सांगण्याचा व समजूत घालावयाचा पाठ ठेवीत असावें. मुलें मोठालीं असलीं तर आपण जें करितों त्याचें कारण त्यांस सांगितल्याशिवाय कधीं च राहूं नये. असें केलें म्हणजे मुलांना पंतोजी हा आपल्या हितास मनापासून जपणार आहे, असें पक्कें समजतें, व पंतोजी खरोखरीं अशा प्रकारें त्यांच्या हितास जपेल तर च तो खरा पंतोजी होय.

**टीप.**—जेथें शाळेचा बंदोबस्त चांगला असेल, शिक्षकांचा मान यथास्थित असेल, तरफदारी केल्याचा अंदेशा येण्याचा संभव नसेल आणि अपराधाचें काम विद्यार्थ्यांनें केलेलें प्रत्यक्ष दृष्टीस पडेल तेथें अपराध काय शिक्षेला पात्र आहे याचा विचार केल्यापेक्षां कोणत्या शिक्षेनें विद्यार्थ्यावर उत्तम परिणाम होईल याचा गुरुजींनीं विचार केला पाहिजे. कधीं कधीं शारीर शिक्षेनें विद्यार्थी बिघडून जाईल अशा ठि-

काणीं तोंडीं उपदेश करून अपराधाची क्षमा केल्यानें विद्यार्थी सहज ओळीवर येणार आहे.

वर सांगितलें इतकें सर्व प्रकारें जपून जरी शिक्षा करण्याच्या कामांत न्यूनाधिक केलें, तरी त्यापासून मुलांमध्यें एकमेकांविषयीं मत्सर उत्पन्न होण्यास राहत नाहीं. आणि वास्तविक पाहतां ही मत्सर उत्पन्न होण्यास कांहीं तरी कारण होतें च. कारण एकदां शिक्षेंत तफावत करावयाचा पाठ घातला, म्हणजे अगदीं तंतोतंत न्याय होणें कठिण आहे. यासाठीं जेव्हां जेव्हां आपणांस संशय वाटेल कीं, येथें योग्य रीतीनें न्यूनाधिकपणा आपणांस करितां येणार नाहीं, किंवा, आपण केला तर त्याचीं कारणें मुलांस बराबर न समजून पक्षपात झाला असें त्यांस वाटेल असें असेल, तेव्हां तेव्हां अशा कांहीं भानगडींत न पडतां समदृष्टीनें शिक्षा करावी हें च योग्य आहे. असें केल्यानें फारशी अडचण तरी पडणार नाहीं; व तफावत करणें कोठें कोठें जरूर असतें, याचें दिग्दर्शन करण्याकरितां सारखी शिक्षा केल्यानें जेथें समदृष्टि राहत नाहीं अशीं उदाहरणें दिलीं तरी, मुख्य नियम सांगण्याचा तो हा च आहे कीं, जेथें जेथें अपराध एकसारखा होतो तेथें तेथें शिक्षा ही एक च असावी. एखाद्या वेळेस असें न करण्याचा फार मोह होतो, परंतु तेथें फार च सांभाळिलें पाहिजे. एखाद्या वेळेस कोणी तरी उनाड व नेहमीं त्रास देणारा मुलगा कांहीं खोडी करितो, इतक्यांत दुसरा मुलगा नेहमीं धडा करणार, हुशार, व चांगल्या रीतीनें वागणार, तसली च खोडी करितो, या दुसऱ्या मुलाकडे पंतोजी कान्हाडोळा करितो, किंवा उगीच थोडीशी शिक्षा देऊन त्यास सोडून देतो; कारण तो मुलगा चांगला असल्यामुळें अंमळ त्याच्या मर्जींतला असतो; परंतु हें करणें अगदीं अशुद्ध आहे, व कसला ही जरबी पंतोजी असला तरी अशा करण्यानें मुलांवरची त्याची जरब कमी व्हावयास कधीं ही राहवयाची नाहीं. जो मुलगा चांगला, हुशार, लक्षपूर्वक अभ्यास करणार, व नेहमीं जपून वागणार असतो त्याला शिक्षा देतांना कोणत्या ही भल्या पंतोजीच्या मनास वाईट वाटल्यावांचून राहणार नाहीं. परंतु त्याला इलाज नाहीं. एका अपराधाबद्दल एकास जी शिक्षा केली

तिच्या मानानें च दुसऱ्यास केली पाहिजे. पंतोजीनें सर्व विद्यार्थ्यांवर समदृष्टि ठेवावी.

**चवथें.**—शिक्षा कधीं केली कधीं न केली असें करूं नये. शिक्षेचा नियमितपणा जसा जास्त असेल, तसा च तिजपासून पुढें होणाऱ्या अन्यायांचा प्रतिबंध होणार आहे. अपराध घडला कीं शिक्षा खास होणार च असें विद्यार्थ्यांस पक्कें ठाऊक असलें तर बहुतकरून अन्याय घडणार नाहीं. परंतु शिक्षा झाली तर होईल, नाहीं तर नाहीं, असें असलें म्हणजे मुलें शिक्षा चुकेल अशा भरंवशावर अपराध करितात. मुलांना साहसाची हौस असते. व अपराध करून शिक्षा चुकविण्याची कशी गम्मत आहे, हें पाहण्याकरितां च तीं अपराध करितात. कावळ्याची अशी खोड असते कीं मनुष्य बंदूक घेऊन उभा राहिला असला तर इकडून तिकडून त्याच्या जवळ जवळ येऊन, मोठ्या सावधगिरीनें किती जवळ येईं तों आपलें याच्या हातून कांहीं होत नाहीं तें पहावें; त्या च प्रमाणें पंतोजीस मुलें करीत असतात. शिक्षा कधीं कधीं चुकते असें त्यांस माहीत झालें ह्मणजे दडपलें तर किती दडपतें हें पाहण्याकरितां ते मुद्दाम अपराध करून शिक्षा चुकविण्याची संधि पहात असतात.

**पांचवें.**—खास शिक्षा करणें, व शिक्षा करणें ती फार तीव्र करणें, ह्या दोन गोष्टींत फार अंतर आहे. तीव्रपणा हा गुण सर्व शिक्षेच्या प्रकारांत असला च पाहिजे असें नाहीं; पण नियमितपणा हा असला च पाहिजे. कोणी ग्रंथकारांनीं ह्मटलें आहे–'शिक्षा फार तीव्र असल्यानें अपराध बंद होतात असें समजूं नये. परंतु ती दरएक अपराधास नियमितपणानें झाली च पाहिजे असा नियम असल्यामुळें फार कार्य होतें.' याकरितां शिक्षा अगदीं नियमित असावी. तीव्रपणा अगदीं नसला तर उपयोगी नाहीं. शिक्षा अगदीं च मुलांच्या आहारीं असूं नये; ती इतकी कडक पाहिजे च कीं ती सोसून अपराध करण्यापेक्षां अपराध न करून चुकवावी असें विद्यार्थ्यांस वाटलें पाहिजे. शिक्षा मुलांच्या किसगणतींत नाहीं अशी असणें हें शिक्षा मुळीं च नसल्याहून देखील वाईट आहे. शिक्षा आपण आपल्याकडून करावी व मुलांनीं ती सहज

सोसून " त्यांत काय आहे ?" असें ह्मणावें यापेक्षां शिक्षा न करणें हें च बरें होय.

**सहावें.**—शिक्षा करणें ती सर्वांस सारखी असावी हा नियम शिक्षकानें नेहमीं ध्यानांत ठेविला पाहिजे. हा सारखेपणा राहण्याकरितां च कोठें कोठें तारतम्य पाहून आचरण करावें लागतें असें सांगितलें च आहे. परंतु तसें करण्यास सबळ कारण जेथें नसेल, तेथें अमुक अपराधास अमुक शिक्षा, असा नियम पूर्णपणें राखावा, हें फार इष्ट व अगदीं अवश्य आहे. विनाकारण एक च अपराध करणारांपैकीं एकास थोडी व एकास फार अशी शिक्षा केल्यानें मुलांच्या मनावर असा सहज ग्रह होतो कीं हा पंतोजी मन मानेल तसें वागणारा मनुष्य आहे; हा न्याय अन्याय पहात नाहीं. अशा मनुष्याचें विद्यार्थी धाकानें काय ऐकतील तें ऐकतील. परंतु त्याजविषयीं पूज्यबुद्धि मनांत राहून हा योग्य तें च करील, अयोग्य गोष्ट कधीं करणार नाहीं, असें ह्मणून त्याच्या आज्ञेस जो मान मिळावयाचा तो मिळणार नाहीं व त्यानें शिक्षा केल्याबद्दल जें विद्यार्थ्यांस वाईट वाटावयाचें तें त्यांना कधीं वाटणार नाहीं. पंतोजीनें जुलुमानें कोणती ही गोष्ट विद्यार्थ्यांकडून करविण्यांत फार हांसल आहे असें नाहीं. जेव्हां जेव्हां जुलूम नसेल तेव्हां तेव्हां तो मुलगा तशी अशुद्ध गोष्ट करावयास इलाज करील च. तर पंतोजी अन्याय करून आपणांस अमुक रीतीनें वागवितो अशी बुद्धि विद्यार्थ्यांत न उपजूं देणें याविषयीं पंतोजीनें यत्न केला पाहिजे. नाहीं तर पंतोजीविषयीं व तो ज्या गोष्टी करवितो त्यांविषयीं ही विद्यार्थ्यांच्या मनांत अप्रेम उत्पन्न होण्याचा फार संभव आहे.

**सातवें.**—शिक्षा केल्यानंतर पंतोजीनें मुलांबद्दल कांहीं वांकडें मनांत ठेवूं नये. मागें सांगितलें आहे कीं शिक्षा करण्यांत कांहीं एक खासगी संबंध ठेवूं नये. शाळेंतील नियम न मोडूं देण्याचें काम आपलें आहे, व त्या कामापुरती मुलांस शिक्षा दिली च पाहिजे म्हणून द्यावयाची, अशी ज्याची धारणा आहे त्याच्या मनांत मुलांबद्दल वांकडें कधीं राहावयाचें नाहीं. परंतु या मुलानें आपणास दुःख दिलें म्हणून जो शिक्षा करण्यास प्रवृत्त होतो, त्याच्या मनांत मात्र शिक्षा दिली तरी या मुलानें

आपणास दुखविलें होतें, तेव्हां यावर करडी नजर ठेविली च पाहिजे, हें नेहमीं वागत असतें. या संबंधानें एक दोन गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत.

शिक्षा करणें असेल ती अपराध घडतां च तत्काल करूं नये. कारण त्या वेळेस मनुष्य रागाच्या आवेशांत असतें व तोंपावेतों अन्यायाचें खरें स्वरूप काय आहे, हें त्याच्या ध्यानांत येत नाहीं, व जरी आलें तरी त्या अन्यायास योग्य शासन काय, याचा निश्चय करण्यास, व त्याप्रमाणें च शिक्षा करण्यास जसें शांत चित्त असलें पाहिजे तसें त्या वेळेस असत नाहीं. याकरितां कोणत्या ही मोठ्या अपराधाबद्दल शिक्षा करणें जाहल्यास, ती तत्काळ न करितां कांहीं वेळ दम खाऊन, अपराध करणार व आपण उभयतां शांत वृत्तीवर आल्यानंतर करावी. शिक्षा करते वेळेस पंतोजीनें आपली वृत्ति न्यायाधीशाप्रमाणें स्वस्थ ठेविली पाहिजे. आज या पोराची खूब खोडकी मोडली, ठीक झालें, असें मनांत आणून आनंद पावूं नये; किंवा ही काय रोजची गोष्ट आहे, शिक्षा केली काय आणि न केली काय, एकच, असा उदासीनपणा ही दाखवूं नये. तसें च, हें पोर रोज अशी च पीडा करितें, याला अशी च शिक्षा व्हावयाची; अशी त्याजविषयीं तिरस्कारबुद्धि ही बाळगूं नये. मुलांविषयीं या तिहींपैकीं कोणती ही वाईट बुद्धि बाळगणारे मनुष्याच्या हातून त्यांस चांगली ओळ लावण्याचें काम नीट रीतीनें कधीं होणार नाहीं. आपल्या हातून मुलांस वागविणें व्हावें तसें होत नाहीं, म्हणून च मुलें कुमार्गास लागतात, व त्यांच्या लहानपणच्या गैरवर्तणूकींबद्दल अंशत: आपण च दोषी आहों, व पुढील वागणुकीबद्दल तर सर्वस्वीं च ओझें आपल्या शिरावर आहे. असें जो मनुष्य मनांत ठेवितो त्याला शिक्षा देतांना कधीं आनंद वाटणार नाहीं. त्याची वृत्ति विचारशील व कांहींशी खिन्न च राहील. याप्रमाणें निरुपायास्तव ज्या विद्यार्थ्यांस शिक्षा करावी लागते त्यांवर ज्याचें वडिलांप्रमाणें प्रेम असतें अशा पंतोजीस शिक्षा केल्यानंतर झालेल्या गोष्टीबद्दल मुलांस योग्य उपदेश केल्याशिवाय कधीं ही राहवणार नाहीं. व अशा वेळेस जो उपदेश तो करील त्याचें फळ नेहमींच्या उपदेशापेक्षां शतगुणित

अधिक होईल. मुलांस प्रत्यक्ष शिक्षा देण्याच्या वेळेपेक्षां शिक्षेनंतरचा जो वेळ असतो त्यास शिक्षकानें फार जपलें पाहिजे. शिक्षेच्या वेळेस जी अंतःकरणाची वृत्ति असते ती पालटून मुलांवर पुनः पूर्ववत् प्रेमबुद्धि प्रदर्शित करण्याची जी संधि आहे ती च संधि फार संभाळली पाहिजे. विशेष गुण येण्याचा काळ तो च आहे. रिक्टर म्हणून एके ग्रंथकारानें या विषयावर असें लिहिलें आहे.–"शिक्षा ही पावसाची सर आहे; ही एकदां येऊन गेली, म्हणजे मुलांच्या अंतःकरणाची जमीन मऊ होते, व तींत ऊब येते; व उपदेशाचें जें बीज त्यांत पेरावें त्याचा अंकुर तत्काळ फुटून मूळ खोलवर जातें. शिक्षेच्या पूर्वी व शिक्षा देतांना जेव्हां पंतोजी बोलत असतो, तेव्हां मुलांच्या मनांत प्रथम धाक व नंतर माराबद्दल राग असतो, तेणेंकरून त्यांच्या हृदयावर त्याचें बोलणें ठसत नाहीं. त्यांचें मन उलटें त्या बोलण्याशीं तंडत असतें. परंतु तें सर्व होऊन चुकलें, व शिक्षा टाळण्याची वगैरे सर्व कल्पना मनांतून जाऊन अपराधाबद्दल मुलांस वाईट वाटूं लागलें, म्हणजे जो उपदेश करावा, त्यापासून विंचवानें नांगी मारल्याजागचा फणफणाट मधानें जातो किंवा जसा धुतलेल्या जखमेवर मलमाचा गुण येतो, त्याप्रमाणें त्यांच्या अंतःकरणांतील जखमेस गुण येतो."

---

## बक्षीस.

शाळा असावी तशी चांगली असली म्हणजे पंतोजीपासून शाबासकी मिळणें, हें च सर्वांहून उत्तम बक्षीस आहे, असें मुलें समजत असतात. शाळेंतील मुलांस वारंवार बक्षिसें दिल्यानें मुलें अभ्यासाची काळजी बाळगितील, व उद्योग करतील, आणि तीं न दिलीं तर मुलें बेपरवा होतील, व आळशी होतील असा अर्थ नाहीं. बक्षीस दिवसभर देतां येईल असें नाहीं; व त्याच्या योगानें खेळकर मुलें झटून अभ्यासास लागतील असें ही होत नाहीं. पण बक्षिसापासून दुसरा मोठा उपयोग आहे, तो मुलें शाळेंतून गेल्यावर घडतो. शाळा सोडल्यावर बक्षीस मिळालेले जिन्नस पाहिले ह्मणजे शाळेंत घालविलेल्या दिवसांचें व तेथें केलेल्या उद्योगांचें स्मरण होऊन आनंद होतो. कदाचित्

शाळा सोडल्यावर मनुष्याचा फार उत्कर्ष झाला नसला, व तो कांहीं-सा मागें पडला असला, तर त्याला आपण मिळविलेलें इनाम पाहून असें वाटतें कीं आपण आतां एक मागें पडलों, परंतु यापूर्वीं आपल्या बरोबरच्या दहा मुलांपेक्षां आपण अधिक बुद्धिवान्, व उद्योगी होतों. व आपल्या उद्योगाचें आपणास फळ ही येत असे. या मागील वृत्तांताचें सिंहावलोकनानें त्याला स्मरण झाल्यामुळें कदाचित् पुढें अधिक उद्योग करण्याचा त्यास उत्साह येईल, व मोठेपणीं जडलेला आळस झडून जाईल. यासाठीं बक्षिसें अवश्य द्यावीं. त्यांच्या योगानें अंशतः मुलांस शाळेंत असतांना उद्योग करावासा वाटतो; व शाळा सोडल्यावर त्यांस पूर्वींच्या दिवसांचे स्मरणानें आनंद होऊन पुढें परिश्रम करण्यास हुशारी येते.

मिस्तर फिच् यांनीं बक्षिसाबद्दल एक वाक्य लिहिलें आहे, तें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. "बक्षिसें फार थोड्या विद्यार्थ्यांना द्यावीं. त्यांजपासून विद्यार्थ्याचें हित होईल अशी फारशी खात्री बाळगूं नये. विद्यार्थी सरासरी बरा च हुकूम ऐकतो किंवा आपले कामावर बरें च लक्ष देतो एवढ्याबद्दल च बक्षीस देऊं नये. बक्षीस मिळालें ह्मणजे जरा विशेष प्रतिष्ठा मिळाली असें झालें पाहिजे. कोणाचा अभ्यास पांच पंचविसांत नांव घेण्यासारखा झाला किंवा सांगितलेली गोष्ट ऐकण्याबद्दल एखादी दाखला घेण्यासारखी कृति विद्यार्थ्यानें करून दाखविली तर तो बक्षिसास पात्र समजणें बराबर आहे."

शिक्षा व इनाम या दोन्ही गोष्टींखेरीज मुलांकडून इच्छिलेलीं कामें करून घेण्यास पंतोजीस पुष्कळ साधनें आहेत. व तीं साधनें या दोहींपेक्षां कांहीं अंशानें बलवत्तर आहेत असें म्हटलें तरी चालेल. त्यांजविषयीं पुढें थोडासा विचार करूं.

---

## इतर साधनें.

आरंभीं च सांगितलें आहे कीं पंतोजीनें आपलें व मुलांचें एक मत होऊन आपणास जें साधावयाचें असेल त्याकरितां त्यांनीं आपल्याप्र-

माणें झटावें असें करण्याविषयीं नेहमीं इलाज केला पाहिजे. ही गोष्ट सांगण्यास फार सुलभ दिसते; पण करून पाहूं लागलें म्हणजे त्यांत हजारों अडचणी उत्पन्न होतात. नुसतें सर्व पंतोजींनीं आपल्या कामांत निपुण असावें, असें सांगणें, आणि मुलांस आपल्याप्रमाणें झटावयास लावावें असें सांगणें, या दोहोंत फारशी तफावत नाहीं. कारण ज्या पंतोजीस मुलांकडून चांगली मेहनत करून घेतां येते, तो चांगला असला च पाहिजे. याकरितां, पंतोजीनें मुलांस आपल्या कहांत ठेवून, व त्यांजवर जो त्याचा पूर्ण अंमल असला पाहिजे, त्यांत बिलकूल कमतर न करितां, त्यांचें आपलें मन कसें मिळवून घ्यावें, व त्यांची सुधारणा करण्याच्या कामांत जे श्रम आपण करितों त्यांत त्यांची मदत घेण्यास कोणकोणत्या गोष्टी कराव्या, याचें अंमळ स्पष्टपणें विवरण करणें भाग आहे.

प्रथम ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं जो पंतोजी आपलें काम मनापासून करितो त्याजवर मुलांची प्रीति सहज जडते. ज्या मनुष्यांना आपली शाळा चांगल्या स्थितींत असावी, व आपल्या विद्यार्थ्यांनीं हुशार व्हावें, अशी खरी कळकळ नाहीं, त्यांच्या हातून मनापासून शिकवणें व्हावयाचें नाहीं. तेव्हां अर्थात् आपल्या विद्यार्थ्यांचें कल्याण व्हावें, यांत च आपणास यश आहे; ही बुद्धि पंतोजीमध्यें अवश्य असली च पाहिजे. त्याखेरीज आपणास पाहिजे ती मदत विद्यार्थीलोकांपासून त्यास कधीं ही मिळवून घेतां येणार नाहीं. हा पंतोजीच्या आंगीं गुण असून, खेरीज विनाकारण लोकांत विरोध उत्पन्न केल्याशिवाय कोणती ही गोष्ट आपल्या मनांत असल्याप्रमाणें कडेस लावण्याचें धोरण त्याला पाहिजे. मनांत आलेलें काम कडेस लावण्याचा निर्धार पाहिजे; व अडचणीच्या प्रसंगीं कोणत्या रीतीनें वागलें पाहिजे हें तत्काळ ध्यानांत येण्यापुरती समयसूचकता व धोरण व बारीक नजर ही असली पाहिजे. कांहीं मनुष्यांच्या अंगीं अशी वागण्याची खुबी असते कीं ते एखाद्याच्या मनांत आपल्या मर्जीप्रमाणें वागण्याचें नसलें तरी त्याशीं वांकडें आणिल्याशिवाय आपल्या ह्मणण्याप्रमाणें त्याजकडून वर्तवितात; व विरोध वाढविल्याशिवाय

आपणांस आड येणाऱ्या सर्व हरकती दूर करतात. दुसरे कांहीं लोक असतात त्यांची वागणूक इतकी चमत्कारिक असते कीं ते कोणतें ही काम करूं लागले म्हणजे बळें च नाहीं नाहीं त्या अडचणी काढितात. आतां अडचणी दूर करण्याचा रस्ता कोणता व बळें च आणण्याचा रस्ता कोणता हें सांगणें कठिण आहे. परंतु इतकें खरें आहे कीं जो मनुष्य आपला हेतु निर्धारानें मनांत ठेवून वागतो, परंतु विनाकारण वथवथ करीत नाहीं, व सर्वांशीं ममतेनें वागतो त्याला लोक फारसे हरकत करीत नाहींत. आजपासून मागली सारी वहिवाट मोडून टाकून सारी शिस्त च पालटून टाकावयाची आहे व आजपर्यंत चालत आलेली सारी बंडाळी मोडून टाकावयाची आहे असा विनाकारण बोभाट करण्यानें कांहीं फायदा होत नाहीं. मनुष्याच्या सहज च मनांत येतें कीं "आजपर्यंत जे आम्ही काम करीत आलों ते सारे च मूर्ख! आणि आज च हे मोठे शहाणे कोण आले आहेत! सारी येथून तेथून शिस्त फिरवितों म्हणतात, तेव्हां यांचें म्हणणें असें च कीं नाहीं?" अशा कल्पना सहज च असल्या वाचाळपणामुळें माणसाच्या पोटांत येतात. त्या आल्या म्हणजे नवीन नियम अमलांत आणण्याच्या कामांत त्या लोकांपासून मदत कधीं च व्हावयाची नाहीं. कारण आपली चुकी पदरांत घेण्यास मनुष्य सहज नाराजी असतो. व जरी त्याची खात्री झाली कीं आपली रीति वाईट आहे तरी एकदां त्याचें मन बिघडलें म्हणजे ती मोडून नवी शिस्त सुरू करण्याच्या कामांत त्यांजपासून व्हावी तशी मदत कधीं च व्हावयाची नाहीं. शाळेच्या व्यवस्थेच्या कामांत फेरफार करणें अगदीं जरूर दिसलें तरी तें काम एकाएकीं करूं नये; करतां करतां कोणास ही न बुजकावितां व व्यर्थ अवडंबर न घालतां मुकाट्यानें करावें. असें केल्यानें सर्व अव्यवस्था नाहींशी होऊन काम सुरळीत चालेल. व ज्यांच्या हातून काम घ्यावयाचें त्या लोकांस आपलें स्वातंत्र्य गेलें, किंवा आपणांस काम अधिक पडूं लागलें असें वाटणार सुद्धां नाहीं. पण उगीच आजपासून अमुक वहिवाट बंद केली आहे व अमुक नवी सुरू केली आहे, असे हुकूम फरमावून बोभाट केला तर फायदा काहींएक

न होतां, उलटें जें काम उरकून घ्यावयाचें त्यांत लोक हरकती मात्र आणितील यांत संशय नाहीं.

प्रत्येक शिक्षकास मनुष्याच्या मनाविषयीं कांहीं तरी ज्ञान असणें अवश्य आहे; अध्यात्म विषयांत तो प्रवीण असला पाहिजे, असें म्हणणें मुळीं च नाहीं. त्या पंथास तो लागला तर कामास विशेष उपयोग न होतां उलटा अपाय मात्र होण्याचा संभव आहे. परंतु पंतोजीनें, नेहमीं अमुक वृत्तीचा मुलगा अमुक प्रसंगीं कसा वागतो, त्याला कोणते रीतीनें बोललें असतां तो उलटा हट्टास पेटतो, व कोणत्या रीतीनें बोललें असतां आपणास पाहिजे त्या रीतीनें आचरण करितो, याविषयीं शोधकपणानें नजर पुरवून त्याची चालना सदोदित करीत असलें पाहिजे. शाळेंत पंतोजी गेला कीं त्याच्या मनांत या विचाराचा आरंभ झाला च पाहिजे. आपलें मुख्य काम आपणास पाहिजे त्या रीतीनें मुलांस वर्तविणें हें आहे. व जसजशी मुलांच्या स्वभावाची व मनाची माहिती आपणास असेल तसतसें तें काम आपणास अधिक सुलभ रीतीनें करतां येणार आहे; याकरितां शाळेंत जें कांहीं चाललें असेल तें सर्व बारकाईनें पाहणें हें, आपल्यास अवश्य जो गुण तो आपल्या आंगीं येण्यास मोठें साधन आहे; या दृष्टीनें तो आपलें काम करूं लागला म्हणजे नित्य नित्य तें च काम केल्यानें जसा इतर कामाचा कंटाळा येतो तसा या कामाचा त्यास कंटाळा येणार नाहीं. द्वाड आणि खोडकर मुलें हीं आपल्या कामास हरकत करणारीं आहेत असें त्यास न वाटतां त्यांजपासून आपणास हित होणार आहे असें त्यास वाटूं लागेल. कारण शाळा चालविण्याची जी शिस्त बसण्याविषयीं त्याचा नेहमीं यत्न चाललेला असतो, ती शिस्त पुरी होण्यास अशा प्रकारचीं मुलें त्याला अवश्य पाहिजेत. एका रीतीनें दरएक मुलापासून आपण एकेक गोष्ट शिकतों असें च तो समजूं लागेल. या नजरेनें पाहिलें असतां शिक्षकाचें काम दिवसभर ती च ती च कटकट करण्याचें आहे असें न दिसतां, त्यांत नित्य नित्य नवी कल्पना काढण्यास, व असेल तितकी बुद्धि खर्चण्यास पाहिजे तितका अवकाश आहे असें दिसून येईल. कारण वर सांगितल्याप्रमाणें मुलांची

हरएक कृति लक्षांत ठेवून त्याप्रमाणें आपली शिस्त बदलणें, व नानातऱ्हांच्या स्वभावांच्या मुलांवर नानातऱ्हांच्या युक्ति प्रयुक्ति लढवून त्यांस आपल्या मनांत असेल त्याप्रमाणें त्यांची खुषी ठेवून वर्तविणें, या कृत्यांत नवीन नवीन कल्पना काढण्यास अवकाश नाहीं, असें कोणी ही क्षणभर देखील ह्मणणार नाहीं.

हल्लीं असें दृष्टीस पडतें कीं पुष्कळ शिक्षक लोक आपलें काम जीव लावून करीत नाहींत. यानें उपजीविका होते म्हणून कसें तरी चालविलें पाहिजे असें समजून जसें ढकलेल तसें ढकलीत असतात. परंतु वर सांगितल्याप्रमाणें ज्या मनुष्याचें आपल्या कामावर व विद्यार्थ्यांवर लक्ष आहे, त्याच्या हातून अशी हलगरज कधीं व्हावयाची नाहीं. त्याचें मन आपल्या कामाकडे अगदीं वेधून जाईल. असें झाल्यानें त्यास बरें च यश येईल यांत संशय नाहीं. त्याच्या कामाची त्यास नेहमीं हौस राहील. त्याची उल्हासवृत्ति, उत्साह व उद्योग हीं पाहून त्याच्या विद्यार्थ्यांच्या आंगीं ही सहज ते गुण येऊन, ते कोणतें ही काम तो सांगेल केव्हां व आपण करूं केव्हां, अशी हौस बाळगितील. ही गोष्ट केवळ बोलण्याची आहे असें कोणीं समजूं नये. असे दाखले कित्येक ठिकाणीं आढळून येतात. व दरएक उत्तम रीतीनें चाललेल्या शाळेंत असा प्रकार थोड्या बहुतांनीं तरी दृष्टीस पडतो.

मागें सांगितलें आहे कीं शिक्षकाच्या आंगीं समयसूचकता असून प्रसंगीं आपणास हरकत करणाराचे हातून ही आपलें काम साधून घेण्याची अटकळ असावी, त्याच्या स्पष्टीकरणार्थ खालीं लिहिलेला उतारा फार उपयोगी आहे.

**आबट्** साहेब म्हणतात:—**इंग्लंडांतील पार्लमेंट्** सभा भरण्याच्या ठिकाणीं माडीवर बाहेरच्या लोकांस बसण्याकरितां जागा आहे. एखाद्या वेळीं एखाद्या नाजूक कामांत सभासदांचे अभिप्राय घ्यावयाचे असले म्हणजे, पाहण्याकरितां वरच्या मजल्यावर मंडळी जमलेली असते त्यांस बाहेर काढावें लागतें. एक वेळ असा प्रसंग आला, तेव्हां माडीवर अति गर्दी झालेली होती, त्यामुळें मंडळी बाहेर निघण्यास फार अडचण पडूं लागली; कारण बाहेर काढ-

लेल्या लोकांची पुनः आपणांस आंत लौकर येण्यास सांपडावें म्हणून दाराशीं अगदीं थाप लागून गेली होती. त्यामुळें आंतील लोकांस बाहेर जाण्यास रीग होईना. तेथें व्यवस्था राखण्याकरितां जो अधिकारी होता तो फार चतुर होता; त्यानें तेव्हां च ओळखिलें कीं आपणास माडी खालीं करण्यास अडचण पडते, याचें मुख्य कारण दाराच्या बाहेर गर्दी होत आहे, हें आहे. व बाहेर गर्दी होण्याचें कारण दरएक मनुष्यास पुनः आंत येते वेळेस पुढें असण्याची इच्छा आहे हें आहे. हें बीज त्याच्या ध्यानांत येतां च अडचण दूर करण्याची युक्ति त्यानें तेव्हां च शोधून काढिली. ती ही. लोक बाहेर घालविण्याकरितां दोन्ही दारें उघडीं ठेवण्याची वहिवाट होती ती मोडून त्यानें असें केलें कीं एका दारानें मंडळी बाहेर सोडून द्यावयाची व ती दुसऱ्या दारानें मात्र आंत येऊं द्यावयाची. अशी ताकीद दिल्यामुळें सारी मंडळी जें दार उघडें होतें त्या वाटेनें बाहेर जाऊन जें दार बंद होतें त्याच्याजवळ जाऊन उभें राहण्याकरितां पळत सुटली; त्यामुळें मंडळी बाहेर घालविण्याचें काम अगदीं सुलभ झालें. पुनः आंत लवकर येण्याची सर्वांस उत्कंठा असे, हें च कारण जागा खालीं होण्यास प्रतिबंधक झालें होतें; परंतु एका लहानशा कल्पनेनें त्या च उत्कंठेपासून माडी रिकामी करण्याच्या बाबतींत त्या अधिकाऱ्यानें आपलें काम साधून घेतलें. मनुष्याच्या स्वभावाचें चांगलें ज्ञान ज्या मनुष्यास आहे, त्याची दुसऱ्याच्या हातून आपलें काम सहज साधून घेण्याची हातोटी अशी अलौकिक असते.

आतां ज्या अधिकाऱ्यानें ही खुबी काढिली त्यास तिच्या योगानें आपलें काम हटकून साधलें हें पाहून किती आनंद झाला असेल? शिक्षकानें आपलें काम जीव लावून केलें असतां घडोघडी त्यास अशा प्रकारें आनंदाचा अनुभव येणार आहे. त्या च ग्रंथांत दुसरा एक दाखला आहे तो ही ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. "एका गृहस्थाच्या घरासमोर रस्त्यांत फार दगड पडले होते, ते त्यानें आपल्या मुलास पलीकडच्या वाडग्यांत उचलून टाक म्हणून सांगितलें. मुलानें कांहीं कांहीं टाकिले; पण दर वेळेस एक दगड घ्यावा, मग तो झोंकावा

असें करितां करितां मूल दमलें. मग त्यानें बसून बसून एक युक्ति काढिली. त्यानें आळींतल्या साऱ्या पोरांना बोलावून आणून, पलीकडच्या वाडग्यांत तें झाड आहे, त्याला नेम मारूं, असा खेळ काढिला. खेळ काढतां च साऱ्या पोरांनीं लागलीं च दगड उचलून झाडाला मारण्याचा जो सपाटा लाविला, त्यासरसे रस्त्यावरचे सारे धोंडे नाहींतसे झाले. इकडे मुलांना तर वाटलें कीं आपण खेळ खेळलों आणि त्या युक्तिवान् पोराचें तर काम उरकलें." या दोन दाखल्यांवरून आपल्या इष्ट हेतूंच्या सिद्धीकरितां लोकांपासून काम कसें करवावें हें सहज लक्षांत येईल. खुबी इतकी च आहे कीं दुसऱ्याचें मन काय आहे हें प्रथम जाणून अशा मनाचें माणूस कोणते वेळेस काय करितें हें नीट लक्षांत ठेवून त्या च प्रमाणें काम करून घेतलें पाहिजे. सारांश पंतोजीस आपल्या अनुभवावरून आपले विद्यार्थी कोणत्या प्रसंगीं कसे वागतील हें पूर्णपणें समजलें पाहिजे; व नंतर जी गोष्ट आपणास त्यांजकडून करवावयाची आहे, त्या गोष्टीची त्यांची समजूत कोणत्या रीतीनें घातली असतां ते ती हटकून करतील च, हें जाणून तशी त्यांची समजूत घातली पाहिजे. जी गोष्ट त्यांजकडून सांगून करवावयाची असेल, तीबद्दल अशी त्यांची खातरी व्हावी कीं आपणांस कोणीं सांगितलें नसतें तरी ही गोष्ट आपण अशी च केली असती.

वर जे गुण सांगितले आहेत ते ज्याच्या आंगीं असतील, तो चांगला शिक्षक होण्यास कोणती ही अडचण नाहीं. परंतु हे गुण त्यानें कामावर नीट लक्ष पुरवून योग्य मार्गास लाविले पाहिजेत. शिक्षकाच्या अंगीं दृढपणा असला पाहिजे, म्हणून मागें सांगितलें आहे, परंतु जर तो शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांवर धाक ठेवून, व जुलूम करून च नेहमीं काम घेऊं लागला, तर या दृढपणाचा च परिणाम वाईट होऊन तो शिक्षक फार जुलमी होणार आहे. तर हे सर्व गुण असून ही पंतोजीनें आपल्या वागणुकींत नेहमीं काय कमजास्त होतें, याचा तपास ठेवून आपली वर्तणूक नेहमीं सुधारीत असलें पाहिजे.

---

## शिक्षकाचा विद्यार्थ्यांवर अंमल बसण्याचीं कारणें.

आतां शिक्षकाचा विद्यार्थ्यांवर अंमल कोणकोणत्या कारणांनीं बसतो याजबद्दल थोडा विचार करूं. हा अंमल बसण्यास मुख्य साधनें तीन आहेत.

१.—शिक्षकाची वागणूक व त्याचा स्वभाव असा असावा कीं तेणेंकरून विद्यार्थ्यांवर त्याचें वजन पडावें.

२.—शिक्षक या नात्यानें त्याचा मुलांवर अधिकार असतो च, तो अधिकार शिक्षकानें अशा योग्य रीतीनें आपल्या कामीं लावावा कीं तेणेंकरून शिक्षकाचें मुलांवर असलेलें वजन पाहिजे तितकें वाढत जावें.

३.—विद्यार्थी लोकांच्या मनांत च असे कांहीं धर्म साहजिक असतात कीं तेणेंकरून त्यांस योग्य रीतीनें वर्तविण्यास शिक्षकास मदत होते. हे धर्म आपल्या कामीं कसे लावावे, ती अटकळ मात्र शिक्षकानें संभाळली पाहिजे.

उदाहरणार्थ—बहुतेक विद्यार्थ्यांस आपण चांगलें म्हणून ध्यावें, ही इच्छा असते च असते. आतां ज्या रीतीनें मुलगा वागावयास पाहिजे त्या वागणुकीच्या मुलास अथवा मोठ्या मनुष्यास त्याच्या समोर वारंवार शाबासकी दिली पाहिजे. व ज्या कृत्यापासून अब्रू मिळत आहे तें काम आपल्या हातून सहज होणारें आहे, अशी विद्यार्थ्यांची खातरी करून दिली पाहिजे. याप्रमाणें विद्यार्थ्यांस जी उपजत बुद्धि असते, तिचा उपयोग आपल्या इष्ट हेतूंच्या सिद्धीकडे केला पाहिजे.

या तीन गोष्टींपैकीं, प्रथम शिक्षकाची वागणूक विद्यार्थ्यांवर वजन पडण्याजोगी असावी, याबद्दल विचार करूं. बहुतकरून सर्वांस अनुभवावरून ठाऊक आहे कीं ज्ञानसंपन्न मनुष्यास त्याच्या ज्ञानामुळें सर्वत्र मान मिळतो. आतां शिक्षकाच्या आंगीं ज्ञान असून जर त्याच्या आंगीं ममता, समदृष्टि, व दृढपणा हीं असतील, तर त्याचें वजन सर्व मनुष्यांवर पडून सर्व लोक त्याचें बोलणें ऐकून घेतील, व त्याप्रमाणें वर्तन करतील. याकरितां ज्या शिक्षकास आपलें वजन विद्यार्थ्यांवर

राहावें अशी इच्छा असेल, त्यानें विद्वत्ता, ममता, समदृष्टि, व दृढता हे मुख्य चार गुण अवश्य संपादन केले पाहिजेत. विद्वत्ता अशासाठीं असली पाहिजे कीं विद्यार्थ्यांस अभ्यास करितांना जेथें संशय येईल, अथवा अडचण पडेल, तेथें आपल्या गुरूपासून आपली शंका निवारण होऊन समाधान होईल, असा त्यांना भरंवसा पोंहचला पाहिजे. गुरुजींनीं सांगितलेल्या गोष्टीवर, ती प्रमाण च आहे व तिजविषयीं शंका घेण्याचें कांहींएक कारण नाहीं, अशी श्रद्धा विद्यार्थ्यांच्या मनांत पुरती आली पाहिजे. विद्येसंबंधी कोणती ही गोष्ट गुरुजींस विचारिली असतां तिजबद्दल संपूर्ण माहिती आपणास येथून होईल च होईल, अशी विद्यार्थ्यांची खातरी झाली पाहिजे. गुरूच्या पोटांत विद्यार्थ्यांविषयीं ममता पाहिजे, ती अशाकरितां कीं ज्या मनुष्याचें व मुलांचें मन मिळालें नाहीं, त्याची आज्ञा अधिकाराच्या व विद्वत्तेच्या बळानें विद्यार्थ्यांनीं मानिली तरी तो जुलुमाचा रामराम होतो. ज्या मनुष्याचें आपणावर प्रेम असतें त्याची आज्ञा मानण्यांत आपणास संतोष वाटतो; व विद्यार्थ्यांनीं गुरूची आज्ञा पाळणें ती संतोषानें, व उल्हासानें पाळण्यांत च विशेष श्रेय आहे. याकरितां गुरुजींच्या मनांत विद्यार्थ्यांविषयीं ममता असली पाहिजे. आणि ही ममता विद्यार्थ्यांस कळून तेणेंकरून उभयतांचें प्रेम परस्पर असलें पाहिजे. गुरूची समदृष्टि अशासाठीं असली पाहिजे कीं, विद्यार्थ्यांस आपणांवर जें गुरूचें प्रेम आहे तें आपल्या योग्यतेनुरूप आहे, व आपली योग्यता जशी कमजास्त होईल तसें च तें प्रेम ही कमजास्त होणार आहे, ही गोष्ट पक्की समजावी; याखेरीज भलत्याच कारणानें गुरुजींचें आपणांवर प्रेम आहे, अशी त्यांची गैरसमजूत होऊन त्यांच्या मनांत जी पूज्यबुद्धि असते तींत बिलकुल कमतर होऊं नये. गुरुजींच्या आंगीं दृढपणा अशाकरितां पाहिजे कीं बाकींच्या तिन्ही गुणांत चलबिचल होणार नाहीं, अशी विद्यार्थ्यांस खातरी पोहोंचली पाहिजे. शिकविण्याच्या कामांत याच्या हातून आज एक सांगणें, व उद्यां दुसरें सांगणें, असें होणार नाहीं; याची ममता आहे अशी च सदैव राहील, व समदृ-

ष्टीनें हा जो निश्चय करील त्यापासून तो कधीं ढळणार नाहीं; असें विद्यार्थ्यांस पुरतेपणीं ठाऊक जाहलें पाहिजे.

शिक्षकास आपलें वजन राखणें आहे तर पक्षपात, तिरसटपणा अथवा हेकेखोरपणा यांचा त्यानें आपणास स्पर्श ही होऊं देतां कामा नये. प्रसंगोपात्त आपला हुकूम कोणीं तोडिला तरी त्याबद्दल चिरडीस जाऊन बेताल होऊं नये. अशा प्रकारचा मासला विद्यार्थ्यांच्या दृष्टीस पडला म्हणजे ते मान देईनातसे होतात. ज्या मनुष्यास आपलें मन आपल्या कह्यांत ठेवितां येत नाहीं, तो दुसऱ्या मनुष्यास आपल्या कह्यांत काय ठेवणार आहे? तात्पर्य, वर सांगितलेले सर्व गुण गुरुजींच्या आंगीं असून, खेरीज आपली तब्बीयत नेहमीं आपल्या कह्यांत ठेवण्याची संवय गुरुजींस असली पाहिजे.

ज्या पंतोजीचें वजन शाळेंतील विद्यार्थ्यांवर असतें, त्यानें कांहींएक न करितां देखील त्याच्या वागणुकीनें विद्यार्थीलोकांस आपोआप चांगली शिक्षा लागत असते. अधिकारी वजनदार असून त्याजवर हाताखालच्या लोकांची ममता असली म्हणजे त्याच्या थोरपणामुळें सर्वांच्या मनांवर अति उत्तम संस्कार सहज घडत असतो. त्याच्या ध्यानांत देखील नसतें, परंतु त्याच्या बोलण्याचालण्यावर व हंसण्याबसण्यावर सर्वांचें चित्त असतें, व त्याप्रमाणें सर्व लोक हळू हळू आपण स्वतः आचरण करूं लागतात. याप्रमाणें त्याच्या प्रत्यक्ष उपदेशांपासून व कृतींपासून विद्यार्थीलोकांस अधिक शिक्षेचा लाभ होत असतो. याकरितां त्यानें उपदेश करतांना तर चांगला करावा च, परंतु आपली वागणूक त्याहून ही उत्तम ठेवावी.

वर जे अवश्य ह्मणून गुण सांगितले त्यांपैकीं च उत्साह हा ही होय. ज्या मनुष्याच्या आंगीं इष्ट कार्य निश्चयानें करण्याचा नेहमीं उत्साह असतो, त्यास लोक सहज मानतात. एका ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं "हा गुण आंगीं असेल तर कधीं छपून राहणार नाहीं. मनुष्याच्या बोलण्यांत, चालण्यांत, पाहण्यांत, व सर्व एक कृतींत तो दिसून आल्याशिवाय राहत नाहीं." उत्साह ज्याच्या मनांत आहे, त्याच्या कृतीनें त्याच्या मनांतील भावाचा विद्यार्थ्यांस, व इतर लो-

कांस जसा बोध होतो, तसा हजार नुस्त्या शब्दांनीं किंवा व्याख्या-नांनीं होणार नाहीं. हा गुण च असा आहे कीं तो असल्यावर दडाव-याचा ह्मणून नाहीं. अशा मनुष्याकडे पाहतां च हरएकाच्या ध्यानांत एकदम येऊन चुकतें कीं हा मनुष्य साधारण नव्हे. हा योजिलेलें काम तडीस नेणारा मनुष्य आहे. फार तर काय परंतु जेथें विद्यार्थी-लोकांवर असा ग्रह शिक्षकापासून होत नाहीं, त्या शाळेंत कांहीं जीव च नाहीं, असें म्हटलें पाहिजे. शिक्षकानें मनांत उत्साह दृढ बाळगावा; परंतु कृतींत नेहमीं सौम्यपणा राखावा. जो मनुष्य एककल्ली नाहीं, व ज्याच्या आंगीं हरएक गुण नेमस्तपणानें वसत आहे, त्याची वृत्ति सौम्य असली च पाहिजे. व अशा सर्व गुणांच्या परिपक्कपणा-मुळें आंगीं आलेला सौम्यपणा झांकत नाहीं. जसा उत्साह दरएक कृतींत दिसून येतो, तसा सौम्यपणा ही येतो. कोणत्या ही कृतींत तेव्हां च तो प्रकट होतो. सारांश, शिक्षकाच्या आंगीं कोणतें ही कृत्य आरंभण्याचा उत्साह असावा व तें सौम्यपणानें कडेस लावा-वयाचा ही गुण असावा. हे दोन्ही गुण एके च काळीं शिक्षकाच्या आंगीं असणें फार इष्ट आहे. गुण गुरूच्या आंगीं असले म्हणजे विद्या-र्थ्यांच्या आंगीं तेव्हां च नकळत येऊं लागतात. फार तर काय, परंतु शाळेंतील मुलांची वागणूक पाहून, त्यांच्या हुशारीवरून, अगर गाफि-लपणावरून, गुरुजींच्या आंगीं काय काय गुण आहेत याची पारख चाणाक्ष पाहणार तेव्हां च करील.

विद्यार्थ्यांवर वजन राहण्याच्या साधनांची गणना करतांना, अ-धिकाराचें महत्व याची गणना दुसऱ्या स्थळीं केली आहे. हें महत्व अधिकारी याच्या योग्यतेनुरूप कमीजास्त होणार आहे; परंतु पंतोजी या नात्यानें मनुष्याचा अधिकार थोर आहे, ही गोष्ट सर्व-मान्य आहे. विद्यार्थ्यांस तर हा गुरूचा अधिकार येथपावेतों च आहे, व यापुढें नाहीं, अशा प्रतिबंधाची ओळख सुद्धां नसते. साह-जिकपणें कोणत्या ही कामांत गुरूनीं आज्ञा केली ती च प्रमाण; त्यापुढें फिर्यादीचें ठिकाण उरलें च नाहीं, अशी विद्यार्थ्यांची समजूत असते. कोणती ही गोष्ट निघाली असतां, त्यांत अमुक रीतीनें वागावें अशी

आज्ञा करण्यास अधिकार गुरुजींस आहे, किंवा नाहीं, असा विकल्प विद्यार्थ्यांच्या स्वप्नीं देखील येत नाहीं. गुरुजींनीं आज्ञा केली म्हणजे ती मान्य केली च पाहिजे, असा शिष्यांचा ग्रह स्वाभाविक च असतो. हा पूर्ण अधिकार गुरुजींच्या हातीं स्वतःसिद्ध च मूळपासून असतो. आतां त्याचें संरक्षण करणें हें काम त्याचें आहे. जर तो शिष्यांस कांहींएक काम करावयास सांगेल, व नंतर त्यांनीं तें केलें किंवा नाहीं हें पाहणार नाहीं, किंवा न केल्यास योग्य पारिपत्य करून तें करविण्यास चुकेल, तर विद्यार्थी सहज च शिरजोर होऊन त्याची आज्ञा मानीनातसे होतील. परंतु हा सर्व दोष गुरूचा आहे. गुरूच्या अधिकाराच्या नात्यानें जी अपरिमित सत्ता आपल्या हातीं येते, तिचें जतन आपण केलें पाहिजे; व हें जतन कसें करावें, याबद्दल उल्लेख ठिकठिकाणीं यापूर्वीं च आले आहेत; तेव्हां याविषयीं येथें अधिक विवेचन करण्याची जरूर नाहीं.

विद्यार्थ्यांवर वजन राखण्याचें तिसरें साधन मुलांचे स्वभाव, व मनोवृत्ति, हें होय. या विषयाचा विस्तार कांहींसा अधिक आहे. पूर्वीं सांगितलें च आहे कीं मुलांचा विचारशीलपणा आणि त्यांच्या स्वाभाविक बुद्धि यांच्या योगानें त्यांजला पाहिजे त्या रीतीनें वर्तविणें शक्य आहे, व मुलांकडून काम करून घ्यावयाचें तें याच मार्गानें घ्यावें. जर शिक्षण अशा रीतीचें द्यावयाचें आहे कीं तेणेंकरून पुढें व्यवहारांत उपयोगी पडणारे गुण थोरपणीं आंगीं यावे, तर मुलांकडून जें काम करवावयाचें तें त्यांच्या स्वतःच्या बुद्धीनें करविलें पाहिजे. जें काम दरएक वेळेस धाक दाखवून अथवा जुलुमानें करविलें तें काम करण्याची मनुष्यास संवय लागावी तशी चांगली लागत नाहीं; परंतु जर विद्यार्थ्यांची समजूत घालून दिली कीं अमुक एक रीतीनें वागणें योग्य आहे, व असें केल्यापासून हित आहे; व अशा समजुतीनें तें काम त्यांजकडून करविलें तर तसें वागण्याची त्यांस संवय लागेल; व ही संवय शिक्षकाच्या धाकांतून विद्यार्थी निघाला तरी जात नाहीं. सारांश उपयुक्त आणि हितावह संवई लावण्याचा जो शिक्षणाचा उद्देश तो या रीतीनें शिक्षा लाविली तर च कडेस जातो. या संबंधानें

एका मोठ्या ग्रंथकर्त्याचा अभिप्राय ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. "गुरूचें काम विद्यार्थ्यास कोणत्या ही शास्त्रांत अगदीं परिपूर्ण दशेस आणण्याचें आहे असें नाहीं; परंतु त्याचें मुख्य कर्तव्य हें आहे कीं त्यानें विद्यार्थ्याची बुद्धि विकसित करावी; व त्यांस ज्ञान संपादन करावयास अवश्य ज्या संवई व जे गुण ते लावून ठेवावेत; म्हणजे पुढें कोणत्या ही विषयाचा अभ्यास त्यांस करणें झाल्यास तेव्हां अडचण पडूं नये." असा शिक्षणाचा मूळ उद्देश आहे, ही गोष्ट शिक्षकाच्या मनांत वागली, म्हणजे, दरएक कृत्य केवळ धाकानें व जबरीनें करविण्यांत कांहीं हांसल नाहीं, हें त्यांस सहज च कळूं लागेल.

---

## विद्यार्थ्यांच्या आंगचे शिक्षकास उपयोगी गुण.

आतां विद्यार्थ्यास आपल्या इच्छेप्रमाणें वर्तविण्यास त्यांच्या आंगचे कोणते स्वाभाविक गुण, व मनोधर्म उपयोगी आहेत, व कोणत्या गुणांच्या व मनोधर्मांच्या योगानें आपल्या इच्छेप्रमाणें त्यांस वर्तविण्यांत विशेष हित आहे, याचा संक्षिप्त रीतीनें विचार करूं. मुख्यत्वें खालीं सांगितलेले गुण, व मनोधर्म, विशेष लक्षांत ठेविण्यासारखे आहेत.

१. ज्ञान संपादन करण्याची इच्छा.

२. निरुद्योगी बसण्याचा कंटाळा, व कांहीं तरी काम करीत असण्याची हौस.

३. कोणती ही अडचण दूर केल्यापासून मनास होणारें समाधान.

४. कोणतें ही काम करणें तें चांगल्या रीतीनें करण्याची हौस; व दुसऱ्याप्रमाणें आपलें काम चांगलें असावें ही इच्छा.

५. थोरपणची आपली तरतूद नीट ठेवण्याची इच्छा.

६. प्रशंसेची हौस.

७. बढती करून घेण्याची इच्छा.

हे सर्व मनोधर्म मुलांच्या आंगीं स्वाभाविकपणें असतात. त्यां पैकीं कितीएक अगदीं बीजरूपानें असतात, ते गुरुजींनीं वाढवावे लागतात; व कितीएक मूळचे च पाहिजे तितके असतात. त्यांना इष्ट विषयाकडे वळविले मात्र पाहिजेत.

१ लहान मुलांनीं कोणती ही नवीन गोष्ट पाहिली असतां तिजवि-

षयीं तीं हजारों प्रश्न विचारितात. या प्रश्नांचीं उत्तरें त्यांस मिळालीं असतां जो त्यांस संतोष होतो, तो दुसऱ्या कशापासून ही होत नाहीं. ही च मुलांची संवय लहानपणापासून वाढविली ह्मणजे त्यांची ज्ञान संपादन करण्याची इच्छा उत्तरोत्तर प्रबळ होते. परंतु हें सर्व शिक्षकाच्या चातुर्याचें, व हुशारीचें काम आहे. विद्यार्थ्यांस जी माहिती द्यावयाची ती शहाणपणानें योजना करून निवडलेली असली पाहिजे. अशी माहिती सोपी करून व त्यांच्या ध्यानांत राहील अशा बोधक रीतीनें सांगितली, तर ती ज्यांस रुचणार नाहीं, अशीं मुलें विरळा च. साहजिक रीतीनें मुलांनीं कांहीं वस्तु पाहिली तरी, तिजविषयीं तीं हजारों गोष्टी विचारूं लागतात; त्या प्रश्नांचीं जर बाळबोध व संक्षिप्त उत्तरें वेळच्या वेळेस त्यांस दिलीं तर त्यांची जिज्ञासा सहज च वाढते, परंतु अशीं उत्तरें न देतां निरर्थक, लांबलचक व पोकळ उत्तरें दिलीं तर त्यांचें मन गोंधळून जातें, व असें वारंवार झालें म्हणजे त्यांची ज्ञान संपादन करून घेण्याची इच्छा मंद मंद होत होत नाहींशी होते. ज्या वस्तु मुलांच्या दृष्टीस नेहमीं पडतात, त्यांविषयीं च तीं वारंवार माहिती विचारितात. याकरितां मुलांस जी माहिती द्यावयाची ती त्या गोष्टींवरून देत असावें. मुलें जें वाचतात त्याचा संबंध त्यांस ज्या गोष्टी माहीत असतात, त्यांशीं नेहमीं जोडून देत असावें. या रीतीनें शिकवितां येण्याकरितां गुरुजींस माहिती चांगली, खास आणि तऱ्हेतऱ्हेची असली पाहिजे. असें करतांना विद्यार्थ्यांस पदार्थ प्रत्यक्ष दाखवून त्यांविषयीं माहिती सांगावयाचा जो प्रकार आहे त्या प्रकारच्या शिक्षणाची वहिवाट ठेवावी. दुसरें असें कीं गुरुजीचा विद्यार्थ्यांवर लोभ असला पाहिजे. त्याखेरीज विद्यार्थी मोकळ्या मनानें त्यास विचारावयास येणार नाहींत. याकरितां विद्यार्थी लोकांस त्यांस वाटेल ते प्रश्न विचारण्यास उत्तेजन द्यावें, कारण असें केल्यापासून अनेक फायदे होतात. एक तर विद्यार्थ्यांस ज्या गोष्टी अवघड लागल्या असतील त्या त्यांस स्पष्ट समजतात; दुसरा फायदा असा आहे कीं अशा रीतीनें विचारूं दिलें, व त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें गुरुजींच्या हातून समर्पक मिळालीं म्हणजे गुरुजी, व विद्यार्थी यांजमध्यें विलक्षण परस्पर प्रेम उ-

त्पन्न होतें. आणि त्यापासून अनेक फायदे सहज होऊन जातात. कारण जो मनुष्य आपण विचारिलेल्या सर्व गोष्टी आपणास समजून देण्याकरितां झटतो, व आपल्या अंतःकरणाचें समाधान करितो व आपणास ममतापूर्वक चमत्कारिक गोष्टी सांगतो, त्याच्या मर्जीबाहेर विद्यार्थी कधीं वागणार नाहींत. त्यास ते नेहमीं मान देतील, व जेणेंकरून त्यास सुख होईल, अशा रीतीनें वागतील. कधीं कधीं मुलें वर्गांत ऋणाइतांसारखीं बसतात; परंतु त्याजवरून मुलांना ज्ञान संपादन करण्याची जन्मतः जी हौस असते, ती त्यांना नाहीं, असें कधीं समजूं नये. परंतु असें खचीत समजावें कीं त्यांस समजेल व त्यांचें मन रिझेल, अशा रीतीनें आपणास शिकवितां च येत नाहीं. जर त्यांच्या शक्तीप्रमाणें विषय शिकवितां आला, तर त्यांचें चित्त त्याकडे लागणार नाहीं, असें कधीं होणार नाहीं.

२. निरुद्योगी बसण्याचा कंटाळा.—मुलांना सारा वेळ कांहीं ना कांहीं तरी करावयास पाहिजे च; त्यांचें मन कोठें ना कोठें तरी गुंतलें पाहिजे, असा त्यांचा स्वभाव च आहे. वर्गांत बसून जर त्यांचें मन वर्गांत चाललेल्या विषयाकडे लागलें नाहीं, तर तीं कांहीं तरी दुसरा उद्योग पाहूं लागतात. त्यांच्यानें उगें च बसणें तर होत च नाहीं; व जर शिक्षकाच्या आंगीं त्यांचें मन चाललेल्या अभ्यासाकडे लावण्याचा मगदूर नाहीं तर, तीं आपण च कांहीं तरी उद्योग शोधून काढितात; हळू च गप्पा सुरू होतात, नाहीं तर कांहीं तरी खेळ चालू होतो. असें झालें म्हणजे गडबड व अव्यवस्था सहज च सुरू होतात. याकरितां शिक्षकानें नेहमीं ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं वर्ग चालला असतां सर्व मुलांस चाललेला विषय समजून त्या सर्वांचें त्या विषयाकडे मन लागेल असें करणें त्यांचें काम आहे.

३. कोणती ही अडचण आली असतां ती दूर करण्यापासून होणारा आनंद.—वर सांगितलेल्या दोन गुणांप्रमाणें हा ही गुण स्वाभाविक च आहे; परंतु ते गुण जसे आपोआप दृढ होत जातात, तसा हा दृढ होत नाहीं. फार जपून हा गुण संभाळावा लागतो व वाढवावा लागतो. आपल्या वाटेंत आलेली अडचण दूर केल्यापासून आणि

जें काम कितीक वेळ आपण करूं लागलें असतां साधलें नाहीं तें हर इलाज करून कडेस गेलें म्हणजे त्यापासून जो आनंद होतो, त्याचा अनुभव थोडथोडा सर्वांस आहे च. **सर् ऐझाक् न्यूटन्** यांनीं नानातऱ्हेचें गणित करून गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत शोधून काढला तेव्हां गणित करतां करतां तो सिद्धांत निश्चयेंकरून आपल्या हातीं आला, असें त्यांस वाटतां च त्यांस अपरिमित आनंद झाला. तो इतका झाला कीं बाकीचें गणित त्यांच्यानें पुरें होईना. शेवटीं त्यांनीं तें काम आपल्या स्नेह्याकडून पुरें करविलें. इतका आनंद होण्याची योग्यता थोड्यांची च आहे. परंतु सामान्य मनुष्यास देखील आपल्या कामांत आलेली हरकत दूर केल्यापासून जो आनंद होतो तो उत्कृष्ट प्रकारचा आहे. यापासून सर्व मानसिक वृत्तींचा विकास होतो, मनुष्यास आपल्या बुद्धीचा भरंवसा येतो, व बुद्धि खर्च केल्यापासून उत्पन्न होणारा विलक्षण आनंद ही होतो. असें दुसऱ्या कोणत्या ही गोष्टींपासून होत नाहीं; इतकें च नव्हे, परंतु या आनंदाचा वारंवार अनुभव घेतल्यानें मनांत आणलेली गोष्ट कडेस लाविल्याशिवाय राहावयाचें च नाहीं, असा निर्धार मनुष्याच्या आंगीं उत्पन्न होतो. हा आनंद थोर मनुष्यांना फार होतो आणि मुलांना कमी होतो असें नाहीं. मुलांनाही तितका च होतो. मात्र शिक्षकानें त्यांना त्यांच्या मनाला जपून वळण लाविलें पाहिजे आणि मदत केली पाहिजे.

४. हातीं घेतलेली गोष्ट चांगल्या रीतीनें कडेस लावण्यापासून उत्पन्न होणारा आनंद, आणि आलेली अडचण दूर केल्यापासून होणारा आनंद, हे दोन्ही एके प्रकारचे च आहेत. चांगले रीतीनें काम शेवटास नेणें ह्मणजे कांहींएक प्रकारच्या हरकती च दूर करणें आहे. याहून दुसरा कांहींएक प्रकार नाहीं. कोणती ही गोष्ट कशी ना कशी तरी कोणी ही करितो च; परंतु चांगल्या रीतीनें ती च गोष्ट करणारे फार थोडे असतात. स्वभावतः मनुष्याला चुकेल तितकी मेहनत व काळजी चुकवावी अशी इच्छा असते च. व ज्या अर्थीं काम चांगलें होण्यास मेहनत व काळजी या दोहोंची ही जरूर आहे, त्या अर्थीं काम चांगलें करण्याची इच्छा एकीकडे, व सुस्ती आणि गाफ-

लपणा दुसरीकडे, याप्रमाणें विद्यार्थ्यांच्या मनास दोहींकडून दोन ओढी नेहमीं असतात च. यांपैकीं वाईट पक्षाची ओढ सहज च बलवत्तर असते, हें सांगण्यास नको. या करितां तिच्या योगानें मुलांच्या मनाचा खराबा होऊं न देतां दुसरी जी श्लाघ्य इच्छा, काम चांगल्या रीतीनें करण्याची, ती उत्तरोत्तर वृद्धिंगत करून दुसऱ्या इच्छेवर तिचें वर्चस्व होईल अशा रीतीची शिक्षा लाविली पाहिजे. नाहीं तर गाफलपणाची गोडी आपोआप वाढून काम चांगलें करण्याची इच्छा निर्मूळ होऊन जाण्यास बिलकुल उशीर लागणार नाहीं. यासाठीं विद्यार्थ्यांची नेहमीं अशी समजूत घातली पाहिजे कीं जें काम हातीं घेतलें, तें नुस्तें केलें म्हणजे झालें, असें नाहीं, परंतु उत्कृष्ट रीतीनें करणें अवश्य आहे. त्यांची दुसरी ही समजूत अशी घातली पाहिजे कीं, उत्तम रीतीनें काम केलेलें पाहून आपणांस जो आनंद होतो तो केवळ आळशीपणानें होणारे खोटे सुखापेक्षां सहस्रपट थोर आहे.

मनुष्यांचे आंगीं जें काम करावयाचे तें बिलकूल कसर न करितां करावयाचें हा गुण असणें फार च इष्ट आहे. कोणती ही गोष्ट करूं लागलें असतां, ती लोक करितात तशी केली म्हणजे पुरे आहे, असें मनांत न आणितां ती होईल तितके चांगले प्रकारानें च करावयाची अशी संवय लहानपणापासून मुलांस लागली असतां, पुढें कोणते ही कामीं कसर न करण्याचा गुण जसा त्यांचे आंगीं येतो, तसा दुसरे कोणते ही साधनानें येत नाहीं. दुसऱ्याचे कामाशीं आपलें काम लावून पाहूं लागलें म्हणजे थोडीशी एक प्रकारची हलकी बुद्धि उत्पन्न होते, तिला चढाओढ असें म्हणतात. ही बुद्धि देखील अगदीं वाईट आहे असें नाहीं. ती वाढविण्यासारखी च आहे, पण ती फार बेतानें ठेविली पाहिजे. कोणतें ही काम लोकांप्रमाणें चांगलें करावें अथवा त्यांच्याहून चांगलें करावें अशी हौस बाळगण्यांत कांहींएक वाईट नाहीं, परंतु तें न साधलें म्हणजे दुसऱ्याचें बरें न देखूं शकणें व त्याशीं हेवा करणें हें वाईट आहे, म्हणून तें टाळलें पाहिजे. जें काम हातीं घेतलें तें नीट करावयाचें, एवढा हेतु बाळगला म्हणजे क्रमानें सर्वोत्कृष्ट रीतीनें काम करण्याची इच्छा आपो-

आप उत्पन्न होते. या इच्छेच्या अनुरोधानें आपले मनांत असेल त्या प्रमाणें विद्यार्थ्यांस वागविण्याविषयीं शिक्षकानें प्रयत्न केला असतां तो सफल होण्यासारखा आहे, परंतु त्या योगानें विद्यार्थ्यांचे मनांत हेवा उत्पन्न न होई अशाविषयीं त्यानें फार झटलें पाहिजे. चांगलें करण्याची इच्छा थोडीबहुत सर्वांचे मनांत असते च; ती मुळीं च नाहीं असा मनुष्य सांपडावयाचा नाहीं यांत संशय नाहीं. शिक्षकानें मात्र ही गोष्ट लक्षांत ठेवून विद्यार्थ्यांचे हातून काम करून घेण्याचे व त्यांचें पुढचें कल्याण साधण्याचे कामांत तिजपासून लाभ करून घेतला पाहिजे. ज्या मनुष्यास अशी शिक्षा आहे कीं, जें काम हातीं घेतलें तें उत्कृष्ट रीतीनें करावयाचें, त्याचे च हातून मोठालीं कृत्यें घडतील. आपलें स्वतःचें हित साधणें व आपले देशबांधवांचें कल्याण करणें हें काम करील तर अशा शिक्षेचा च मनुष्य करील; इतरांचे हातून कधीं ही घडणार नाहीं.

आपलें स्वतःचें हित साधून घेण्याविषयीं वर लिहिलें आहे, त्यावरून ही इच्छा दोषार्ह आहे असें समजण्याचें कारण नाहीं. पंतोजीनें आपलें हित करून घेण्याच्या च इच्छेनें काम केलें तरी काय चिंता आहे? अमुक गोष्ट केल्यानें तुमचें हित होईल असें सांगून कोणी पंतोजीकडून काम करविलें तरी काहीं च हरकत नाहीं. आपणास पुढें होणारे लाभावर बिलकुल नजर न देतां निरपेक्ष बुद्धीनें जो काम करील, तो तर उत्तम च मनुष्य होय; परंतु स्वहितासाठीं चांगलें काम करणें हें अगदीं न्याय्य आहे. व बहुतेक लोक चांगलें काम करितात ते या च बुद्धीनें करितात; मात्र ही बुद्धि फार प्रकट न होण्याबद्दल होईल तितका इलाज करितात. मनुष्यानें आपली बढती करून घेण्याविषयीं प्रयत्न करण्यांत दोष नाहीं, इतकें च नाहीं; परंतु त्याचे पदरीं मुलेंबाळें व इतर चार माणसें असतात त्यांजकडे लक्ष दिलें म्हणजे सहज ध्यानांत येईल कीं, याप्रकारें आपली बढती करून घेणें हा त्याचा धर्म आहे. इतकें मात्र नेहमीं मनांत बाळगिलें पाहिजे कीं बढती करून घेण्याकरितां कोणत्या ही रीतीचा अयोग्य उद्योग करूं नये. इतर खात्यांपेक्षां शाळाखात्यांत मनुष्याच्या योग्यते प्रमाणें त्याची बढती व्हावी या नि-

यमाची अधिक प्रवृत्ति असते असें म्हणण्यास चिंता नाहीं. सामान्यतः मनुष्याची योग्यता कशी काय आहे, हें त्यांस हातीं धरलेले कामांत यश येईल त्याप्रमाणें ठरणार आहे. याकरितां जो शिक्षक आपलें काम उत्तम रीतीनें करील, तो योग्यतेस चढणार आहे. सारांश जो शिक्षक आपले विद्यार्थ्यांचे कल्याणाकरितां उत्तम रीतीनें झटेल, तो लोकांचें कल्याण करून आपलें ही हित साधील असें समजावें.

५. थोरपणीं जो उद्योग करावा लागेल त्याची तयारी करणें:—ही इच्छा उत्पन्न होण्यास विद्यार्थ्यांस अंमळ कळूं लागलें पाहिजे. सामान्यतः लहानपणीं ही बुद्धि अगदीं च कमी असते. जसजसें वय अधिक होत जातें, तसतशी ही बुद्धि अधिक वाढत जाते; परंतु लहानपणापासून च मुलाचे या बुद्धीचा शिक्षकास उपयोग पडण्यास कांहींएक हरकत नाहीं. जर मुलास चांगलें समजावून दिलें तर, चांगली मेहनत करून वाचावयास शिकवल्यानें पुष्कळ ज्ञान संपादन करून घेण्यास मार्ग होतो, व ज्ञान संपादन केल्यानें थोरपणीं सुख होतें व बहुत कामें होतात या गोष्टी लहान मुलास समजावयास फारशा कठीण आहेत असें नाहीं. व यावरून लहान थोर सर्व मुलांस असें सांगून उद्योगाची अभिरुचि लावून देतां येईल. मुख्य गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, दरएक गोष्ट शिकविते वेळेस तिजपासून पुढें व्यवहारांत कसा उपयोग होईल हें विद्यार्थ्यांस समजे असें करावें. शाळेंत मुलें अभ्यासाकडे दुर्लक्ष करितात, त्याचें कारण बहुत अंशीं शिक्षकास शिकवितां येत नाहीं हें असतें खरें, परंतु कितीएक विद्यार्थ्यांस शिक्षक आपणांस सांगत आहे त्याचा उपयोग पुढें आपणांस कसा होईल हें समजत नसल्यामुळें ही ते त्या अभ्यासाकडे कान्हाडोळा करितात. या देशांतील हलके प्रतीचे लोकांस तर विद्येची अभिरुचि मुळीं च नाहीं; व शेंदोनशांतून एखादे मनुष्यास च लिहितां वाचतां येतें. यामुळें असें होतें कीं, मुलें च अभ्यासाकडे दुर्लक्ष करितात असें नाहीं, तर आईबाप देखील, कितीएक गोष्टी पंतोजी सांगतो पण त्या आपणांस पढावयाचें कारण नाहीं, असें मुलांस सांगतात. मग तर मुलें त्या अभ्यासाचें मुळीं च

नांव सोडून देतात. याकरितां पंतोजीनें आपण जें शिकवितों तें नेहमीं पुढें उपयोगी पडेल असें तजविजीनें शिकविलें पाहिजे.

ठाणें जिल्ह्यांत एके गांवीं कोळी लोकांची वस्ती फार आहे तेथें सरकारानें शाळा ठेविली आहे. तेथें कांहीं वर्षांपूर्वी अभ्यास तीन इयत्तांपर्यंत चालत असे. परंतु तितक्यांत देखील भूगोलाचे अभ्यासाचें नांव च नसे व कवितेविषयीं देखील तक्रार असे. परंतु जेवण्याचे वेळेस मुलांनीं श्लोक ह्मणण्याचा प्रचार तेथें असल्यामुळें, कविता शिकविल्या तर विद्यार्थी व आईबाप कसें तरी सोशीत, पण भूगोल शिकविण्यास आरंभ केला कीं, गांवकऱ्यांनीं मुलें शाळेंतून काढिलीं च. असें होतां होतां एका वेळेस शाळेवरील एक अधिकारी सदरहू गांवीं गेले असतां लोकांनीं हा पंतोजी भूगोल शिकवितो म्हणून त्यावर तक्रार केली. सदरहू अधिकारी यांनीं त्या गांवीं जीं दोन पांढरपेशांचीं मुलें होतीं त्यांस च जवळ घेऊन भूगोल शिकविण्याचा घाट घातला, व इतर मुलांस तुम्ही दुसरा उद्योग करा ह्मणून सांगितलें; व गांवकरी लोकां देखत ते त्या दोघां मुलांस प्रश्न विचारूं लागले. ते प्रश्न अगदीं सोपे पण उपयुक्त असे मात्र विचारूं लागले, ते असेः—"वसईहून माहीम किती कोस लांब आहे? वसईहून पडावांत माहिमास जाऊं लागलें असतां अगाशी कोणते हाताकडे राहील? अगाशी बंदरीं चोरी झाली तर खबर कोणत्या तालुक्याचे पोलीस चीफ कान्स्टेबलाकडे द्यावी? वसईहून मुंबईस जाण्याचें असेल तर वारा दक्षिणेकडून वाहत असला तर बरा किंवा उत्तरेकडून येणारा चांगला?" असे प्रश्न करून मुलांस समजूत घालून ते शिकवूं लागतां च वेगळीं बसलेलीं मुलें व त्यांचे आईबाप वर्गाकडे टकमक बघूं लागले. व गांवकरी लोकांनीं आमचे मुलांस हें शिकलें पाहिजे असा आग्रह धरिला. परंतु कांहीं वेळ सदरहू अधिकारी यांनीं ओढून आणून तुह्मांस भूगोलाची गरज नाहीं, तुह्मीं इकडे लक्ष देऊं नये म्हणून गांवकऱ्यांस सांगितलें. परंतु गांवकरी आपला हेका सोडीनात; तेव्हां बाहेर काढलेले मुलांस पुनः वर्गांत घेतलें. तेव्हांपासून गांवांत भूगोलाबद्दल तक्रार म्हणून राहिली नाहीं. याकरितां जरी ब्राह्मणांच्या वगैरे मुलांबद्दल इतकी खटपट

करण्याची जरूर पडत नाहीं, तरी अडाणी लोकांस देखील विद्येबद्दल संशय येऊं नये, म्हणून शिकविण्याचे विषय व व्यवहारांतील वागणूक ह्यांचा मिलाफ आहे, ही गोष्ट सर्वांचे ध्यानांत येईल अशा रीतीनें मुलांस शिकविलें पाहिजे.

६. प्रशंसेची आवडः—हा धर्म ही कोणाचे आंगीं नाहीं असें नाहीं. आपले संबंधी व ओळखीदेखीचे यांनीं आपली वाखाणणी केल्यानें ज्यांस भूषण वाटत नाहीं असे लोक विरळा. कधीं कधीं एका च मनुष्याचे प्रशंसेसाठीं देखील लोक झटतात; पण त्याचें कारण नेहमीं असें असतें कीं, ते त्या मनुष्याचे भजनीं असतात, किंवा त्याजपासून त्यांना कांहीं तरी लाभ करून घ्यावयाचा असतो. आतां विद्यार्थी व पंतोजी यांजविषयीं विचार करूं लागलें असतां तेव्हां च ध्यानांत येईल कीं, पंतोजीचे हातीं, विद्यार्थ्यांस भजनीं लावावयाचें, व त्यांस लाभ करून द्यावयाचें, हीं दोन्ही साधनें नेहमीं सिद्ध आहेत. विद्यार्थ्यांचे मनांत आपलेविषयीं पूज्यबुद्धि राहण्याकरितां पंतोजीनें काय केलें पाहिजे हें, व ती असणें किंवा नसणें हें केवळ त्याचें हातचें काम आहे, हें पूर्वीच सांगितलें आहे. त्याचप्रमाणें खालचे वर्गांतून वरचे वर्गांत जाणें, बक्षीस मिळविणें व विद्या शिकणें, हीं सर्व कामें विद्यार्थ्यांस पंतोजीचे हातून करून घ्यावयाचीं असतात. तेव्हां विद्यार्थ्यांचे मनांत गुरुजीविषयीं पूज्यबुद्धि असून खेरीज त्यांचें नफानुकसान त्याचे हातीं असतें, ह्मणून अर्थात् त्याजकडून बरें ह्मणून घेण्याविषयीं तीं मनापासून झटतील यांत कांहींएक संशय नाहीं. परंतु हें ध्यानांत ठेवावें कीं, एवढ्या तेवढ्याकरितां शाबासकी देऊं लागलें म्हणजे ती फार च सवंग होते व तिला कोणी विचारीनासा होतो. याकरितां स्तुति करण्यासारखें च कांहीं काम मुलानें केल्याशिवाय त्याला शाबासकी देऊं नये. असें केलें तर पंतोजीकडून शाबासकी मिळविण्याकरितां विद्यार्थी जें पाहिजे तें करितील. पंतोजीची मुलांवर ममता असली व मुलें पंतोजीस पूज्य मानीत असलीं म्हणजे तीं त्याची वाहवा मिळविण्याविषयीं अशीं तत्पर असतात कीं, त्या तत्परतेच्या योगानें गुरुजीस त्यांना पाहिजे त्याप्रमाणें वागविणें फार सुलभ होतें. आणि

तशा चतुराईनें पंतोजीनें मुलें वागविलीं म्हणजे असें होईल कीं पंतोजीनें आपले कामाकडे पाहून समाधानानें नुस्ती मान डोलविली तरी दिवसभर श्रम केल्याचें सार्थक झालें, असें विद्यार्थ्यांस वाटेल.

स्तुति करणें ती बाताबेतानें करावी. ज्या मायाळू स्वभावाच्या मनुष्यांचा मुलांशीं वारंवार प्रसंग पडतो त्यांना आपली मर्जी खुष झाली आहे असें बहुत वेळ बोलून दाखविण्याचा प्रसंग येईल असें असतें. 'शाबास,' 'छान उत्तर दिलें' अशीं वाक्यें ते वारंवार बोलतात. असलीं वाक्यें वारंवार बोलल्यानें दोहोंपैकीं एक गोष्ट घडेल. एक तर मुलांना असल्या वाक्यांत फारसा अर्थ नाहीं; तीं आपलीं उगीच पोकळ गोड वचनें असून उत्तरांचा खरा गुण दाखविणारीं नव्हत असें विद्यार्थ्यांस वाटूं लागेल. अथवा मुलांना अशी संवय लागून जाईल कीं क्षणोक्षणीं शाबासकी देण्याला कोणी नाहीं कोणी तरी पाहिजे च. प्रथम पक्षीं शिक्षकाचें वजन कमी होईल; आणि खरोखरी विशेष स्तुति करण्याचा जेव्हां प्रसंग येईल तेव्हां प्रशंसा करण्याला त्याला कांहीं च वचन राहणार नाहीं. द्वितीय पक्षीं मुलांना अशी खोड लागून जाईल कीं दर एक कामाला कोणी नाहीं कोणी तरी शाबासकी देणार मनुष्य अवश्य पाहिजे च; त्या वांचून त्यांचें कांहीं च चालावयाचें नाहीं, असें झालें म्हणजे क्रमाक्रमानें त्यांचा स्वपराक्रम कमी होईल. जेव्हां तेव्हां कोणाचें नाहीं कोणाचें तरी प्रोत्साहन पाहिजे अशी मुलाला संवय असणें हें अगदीं चांगलें नाहीं. कोणाच्या ही स्तुतीची अपेक्षा न करतां जें करणें रास्त असेल तें च करावें अशी विद्यार्थ्यांस शिक्षा लागावी हें शाळेच्या पद्धतीपासून ज्या गोष्टी सिद्ध करावयाच्या त्यांपैकीं एक आहे. या करितां मुलांवर बाह्यात्कारीं मर्जी दाखविण्या करितां, व्यर्थ स्तुतिवचनें बोलण्यांत वरचेवर येऊं देऊं नयेत.

७. बढतीची हौसः—ही स्वभावतः मनुष्याचे आंगीं असणें हें ही स्तुत्य आहे. या हौशीपासून उपयोग करून घेण्यासाठीं पंतोजीनें असा नियम करून ठेविला पाहिजे कीं, विद्यार्थ्यांची वागणूक अमुक प्रकारची असल्याशिवाय व त्यांस अमुक विषय इतका आल्याशिवाय वरचे वर्गांत घालावयाचें च नाहीं. असें केल्यानें लहान मुलें झटून काम

करतील. व त्यांस अमुक एक गोष्ट साधावयाची आहे असें मनांत वागविण्यास सांपडेल. याप्रमाणें अमुक गोष्ट साधावयाची आहे असें नेहमीं मुलांचे नजरेपुढें ठेवण्यानें पुष्कळ फायदे होतात. लहान मुलांस काय व मोठे मनुष्यांस काय, कालांतरीं होणारे थोर लाभांवर नजर देऊन कोणतें ही काम करण्याची काळजी लागत नाहीं. परंतु जर थोडे दिवसांत निभ्रांतपणें होणारा लहानसा जरी लाभ असला तरी त्याकरितां मनुष्य सहज जीव लावून काम करील. पुढें आपण विद्वान् होऊं व आपले देशाचे उपयोगीं पडूं, इतकी दूरची गोष्ट मुलांना समजत नाहीं. पण उद्यां परीक्षा आहे, ती उतरली तर आपण वरचे वर्गांत जाऊं, किंवा तींत उत्तरें चांगलीं दिलीं तर आपलें नांव पहिलें येईल, असा चटका असला तर मुलगा लागलीच आपले अभ्यासाची उजळणी वगैरे मोठे काळजीनें डोळ्यांत तेल घालून करील.

आतांपर्यंत सांगितलें याचा सारांश इतका आहे कीं, मुलांस किंवा वर्गास शिक्षा लावणें हें काम फार महत्त्वाचें आहे; व मुलांस शिक्षा लावण्याकरितां जो बंदोबस्त राखावा लागतो तो राखणें जरी अगदीं सोपें काम नाहीं, तरी जो मनुष्य आपले कामावर चित्त ठेवून याकरितां झटेल त्याचें बंदोबस्तापुरतें मुलांवर वर्चस्व सहज राहील. वर जे मुलांचे आंगीं गुण असतात ह्मणून सांगितलें, त्या गुणांचा योग्य विनियोग मुलांकडून करविण्यास शिक्षकाचे आंगीं चातुर्य, विचार, भारदस्तपणा, व कामाविषयीं एकनिष्ठा हे गुण अवश्य असले पाहिजेत. व ज्याचे आंगीं हे गुण असतील त्या पंतोजीस शाळेचा बंदोबस्त राखण्यास मुलांचे स्वभावाखेरीज दुसरें कांहींएक साधन नको. मुलांला दंड खंड करणें अगर मारहाण करणें वगैरे गोष्टी करण्याची त्याला बिलकुल गरज लागणार नाहीं.

इतकें सांगून ग्रंथाचा दुसरा विषय जो अध्यापन त्याचे विवेचनास आरंभ करूं.

## अध्यापन.

एका इंग्रेजी ग्रंथांत, अध्यापनांत कशाचा संग्रह होतो, व अध्यापन करतांना अध्यापकानें काय साधण्याचा यत्न करावा, हें ध्यानांत

येण्याकरितां अध्यापनाविषयीं चार गोष्टी सांगितल्या आहेत. त्यांचें या प्रकरणाच्या आरंभीं दिग्दर्शन केलें आहे.

"१. **अध्यापन ह्मणजे शिष्याला काम करण्यास लायख करणें.** कांहीं कामें बहुत अंशीं मनानें करावयाचीं असतात; जसें गणित, भाषा समजणें वगैरे. कांहीं कामें हातानें करावयाचीं असतात जसें अक्षर काढणें, नकाशा काढणें वगैरे. कांहीं कामें वाणीनें करावयाचीं असतात; जसें गाणें, वाचणें वगैरे. अशा बाबतींत अध्यापन ह्मणजे शिष्याच्या आंगीं शक्ति आणि चातुर्य उत्पन्न करणें होय. असल्या कामीं शिष्याकडून बहुत नियम तोंडपाठ करून घेतले म्हणजे अध्यापन झालें असें नाहीं. तर त्याला तें काम करतां च आलें पाहिजे. शिष्याच्या आंगीं जन्मतः ज्या शक्ति असतील त्यांचा विकास करणें आणि त्यांना शिस्त लावणें, म्हणजे त्या शक्तींचा बरोबर उपयोग कसा करावा हें सामर्थ्य त्यांजमध्यें उत्पन्न करणें, हें अध्यापकाला साधावयाचें आहे. शिष्याला न आलें कीं, आपण करून दाखविलें, एवढ्यानें काम होत नाहीं. शिष्याला मीं अमुक अमुक केलें पाहिजे असें समजावून देणें, तें कोणत्या रीतीनें करावयाचें ती रीत दाखविणें, आणि युक्ति प्रयुक्तीनें त्याला अशी गोडी लावणें कीं, तेणेंकरून तो झटून त्या रीतीनें तें काम करावयास अचूक लागेल, याचें नांव अध्यापन.

२. **अध्यापन करणें ह्मणजे शिष्याच्या मनाची रचना करणें.** एखाद्या बांधलेल्या इमारतींत कांहीं सामान भरणें, अगर एखाद्या पोत्यांत कशा नाहीं कशा तरी मातील तितक्या जिनसा कोंदून भरणें, या मासल्यावर जें ज्ञान शिष्याच्या मनांत भरणें त्याचें नांव अध्यापन नव्हे. अशा रीतीनें मनांत राहिलेलें ज्ञान किती झालें तरी पाहुणें च म्हणावयाचें. खरें ज्ञान शिष्याला झालें असें केव्हां ह्मणावयाचें? जेव्हां त्या ज्ञानाचा परकेपणा मोडून तें केवळ मनाच्या अंगभूत च होऊन राहील तेव्हां ज्ञान संपादन झालें असें ह्मणावयाचें. या प्रमाणें जें ज्ञान प्राप्त झालें तें वेळेवर उपयोगी पडल्याशिवाय राहावयाचें नाहीं. केवळ स्मरण ठेवण्याच्या म्हणून कितीएक युक्ती आहेत, पण त्या वेगळ्या आणि अध्यापन हें वेगळें च आहे. त्या युक्ति

मात्र जसा कंठाळींत कांहीं माल भरावयाचा त्या मासल्याच्या आहेत. त्याच्या योगें फार झालें तर लवकर पाठ करावें कसें आणि कदाचित् लवकर पाठ झालें असेल त्याची आवृत्ति कशी करावी, इतकें मनुष्याला समजूं लागेल. पण अध्यापनानें मनुष्याची बुद्धि वाढते आणि त्याच्या आंगीं ऊहापोह करण्याचें सामर्थ्य वाढतें. जो विद्यार्थ्याला लवकर पाठ करावयाला शिकवील तो उत्तम अध्यापक नव्हे. परंतु जो थोड्या काळांत त्याची समजण्याची आणि विचार करण्याची शक्ति वाढवील तो उत्तम अध्यापक जाणावा. यावरून असें समजावें कीं अध्यापनाचा विषय काय असावा हें महत्त्वाचें आहे खरें; परंतु अध्यापनाच्या रीतीचें महत्त्व त्याहून विशेष आहे.

**३. अध्यापन ह्मणजे कितीएक गोष्टी नकळत बराबर करतां येण्याची विद्यार्थ्यांस शिस्त लावणें.** कोणी ही सुशिक्षित मनुष्य ग्रंथ वगैरे वाचतो तेव्हां वाचनाच्या विषयांत त्याचें मन इतकें गढून गेलेलें असतें कीं आपण कसें वाचीत आहों त्या रीतीवर त्याचें लक्ष नसतें; तथापि वाचण्याचें काम उत्कृष्ट होत असतें. याचें कारण असें आहे. उत्तम रीतीनें वाचण्याची शिस्त त्याची अशी पक्की बसून गेलेली असते कीं वाचतांना अर्थग्रहण करण्याचें जें काम सुरू असतें त्यांत, वाचनाच्या क्रियेकडे लक्ष जाऊन, थोडी सुद्धां हरकत पडत नाहीं. स्वच्छ, वळणदार, सुवाच्य लिहिण्याचें तरी असें च आहे. लिहिण्याच्या रीतीकडे लक्ष जाऊन, ज्या विषयावर विचार करावयाचा असेल त्या विषयावरून मन उडून जात नाहीं. बेरीज, वजाबाकी, गुणाकार-भागाकार यांचा देखील असा च प्रकार आहे. या कामांत पहिल्या पहिल्यानें परिश्रम फार पडतात. दोन्ही गोष्टींकडे एकदम चित्त कसें पोहोंचवावें हें समजत नाहीं. ते वेळेस अध्यापकाला फार श्रम पडतात. वारंवार वाचून लिहून वगैरे घेण्याचें काम त्याला सक्तीनें करून घ्यावें लागतें आणि त्यांतल्या खुब्या विद्यार्थ्याला समजावून द्याव्या लागतात. होतां होतां हीं कामें थोडक्याशा लक्षानें बिनचूक होऊं लागतात. हें अभ्यासाचें फळ होय. पुढें अध्यापकानें जरूर तितकें काम विद्यार्थ्यापासून करून घेतलें म्हणजे त्याला तें काम बिनचूक

तिकडे बिलकुल लक्ष दिल्याशिवाय करतां येऊं लागतें. आणि मग लिहितां वाचतांना वगैरे त्याचें मन द्विधा न होतां विषयाकडे एकाग्रपणें लागतें. To teach is to secure learn.

**४. अध्यापन करणें ह्मणजे विद्यार्थ्यांचे हातून शिकण्याचें काम खास होत आहे अशी योजना करणें.** गुरुजी अध्यापन करीत असतात तेव्हां विद्यार्थ्यांच्या वांट्याचें ही कांहीं अवश्य काम असतें. जसें, गुरुजींच्या बोलण्यावर चित्त देणें; चाललेलें पुस्तक अगर विषय असेल त्याचा व गुरूजींचे बोलण्याचा मेळ कसा पडतो तें तत्परतेनें पाहणें आणि त्या व्याख्यानाचें अनुसंधान ठेवण्याकरितां मनांतले मनांत अगर हातानें जें कांहीं करणें जरूर असेल तें संपादन केलेल्या शक्तीप्रमाणें जपून करणें. या दृष्टीनें अध्यापन करणें म्हणजे विद्यार्थ्यांकडून जें काम करून घेणें आहे तें त्याला गोडी लागेल अशा रीतीनें त्याज पुढें ठेवणें, तें करण्याचा बराबर मार्ग त्याला दाखविणें; आणि मधून मधून प्रश्न विचारून, दाखले देऊन, एखादे वेळेस थोडासा विनोद करून आणि प्रसंगानुसार, 'अमुक गोष्ट अशी च असली पाहिजे, कोण या विरुद्ध आहे असें दाखवितो पाहूं बरें,' असें जोरानें बोलून विद्यार्थ्यांचें मन जागृत ठेवून हातच्या विषयावर त्याची आसक्ति बसविणें इत्यादि अनेक अवघड अवघड कामांचा समुदाय होय."

शाळेमध्यें शिकविण्याचें काम चालतें तें तीन प्रकारचें असतें:—

१. केवळ तोंडजबानी अध्यापन करणें.

२. विद्यार्थी जातीनें हरएक प्रकारची मेहनत करीत असतां त्यांना तोंडानें नीट वाटेला लावून गरज पडेल तेथें त्यांस मदत करणें.

३. विद्यार्थी घरून सर्व तयारी करून आल्यावर त्यांचें काम बराबर झालें आहे किंवा नाहीं हें प्रश्न विचारून पाहणें आणि थोडी बहुत नवीन माहिती मधून मधून सांगणें.

तोंडजबानी शिकविण्यांत दोन प्रकार आहेत; एक प्रकार केवळ व्याख्यान देण्याचा आणि दुसरा व्याख्यान देत असतां मधून मधून प्रश्न विचारण्याचा. केवळ व्याख्यान देणें हें शाळेच्या नेहमींच्या कामास कांहीं उपयोगीं नाहीं. बोलण्याचा एकसारखा सोसाटा चालविण्यांत




कांहीं हांसल नाहीं. लहान लहान मुलांच्या वर्गांना शिकवितांना प्रश्न करून बोध करण्याची अध्यापनपद्धति फार कामास पडते. अशा वर्गांना या पद्धतीनें शिकविणें व मधून मधून कविता म्हणविणें आणि मुलांना योग्य असे खेळ काढणें यांत च पंतोजींचें काम होतें. ह्या खेळांतून वगैरे शिक्षकानें मुलांना जरा जरा मार्ग लावला च पाहिजे.

बहुतेक शाळांतून पद्धति अशी च असते कीं अध्यापनाचे इमारतीचा पाया सगळा च विद्यार्थ्यांच्या स्वतःच्या परिश्रमानें च तयार करवून वरचें काम तेवढें वर्गांत करावयाचें. म्हणजे कांहीं उपपत्ति सांगावयाची, कोठें अधिक माहिती सांगावयाची, कोठें उदाहरणें द्यावयाचीं, कांहीं प्रश्न विचारावयाचे, एवढें काम वर्गांत करावयाचें.

बराच शिकून तयार झालेला वर्ग शिकवावयाचा असला म्हणजे त्या वर्गांत कांहीं वेळ तोंडचें केवळ व्याख्यान आणि कांहीं वेळ तयारीवर भरंवसा ठेवून शिकविणें अशी चाळून पाळून पद्धति दरएक तासांतले तासांत ठेवावी लागते. **फिच्** साहेबांनीं तोंडीं व्याख्यानाबद्दल असें म्हटलें आहे:—

"विद्यार्थ्यांच्या मनांत ज्ञानाचा अंकुर उत्पन्न होणें तो जिवंत वाणीच्या च योगानें व्हावयाचा. गुरूची आणि विद्यार्थ्यांची जेव्हां परस्पर नजरेला नजर मिळेल; जेव्हां गुरूचा प्रत्यक्ष स्वर त्यांच्या कानीं पडेल; जेव्हां त्याची मुद्रा, हावभाव सर्व त्यांला डोळ्यांनीं दिसतील; तेव्हां च गुरुशिष्यांच्या मध्यें अवर्णनीय अतिसूक्ष्म मनोमय संवाद उत्पन्न होतो; आणि या मनोमय संवादाखेरीज शिष्यामध्यें खरोखरी जो विद्यार्थिभाव तो कधीं च उत्पन्न व्हावयाचा नाहीं."

"या प्रकारचा गुरुशिष्यांचे मनांचा मिलाफ जेव्हां होतो तेव्हां च शिकविण्याचा विषय विद्यार्थ्यांच्या मनाला ग्रहण करण्यास योग्य अशा रूपाला येतो. अशा प्रकारें शिकविणें रंगाला आलें असलें म्हणजे गुरु किरकोळ विस्ताराच्या बाबती असतील त्या झरदिशीं सांगून जातो; विशेष महत्त्वाच्या मुद्यांवर अधिक वेळ घालवून त्यांचा पुनः पुनः उच्चार करतो; समजण्यास अवघड भाग असेल त्याचें प्रतिपादन झाल्यावर थोडा वेळ थांबतो; अनुकूल उदाहरणें देतो; शिष्यांच्या

खास अंतःकरणाला जाऊन पोंहचे अशा कांहीं गोष्टी सांगतो; आणि जलद जलद थोडेसे मुद्याचे प्रश्न विचारून शिष्यवर्गाच्या मनांत आपण सांगितलेली गोष्ट बिंबली आहे कीं नाहीं तें लागलीं च पाहून सोडतो. हा सगळा प्रकार साधावयाला अध्यापकाच्या आंगीं बहुत गुण असावे लागतात. त्याचें बोलणें अस्खलित जलद असलें पाहिजे; त्याला कल्पना पुष्कळ आणि लवकर लवकर सुचल्या पाहिजेत; ज्या शब्दांचा वगैरे प्रयोग करावयाचा ते चांगले काळजीनें निवडक सोधून घेण्याचा अभ्यास असला पाहिजे. विषयाची व्यवस्था क्रमशुद्ध करतां येत असली पाहिजे; तें च तें च प्रमेय वेगवेगळ्या रूपांनीं दाखवितां आलें पाहिजे; शिष्याच्या मनांत विषय समजतांना काय काय नडी आहेत, त्यांवर चट्कन् नजर पोंहचली पाहिजे, आणि ती नड दूर कशी करावी हें ही सुचलें पाहिजे; जलदी केव्हां केली तर चालेल, सावकाशी केव्हां धरली पाहिजे, किती जलदी केली पाहिजे, विसावा कोठें घेतला पाहिजे, हें बरोबर समजण्याचें धोरण आहे, तें त्याच्या आंगीं असलें पाहिजे; यावरून असें ध्यानांत येईल कीं कोणताही विषय वर्गाला शिकवीत असतां नेहमीं थोडा बहुत व्याख्यानाचा प्रसंग हा आहे च."

"या रीतीच्या शिक्षणानें मुलांची बुद्धि तरतरीत होते हें जरी खरें आहे, तरी नेहमीं या रीतीनें च शिकविण्याचा जर पाठ ठेविला तर त्यामध्यें तोटे ही आहेत. प्रथमदर्शनीं च एक गोष्ट मनांत ठेविली पाहिजे कीं साऱ्या वर्गांत मिळून जरी हुशारी दृष्टीस पडली तरी त्यावरून दरएक विद्यार्थ्याचा अभ्यास पुढें चालला च आहे असें समजतां कामास नये. कधीं कधीं व्याख्यानावर सर्व चित्त ठेवीत आहेत असें दिसेल परंतु एकंदरींत पुष्कळ विद्यार्थ्यांना त्या व्याख्यानापासून फार च थोडा लाभ झालेला असेल. पुष्कळ जण एक काम करीत असले म्हणजे आपली संख्या मोठी आहे हें मनांत येऊन एकमेकाच्या संगतीनें सगळ्यांला च फुरण येतें ही गोष्ट खरी आहे, परंतु वस्तुतः जितकें फुरण येतें त्याहून, संख्या अधिक असली म्हणजे, दिसण्यांत जरा जास्त दिसतें हें ही खरें आहे. मातक्यान, शिक्षक हुशार असला म्हणजे विद्यार्थ्याला काय कोठें

नडणार आहे हें आधीं च ओळखून दाखलेदुखले घेऊन सर्व कांहीं सोपें करून सोडतो;आणि त्यामुळें विद्यार्थ्याला कांहीं करावयाचें राहत नाहीं. या गुरूच्या करण्यानें विद्यार्थ्याचें लक्ष विषयाकडे खूप लागतें खरें,पण तेणेंकरून स्वतः दुसऱ्याच्या साहाय्यावांचून श्रम करून ज्ञान संपादन करण्याची संवय त्याला लागत नाहीं".

विद्यार्थ्यानें स्वतःच्या श्रमानें शाळेंतील अभ्यासाची सिद्धता करणें आणि शिक्षकानें तोंडजबानी एकसारखें व्याख्यान देणें या दोहों पद्धतींचे गुण खालच्या उताऱ्यावरून ध्यानांत येतील:—

"पुस्तकांवरून धडे तयार करवून घेण्यांत जे फायदे आहेत ते स्पष्ट च आहेत. या पद्धतीनें विद्यार्थ्याला अमुक काम करावयाचें असें नियमितपणें समजतें. जें कांहीं कोणत्या ही विषयावरील ज्ञान विद्यार्थ्याला मिळतें तें संक्षिप्त रूपानें मिळतें आणि स्मरण ठेवावयाला सुलभ जातें. तोंडी व्याख्यानांत जें सविस्तर सांगण्यांत येतें तें पुस्तकावरून पाहिल्यानें आळा घालून एक ठिकाणीं जमविल्यासारखें ध्यानांत येतें. पुस्तकांवरून वारंवार आवृत्ति करण्यास ठीक पडतें; एकदा वाचून नीट समजूत न पडली तर तो च तो च विषय पुनः पुनः समजे तोंपर्यंत वाचण्याला सोय होते. जसें तोंडी व्याख्यान हें बुद्धि जागृत करण्याचें मुख्य साधन होय, तसें च पुस्तकावरून काम करून घेण्यानें साफ समजूत होणें, समजलेल्या गोष्टीबद्दल अधिकउणें न होतां लिहितां येणें आणि मिळविलेली माहिती कायम राहणें या गोष्टींचा पक्का बंदोबस्त होतो. दोहीं शिवाय शिक्षकाचें चालावयाजोगें नाहीं."

वरच्या उताऱ्यावरून सहज दिसून येईल कीं योग्य ठिकाणीं नुसत्या तोंडी व्याख्यानाची योग्यता मोठी आहे तरी शाळेचें सररास काम त्यावर च चालवूं ह्मटल्यानें होणार नाहीं. याचीं कारणें दोन आहेत. एक त्यामुळें शिक्षकावर अतिशय श्रम पडतात, व दुसरें त्यामुळें विद्यार्थ्यांच्या हातून जसें काम झालें पाहिजे तसें होत नाहीं.

केवळ तोंडी व्याख्यानानें शिक्षणाचें काम करावयाचें म्हटलें ह्मणजे शिक्षकावर दोन प्रकारचा मार पडतो. एक तर सर्व कांहींएक माहिती त्याला तोंडी सांगतां येईल अशी तयारी ठेवावी लागते; मग धडा

चालला असतां त्याला वरचेवर पुस्तकांत पाहीन म्हटलें तर बनत नाहीं. आपण स्वतः केलेलीं टिपणें काढून पाहिलीं आणि मदत घेतली तर कोणी नको ह्मणत नाहीं. पण तीं सुद्धां क्षणोक्षणीं काढून पाहीन म्हटलें तरी त्याला शिस्तवार म्हणतात न म्हणतात. खेरीज असें आहे कीं केवळ तोंडी व्याख्यानानें शारीर श्रम देखील सोसणार नाहींत इतके भारी होतात. हे श्रम फार झाले तर मनुष्य दिवसांतून दोन अडीच तास करील.

दुसरें, विद्यार्थ्यांना स्वपरिश्रमा खेरीज प्राप्त झालेलें ज्ञान फार दिवस लाभत नाहीं. जें ज्ञान ते स्वपरिश्रमानें संपादन करितात त्याची थोरवी ते अधिक समजतात, तें त्यांच्या मनांत अधिक ठसतें आणि त्यामुळें उगीच ऐकून झालेल्या ज्ञानापेक्षां त्याचें स्मरण बहुत काळ पर्यंत राहतें. कोणीं म्हटलें आहे, तें खरें आहेः—"विद्यार्थ्यांच्या मनावर संस्कार ह्मणून घडावयाचा तो त्याच्या स्वतःच्या श्रमाच्या ज्ञानापासून होतो; आणि शिक्षकाला आपल्या कामांत सिद्धि कितपत आली याचें माप म्हटलें म्हणजे विद्यार्थ्याला अगदीं दुसऱ्यांचे मदती खेरीज काम करण्याची शक्ति त्यानें किती आणून दिली हें च आहे. खरा शिक्षकाचा धंदा स्वतः ज्ञान देण्याचा नाहीं, परंतु विद्यार्थ्याला ज्ञान संपादन करण्यास योग्य करण्याचा आहे. ज्या कोणत्या ही मार्गानें अभ्यास अधिक पूर्ण, अधिक आल्हादकारक आणि अधिक कायमचा होईल तो मार्ग शिक्षकानें धरला पाहिजे. परंतु शिक्षकानें विद्यार्थ्यांचें काम आपले आंगावर घेऊन त्यांनीं करावयाचें तें आपण करण्यास आरंभ केला ह्मणजे त्यानें त्यांच्या नाशास आरंभ केला असें च म्हणावयाचें."

---

मागील भागांत प्रतिपादन केलेले विषयांत अध्यापनाविषयीं थोडथोडा मजकूर येऊन गेला च आहे. कारण, चांगलें अध्यापन करितां आल्याशिवाय शाळेचा बंदोबस्त कधीं च चांगला राहावयाचा नाहीं; अशा संबंधानें या विषयाचा कांहीं कांहीं उल्लेख वर आला आहे, परंतु या विषयाचें अधिक विवेचन करणें इष्ट आहे.

शाळेसंबंधी फार माहितगार अशा एका ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे कीं, शिक्षकाचे आंगीं खालीं लिहिलेल्या तीन गोष्टी असल्या म्हणजे त्यास उत्तम रीतीनें अध्यापन करितां येतें.

१. मुलांस समजे अशा रीतीनें विषय सोपा करितां येणें.

२. याप्रमाणें विषय सुलभ केल्यानंतर तो युक्तीनें वर्गास शिकवितां येणें.

३ विद्यार्थ्यांचें मन आकर्षण करून घेणें व त्यांची बुद्धि प्रौढ दशेस आणणें.

वास्तविक विचार करून पाहतां या तिन्ही गोष्टींपैकीं प्रथम गोष्ट च मुख्य आहे, कारण ज्या मनुष्याला विषयाचें पृथक्करण करून तो सोपा करितां येतो त्याला तो विद्यार्थ्यांस समजावितां येणें हें कांहीं अवघड नाहीं. कारण, विषय कसा सोपा करावा हें एक वेळ शिक्षकास समजलें म्हणजे विद्यार्थ्यांस काय किंवा इतर मनुष्यांस काय, तो विषय समजावून सांगण्यास दुसरें साधन म्हटलें म्हणजे चांगलें बोलतां येणें, न घाबरणें वगैरे किरकोळ गोष्टी मात्र होत. त्या अधिक उण्या असतील त्याप्रमाणें अधिक उणें यश त्याला येणार आहे. तिसरी गोष्ट अर्थात् या दोहोंच्या पोटांत येते, म्हणजे ज्या मनुष्याला विषय सोपा करितां येतो व सोपा करून मुलांस समजावितां येतो, तो त्यांचें मन सहज च आपणाकडे लावून घेईल. याकरितां या विषयावर बहुतेक सांगण्याच्या गोष्टी पहिले व दुसरे सदराखालीं च येतील.

## १ मुलांस समजे अशा रीतीनें विषय सोपा करितां येणें.

शिक्षकाचे आंगीं मुख्य गोष्ट पाहिजे ती ही कीं, कोणता ही विषय आपण घेतला तर आपण जें म्हणतों तें सर्वांस समजे अशा रीतीनें सुलभ करितां यावें. तसेंच विषय सुलभ करितां येण्यास प्रथम गोष्ट अवश्य ह्मटली ह्मणजे त्याला स्वतः तो विषय चांगला समजला पाहिजे. अगदीं मुळापासून त्या विषयाचा खडानखडा त्यास ठाऊक असल्याशिवाय, तो अतिसुलभ रीतीनें कसा शिकवावा, व त्याच्या सर्व सिद्धांतांची बीजरूप प्रमेयांपासून उपपत्ति कशी करून दाखवावी, हें त्यास समजणार नाहीं. तसें च त्या विषयाचीं सर्व अंगें व त्याचा इतर विषयांशीं संबंध हीं पूर्णपणें माहीत नसलीं तर त्या विषयाचे अ-

भ्यासापासून मुलांचे बुद्धीस जितका संस्कार व्हावा तितका संस्कार त्याचे हातून कधीं ही होणार नाहीं. जर एखादे शिक्षकास जो विषय शिकवावयाचा तो सर्व अवगत नसून, ज्या एक दोन गोष्टी शिकवावयाच्या त्या मात्र त्याला ठाऊक असतील, तर त्याचें शिकविणें चांगलें होणार नाहीं. एका मार्गानें न समजेल तर दुसरे मार्गानें समजूत घालावी, व एक उदाहरण मुलास न समजलें तर दुसरें द्यावें, अशी योजना त्यास कधीं ही करितां येणार नाहीं. त्याला जेवढें ठाऊक आहे तेवढें च तो त्यांस सांगणार; मग त्यावरून त्यांची समजूत होवो अगर न होवो. अशा शिकविणारास दुसरी ही एक मोठी अडचण पडते. कोणत्या ही विषयाच्या दर एक भागाचा दुसरे भागांशीं निकट संबंध असतो व त्या सर्व विषयाचा दुसरे विषयांशीं संबंध असतो. आतां जी गोष्ट विद्यार्थ्यांस शिकवावयाची ती सरासरी समजली तरी तिचा सर्व विषयांशीं काय संबंध आहे हें समजल्याशिवाय ती गोष्ट पुरतेपणीं समजली असें म्हणतां येत नाहीं. व ज्या शिक्षकानें मुळीं च जेवढा धडा शिकवावयाचा तेवढा च वाचला आहे, त्याला या इतर गोष्टी कोठून सांगतां येणार? सारांश जो विषय शिकवावयाचा असेल त्याची पूर्ण माहिती शिक्षकास असून त्याचा इतर विषयांशीं काय संबंध आहे हें ही त्यास माहीत असलें पाहिजे.

ही गोष्ट समजण्याकरितां एक दाखला घेऊन पाहूं. समजा कीं, एक पंतोजी तोंडचे हिशेब शिकवीत आहे. व त्याला तोंडच्या हिशेबाच्या चाली मात्र ठाऊक आहेत, दुसरें कांहींएक ठाऊक नाहीं, तर त्याचे शिकविण्याची तऱ्हा कशी होईल पहा. तो मुलांना कांहीं तरी एक हिशेब घालील, म्हणजे विचारील कीं, १८॥ रु० तोळा, १॥ गुंजेचें काय? जर विद्यार्थ्यांस उत्तर बरोबर देतां न आलें, तर तो सहज सांगेल कीं, जितके रुपये तोळ्यास तितक्यांच्या दुप्पट पै गुंजेस, तेव्हां १८॥ दुणें ३७ पै गुंजेस व दीड गुंजेस ३७ दीडें ५५॥ पै झाल्या; ह्मणजे ४ आणे ७॥ पै हें उत्तर. इतकेंच बोलून शिक्षक दुसरे प्रश्न करूं लागेल, तर त्यानें आपलें काम चालढकलीपुरतें केलें असें च समजलें पाहिजे. ज्याचे मनांत मुलांचा समज वाढावा असें असेल,

तो या उदाहरणावरून लागलें च मुलांस विचारील कीं, रुपया तोळ्याचा दर असेल तर गुंजेस काय बसेल? मुलांनीं दोन पै असें सांगतांच, दीड गुंजेस काय म्हणून तो पुनः विचारील म्हणजे तीन पै असें उत्तर येईल. तीन पै म्हणजे एक पैसा होतो. तेव्हां तोळ्यास जितके रुपये असतील तितके पैसे दीड गुंजेस. दुप्पट पैसे तीन गुंजांस, आणि तितके आणे सहा गुंजांस, याप्रमाणें तो विद्यार्थ्यांचे मनांत आणून देईल व इतकें झाल्यावर अशी रीति बसण्याचें कारण ही सुलभ रीतीनें विद्यार्थ्यांस समजून देईल; तें असें कीं, रुपयाचे पैसे चौसष्ट असतात. व तोळ्याच्या गुंजा ९६ असतात. आतां दीड गुंजेचा एक भाग असे भाग केले तर शहाण्णव गुंजांचे ६४ भाग होतील. कारण, चौसष्ट दीडें शहाण्णव. ह्मणजे रुपयास जितके पैसे आहेत तितके च एक तोळ्यांत दीड दीड गुंजेचे भाग आहेत. तेव्हां अर्थात् जितके रुपये तोळ्यास तितके पैसे दीड गुंजेस झाले च पाहिजेत. विद्यार्थ्यांचे मनावर अध्यापनानें संस्कार व्हावा असें ज्या शिक्षकाचे मनांत वागेल, तो विद्यार्थ्यांस आणखी दुसरें असें विचारील कीं, एक तोळा म्हणजे शहाण्णव गुंजा आहेत. याचे सोळा हिस्से केले तर दरएक हिश्शांत किती गुंजा येतील? विद्यार्थी सहज च सांगेल कीं, सहा. दुसऱ्याकडून तो रुपयाचे सोळा हिस्से केले तर एकेका हिश्शास आणा ह्मणतात असें बोलवील व तिसऱ्यास विचारील कीं, जर रुपयाचा सोळावा हिस्सा आणा आणि तोळ्याचा सोळावा हिस्सा सहा गुंजा, तर रुपया तोळ्याचे भावानें सहा गुंजांचा दाम काय होईल? एक आणा असें सहज च उत्तर येईल. असें उत्तर आल्यावर तो शिक्षक सर्वांस विचारील कीं, तोळ्यावरून सहा गुंजांची किंमत कशी काढावी? या प्रश्नाचें उत्तर घेतल्यावर पुनः दीड गुंज, पाऊण गुंज पावेतों हिस्से बसवून देऊन पांच पंचवीस दाखले देऊन रीति पुरी बसलीशी झाली म्हणजे दुसरी चाल शिकवूं लागेल. केवळ चाल सांगून मुलाकडून त्या चालीप्रमाणें शेंकडों उदाहरणें करून घेणें आणि वर सांगितल्याप्रमाणें सूचक प्रश्न करून मुलांकडून रीति बसविणें यांत जमीन अस्मानीचें अंतर आहे. मुलांचे बुद्धीवर खरा संस्कार व्हावयाचा

तो वर जो दुसरा प्रकार सांगितला, त्यानें मात्र होणार आहे. पहिल्यानें तो उगीच समजल्याशिवाय मजुराप्रमाणें काम करील.

असेंच दुसरें एक उदाहरण घेऊं:—

"अशनिहत शिळातळ जळ रक्त तसें खड्गभग्न तें उर वी।
तृषित घटोत्कचतात प्राशी शोणित न लेश ही उरवी" ॥

ही आर्या शिकवीत असतां कोणी शिक्षकानें विद्यार्थ्यास विचारिलें "वी" हें क्रियापद कोण अर्थी आहे? विद्यार्थ्यानें सहज च आज्ञार्थी असें सांगितलें. मग शिक्षकानें सांगितलें, छे रे, हें क्रियापद येथें आज्ञार्थी नाहीं, स्वार्थी आहे बरें, ध्यानांत ठेव; विद्यार्थ्यानें ध्यानांत ही ठेविलें; तर काय उपयोग? त्याला भाषेचें व व्याकरणाचें ज्ञान करून देण्याचा प्रसंग आला होता, तो गुरुजीनें घालविला असें च म्हटलें पाहिजे. ज्याचे स्वतःचे मनांत व्याकरणाबद्दल चालना झाली आहे व ज्याचे मनांत विद्यार्थी यांचे बुद्धीवर खरा संस्कार घडावा अशी इच्छा जागृत राहिली आहे तो क्रमाक्रमानें विद्यार्थी यांस विचारील कीं, येथें ज्या अर्थी "वी" या शब्दानें कोणास ही आज्ञा केली नाहीं अगर कोणाची ही प्रार्थना केली नाहीं, त्या अर्थी तो आज्ञार्थी तर नाहीं च; परंतु इतकें सांगून तो राहणार नाहीं. तो पुढें विचारील कीं, येथें "तें" उर हा कर्ता आहे तो बदलून स्त्रीलिंगी अगर पुल्लिंगी कर्ता केला असतां वी याचें रूप बदलेल काय? विद्यार्थी थोडा विचार करून नाहीं असें म्हणतील. न झटल्यास उदाहरणें देऊन हुशार पंतोजी रूप बदलत नाहीं अशी त्यांची खातरी करून देईल. नंतर तो त्यांस सामान्यतः ज्यास वर्तमान काळ ह्मणतात त्याचीं उदाहरणें घेऊन असें दाखवील कीं, पुल्लिंगी कर्ता असला म्हणजे क्रियापदाचें 'करितो' असें रूप होतें. स्त्रीलिंगी कर्ता असला म्हणजे 'करिते' असें रूप होतें व त्यावरून पुढें तो असें विचारील कीं, या भेदांवरून तुम्हांस या रूपांत काय अंतर आहे असें वाटतें? या प्रश्नाचें उत्तर विद्यार्थी यांस देतां येणार नाहीं. मग त्यांस विशेषणाचें लिंग वचन विशेष्याप्रमाणें म्हणजे नामाप्रमाणें असावें असा सामान्य नियम अनेक भाषांत असल्याचें सांगून, नंतर करितो, करिती

करतें, हीं विशेषणापासून उत्पन्न झालेलीं शब्दरूपें आहेत; त्याचप्रमाणें केला, केली, केलें हीं देखील शब्दरूपें कृदंत विशेषणापासून झालीं आहेत, असें दाखवील. व संस्कृतादि भाषांत क्रियापदांचीं रूपें कर्त्यांच्या लिंगाप्रमाणें बदलत नाहींत. व त्या क्रियापदांच्या 'करोति' इत्यादि रूपांपासून 'करी' हीं रूपें निष्पन्न झालीं आहेत, असें सांगेल. त्याच वेळेस हल्लीं भाषेंत या रूपाचा रीतिवाचक काळीं मात्र प्रयोग होतो, परंतु प्राचीन लेखांत, व कविसंप्रदायाप्रमाणें सांप्रत ही, त्याचा शुद्ध वर्तमान काळीं प्रयोग दृष्टीस पडतो असें तो उदाहरणांवरून स्पष्ट करून देईल. नंतर दुसरे शब्दांचें व्याकरण करावयास विद्यार्थ्यांस सांगेल. आतां अशा रीतीनें एका च प्रयोगाबद्दल जरी विद्यार्थ्यांस पक्की समजूत करून दिली, तरी त्या प्रयोगापासून जितकें व्याकरणसंबंधीं ज्ञान विद्यार्थ्यांस होईल तितकें शंभर शब्दांचें व्याकरण नुसतें अमक्यास क्रियापद म्हणावें व अमक्यास नाम म्हणावें, असें पोपटपंचीप्रमाणें शिकवून होणार नाहीं.

परंतु ह्या पद्धतीप्रमाणें शिकविण्याकरितां जितका विषय शिकवावयाचा आहे त्याहून सहस्रगुण माहिती शिक्षकास स्वतः पाहिजे. त्याचें ज्ञान पुष्कळ असून त्यास जें ठाऊक आहे तें निश्चितपणें ठाऊक असलें पाहिजे. या प्रकारचें ज्ञान एका विषयाचें म्हटलें तरी आठा चौं रोजांत अथवा दहा बारा रोजांत होणार नाहीं. तें फार श्रमानें संपादन केलें पाहिजे; त्याचा निरंतर ऊहापोह चालून त्याजविषयीं सर्व प्रकारचा संशय नाहींसा होऊन सहज मनुष्यास ठाऊक असणाऱ्या गोष्टींपैकीं च तें एक झालें पाहिजे. त्याची स्मरणानें उपस्थिति करावी न लागतां त्याचे मनाचें अंगभूत च तें झालें पाहिजे. जो विषय शिकवावयाचा त्याची पुरी माहिती प्रथम असावी; नंतर इतर विषयांची माहिती. जितक्या अधिक विषयांची माहिती असेल तितकी चांगली च; परंतु आधीं जो विषय शिकवावयाचा त्याचें पुरतें ज्ञान पाहिजे. शिक्षकानें नेहमीं नवीन ग्रंथ वाचावयाचा पाठ ठेविला पाहिजे. अधिक ज्ञान संपादन केलें नाहीं आणि नित्य येत आहे तें च सांगत गेलें तर येत असेल तें किती दिवस पुरेल ? तें तेव्हां च जुनें होऊन

जाईल व आपला आपल्याला च तें च तें बोलण्याचा कंटाळा येईल. नवीन ग्रंथ वाचतांना तरी जें आपण वाचतों त्याचा आपले कामांत उपयोग कसा होईल इकडे विशेष लक्ष असलें पाहिजे. ज्या मनुष्याचें चित्त नेहमीं शिकविण्याच्या कामाकडे असतें त्याला त्या कामाच्या लागीं अशी माहिती शेंकडों ठिकाणांतून मिळते. जेथून असली माहिती मिळण्याचें कोणाच्या स्वप्नीं ही नसतें, तेथून सुद्धां तो कांहीं ना कांहीं तरी काढील च. उगा च एखादें जुनें वर्तमानपत्र, अगर फाटक्यातुटक्या जुन्या ग्रंथाचें चुकून पडलेलें पान जरी त्याच्या हातीं लागलें तरी त्यांतून देखील एखादी शिकविण्यास उपयुक्त गोष्ट तो उचलील च उचलील. भलतें च कांहीं वाचीत असतां, ही गोष्ट विद्यार्थ्यांस अमुक विषय समजावून देतांना उपयोगीं पडेल, असें त्याच्या ध्यानांत कसें येतें, हें त्याचें त्याला च ठाऊक. तो तेवढी च गोष्ट ध्यानांत ठेवून वेळेस बाहेर काढील. दोन तीन विषय शिक्षकास माहीत असले म्हणजे त्यांचे परस्पर संबंध त्याच्या मनांत सहज येतात आणि ज्या गोष्टींचा परस्पर कांहींएक संबंध नाहीं असें इतरांस वाटतें त्या गोष्टींचा संबंध त्याचे दृष्टीस पडतो त्यामुळें त्याला कोणती ही माहिती आपले कामाचे उपयोगीं पडत नाहीं असें घडत च नाहीं.

शिक्षकानें पुष्कळ विषयांचा अभ्यास करावा म्हणून वर सांगितलें त्या संबंधानें एक गोष्ट विशेषेंकरून लक्षांत ठेवण्यासारखी आहे; ती ही. नानातऱ्हेचे ग्रन्थ व विषय वाचले तरी शिक्षकानें ते सर्व वाचतांना, विद्यार्थ्यांचे मनांत विषय उत्तम रीतीनें भरवून देण्याचें जें आपलें काम, त्याजकडे चित्त ठेविलें पाहिजे. स्वतः शिक्षक किती जरी विद्वान् असला तरी, विद्यार्थ्याला त्यापासून लाभ, जितकें हा त्यांच्या समजुतीसारखें सांगेल, तितक्यापुरता च होणार आहे. एवढें च नव्हे, परंतु फार अभ्यास करणारे शिक्षकांत एक विशेष दोष त्याचे अभ्यासामुळें च कधीं कधीं उत्पन्न होतो. तो हा. आधीं च शिक्षक पोक्त व पढीक असल्यामुळें अज्ञान व जड मुलांच्या आणि त्याच्या समजुतींत फार अंतर असतें, तें कमी करण्याची शक्ति जसजशी मनुष्याच्या आंगीं अधिक तसतशी त्याची शिक्षकपणाची योग्यता अधिक होय. हें

अंतर कितीएक असावध शिक्षक अभ्यासामुळें वाढूं देतात. तसें झाल्यानें त्या शिक्षकांची विद्वत्ता किती ही जरी वाढली तरी त्या च मानानें त्यांचा शिक्षकपणाचा गुण वाढला असें ह्मणतां येणार नाहीं, इतकें च नव्हे, पण जर तो विशेष गहन शास्त्रांच्या अभ्यासांत अतिनिमग्न होऊन त्या योगें मुलांच्या अज्ञानाबद्दल त्यांचा तिरस्कार करूं लागेल, व त्यांचे स्थानीं आपण आहों असें मनांत आणून त्यांच्या विषय समजून घेण्याच्या कामांतल्या अडचणी त्यानें मनांत आणाव्या त्या त्याच्या मनांत येईनातशा होतील, तर त्याची विद्वत्ता त्याचे शिक्षणाचे कामास घातक झाली असें च समजलें पाहिजे. कारण असला मनुष्य नेहमीं शिकवितां शिकवितां त्रासून जाईल; व मुलांनीं काढलेल्या शंकांपासून त्याला उल्हास न होतां आपले विद्वत्तेचे घमंडींत तो त्यांचा उपहास करील; आणि असल्या शंका ऐकणें हें आपलें पाप आहे असें वाटून त्याचा स्वभाव बिघडून जाईल. याकरितां शिक्षकानें कांहीं वाचीत असलें तरी आपले मुख्य कामाकडे नेहमीं चित्त ठेविलें पाहिजे. आपली बुद्धि प्रगल्भदशेस यावी, व सर्व विषय आपणास पूर्णपणें यावे, म्हणजे सहज च आपणापासून विद्यार्थ्यांस अधिक लाभ होईल, हें ध्यानांत आणून शिक्षकानें नेहमीं आपला अभ्यास वाढविला च पाहिजे. परंतु त्यांत देखील आपले मुख्य कर्माकडे लक्ष ठेविलें तर च त्या विद्वत्तेचा अध्यापनास उपयोग घडणार आहे, हें अभ्यास करितांना ध्यानांत ठेविलें पाहिजे.

या च संबंधानें लोक दोन प्रकारच्या चुक्या करितात, त्यांजकडे लक्ष दिलें पाहिजे. कितीएक लोकांची अशी समजूत असते कीं शिक्षणपद्धति आली म्हणजे सर्व झालें. शिक्षकाचे कामाचें मूळ शिक्षणपद्धति होय. तेवढी तयार असली म्हणजे विषय शिकवितां येईल. ही चुकी अगदीं च अल्पवयी व अडाणी उमेदवार मात्र करतात. ज्यांना बरी च समजूत आहे ते कधीं अशी चुकी करीत नाहींत. एका लहानशा दाखल्यावरून ही गोष्ट सहज ध्यानांत येईल. पद्धति ही मोट, नाडा, चाक वगैरे सामानांप्रमाणें आहे, व ग्रंथादिकांचें ज्ञान हें पाण्याप्रमाणें आहे. मोटनाडा उत्तम असला व सर्व तयारी यथास्थित केली,

परंतु विहिरींत पाणी मात्र नाहीं तर त्या मोटनाड्याचा काय उपयोग? विहिरींत पाणी पुष्कळ आहे, पण मोटनाडा नाहीं असें असलें तर एखादे वेळेस कांहीं धोतर, पागोटें वगैरे सोडून कांहीं ना कांहीं तरी पाणी वर येईल. पण अगदीं च साधन नसलें तर मात्र कांहीं च येणार नाहीं. म्हणजे शिक्षकांस वाचा च नसली तर कांहीं च उपयोग होणार नाहीं; परंतु जर विहिरींत पाणी आहे तर, जसें साधनाच्या मगदुराप्रमाणें थोड्या बहुत माणसांस गरजेपुरतें किंवा पोटभर पाणी मिळेल, त्याप्रमाणें शिक्षक विद्वान् असल्यास मुलांस कांहीं ना कांहीं तरी लाभ होईल च. परंतु त्यास कांहीं च येत नसलें तर शिक्षणपद्धति काय करील? याकरितां उमेदवारांनीं नेहमीं ज्ञान आणि पद्धति यांचा हा परस्परसंबंध ध्यानांत ठेविला पाहिजे. या च तोडीची दुसरी चूक आहे. ती ही. "अमुक विषय आठ रोजांत तयार करूं; त्यांत काय आहे? दोन तीनदां एक एक ग्रंथ वाचला म्हणजे झालें." असें फार लोक म्हणतात व त्याप्रमाणें वाचावयास आरंभ ही करितात. असे विद्यार्थी बहुतकरून वाचण्याकडे जो काळ गेला तो सत्कारणीं लागला असें समजतात. "कसें ही असो, मराठी सहावें पुस्तक दोनदां वाचलें एवढा तर फायदा झाला," असें ते आपले मनाशीं म्हणत असतात; पण ही मोठी चूक आहे. हा काळ कारणीं लागला नाहीं; आपलें व दुसऱ्याचें समूळ नुकसान करण्याकडे लागला, असें पक्कें समजावें. ही एक वेळ अभ्यासाचे ग्रंथ भरडून टाकण्याची संवय लागली म्हणजे जन्माचें अकल्याण झालें असें समजावें. पुनः चित्त स्वस्थ रीतीनें अवघड विषयांवर कधीं लागावयाचें नाहीं. व हा दोष एक वेळ उत्पन्न जाहला म्हणजे त्या मनुष्यास कोणते ही विषयाचें पद्धतवार ज्ञान होणें अशक्य आहे. मनुष्याचें ज्ञान, थोडें कां होईना, पण तें पक्कें असावें. शिक्षकास तर ही गोष्ट विशेषेंकरून लागू आहे; कारण, जेथें दुसऱ्यास संशय तेथें दुसरे याला विचारणार, तेव्हां याला जी माहिती असणें ती पक्की च असली पाहिजे. त्यांत चलबिचल बिलकूल उपयोगीं नाहीं. मोरोपंताच्या शंभर च आर्या कां होईनात, पण त्या अशा व्हाव्या कीं, त्यांतील पदापदाचें व्याकरण, दरएक विशेषणाचा असेल तेथें

हेतुहेतुमद्भाव, दरएक समास, दरएक अलंकार, दरएक प्रकरणाचा रस, दरएक प्रयोगाची रचना, व त्यांतील विशेष, हे सर्व पूर्णपणें समजावे व तसा बराबर अर्थ गद्यांत उभा करितां यावा. अशा शंभर आर्या सगळा ग्रंथ भरडून टाकल्यापेक्षां शंभरपट बऱ्या; इतकें च नव्हे, पण परीक्षेच्या प्रसंगीं देखील काव्याचे अर्थान्वयादि सांगतांना या रीतीचा व्यासंग जसा उपयोगीं पडेल, तशीं फुकट ओढीत नेलेलीं दहापांच आख्यानें देखील उपयोगीं पडणार नाहींत. तात्पर्य, विषय शिकवावयाचा त्याचीं आंगें पृथक् पृथक् करितां येण्यासाठीं शिक्षकास स्वतः विषय उत्तम आला पाहिजे; एकाहून अधिक विषयांचें त्याला ज्ञान पाहिजे; त्यानें नवीन ज्ञान संपादन करण्याचा क्रम नेहमीं चालू ठेविला पाहिजे आणि आपल्या स्वतःच्या व्यासंगाचे वेळेस सुद्धां, विषय स्फुट करण्याचें सामर्थ्य जसजसें आपले आंगीं विशेष येईल तसतसा अधिक उपयोग आहे, ही बुद्धि मनांत नेहमीं जागरूक ठेविली पाहिजे.

शिक्षकाचे आंगीं दुसरा गुण असला पाहिजे म्हणून सांगितलें तो मुलांस सहज समजे अशा रीतीनें विषयाचे भाग करून ते मुलांस दाखविण्याचें चातुर्य, हा होय. हा गुण विशेषेंकरून शिक्षकाचे उपयोगीं आहे आणि तो संपादन करण्याचें काम तरी शिक्षकाला मात्र साधण्याजोगें आहे. कोणत्याही गोष्टीचें ज्ञान शिकून होईल, पण काम करण्याची हुशारी जातीनें पुष्कळ काळ काम केल्याशिवाय येत नाहीं. शिक्षणपद्धतीवर शेंकडों ग्रन्थ वाचा अथवा व्याख्यानें ऐका, पण शिकवावयाला येणें तें प्रत्यक्ष शिकवूं लागल्याशिवाय कधीं येणार नाहीं, इतकेंच नव्हे, पण बरे च दिवस अभ्यास झाल्याखेरीज उत्तम रीतीनें शिकविण्याचें तर नांव च नको. कोणी कोणी असें ह्मणतात कीं, शिकविण्याचा गुण आंगचा च पाहिजे. तो तसा असल्याशिवाय कोणास ही चांगलें शिकवितां येणार नाहीं. ही गोष्ट कांहीं अंशीं खरी आहे. उत्तम शिक्षक तयार होण्यास मूळचा अंकुर पाहिजे. कांहीं मनुष्यांचे आंगीं स्वाभाविक च असे गुण असतात कीं, तेणेंकरून त्यांस शिक्षणाचे कामांत फार उपयोग व्हावा. मुलांशीं मन मिळून राहण्याचा

धर्म, नेहमीं मुलांसारखी उल्हासवृत्ति, वेळेवर दाखले सुचणें, साधी पण रसाळ आणि मनावर ठसण्यासारखी वाणी, इत्यादि गुण कितीएक मनुष्यांत सहज असतात. अशा लोकांस शिकविण्याची हौस ही असते. अशा मनुष्यानें परिश्रम केले असतां तो उत्तम शिक्षक होईल. व ज्याचे आंगीं हे गुण नाहींत त्याच्यानें कांहीं केल्यानें देखील याची बरोबरी होणार नाहीं, यांत संशय नाहीं. परंतु इतके सारे गुण जन्मत: नसले तर कोणाला ही शिक्षकाचें काम नीट करितां येणार नाहीं हें म्हणणें बरोबर नाहीं. निश्चयानें आणि व्यासंगानें काय साधणार नाहीं? "निश्चयाचें बळ तें च फळ" ही वाणी वृथा नाहीं. मनुष्याच्या हातून होण्यासारख्या कोणत्या ही गोष्टीला हात घालून भक्तिपूर्वक व दृढ निश्चयानें श्रम केले तर मध्यम तरी फळ आल्याशिवाय राहणार नाहीं. ज्या मनुष्याला नीट रीतीनें वर्णोच्चार करितां येतो व ज्याला चार माणसांप्रमाणें ऐकावयास येतें, अशा कोणत्या ही मनुष्यानें शिक्षणकला संपादन करण्याचा निश्चय केला आणि त्याप्रमाणें या कामावर दुसऱ्यांनीं अनुभव घेऊन लिहून ठेवलेले ग्रन्थ जपून वाचले, आपण स्वत: लक्षपूर्वक काम केलें, आणि दुसऱ्याच्या व आपल्या अनुभवाशीं वारंवार पडताळा घालून पाहिला; जे जे शिक्षणक्रम लोकांनीं चांगले म्हणून वर्णिले आहेत त्यांचा परिचय घेऊन त्यांत कम जास्त करून आपले कामीं लावलें, तर अशा मनुष्याला यश आल्याखेरीज कधीं राहणार नाहीं. ज्याला शिकविण्याचा स्वाभाविक अंकुर असून ज्यानें परिश्रम केले आहेत त्याच्या इतका चांगला शिक्षक तो न होवो, परंतु आपले कामापुरता चांगला होईल यांत काडीमात्र संशय नाहीं.

मुलांला समजे अशा रीतीनें विषय शिकवितां येण्यास मूळ गोष्ट अवश्य आहे ती ही कीं, मुलांचें मन शिक्षकास बरोबर समजावें. कांहीं प्रश्न विचारला आणि मुलानें उत्तर नीट न दिलें, तर ती चुकी कशी झाली व असें उत्तर येण्याला मुलाची गैरसमजूत कोठें झाली हें बरोबर समजलें पाहिजे. हें मुलांचें मन समजण्याचें सामर्थ्य शिक्षकांचे आंगीं अवश्य पाहिजे. म्हणून पूर्वीं शिक्षण प्रकरणांत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें अध्यापनाचे कामांतही हें सामर्थ्य

अवश्य च होय. कारण मुलांचे ठिकाणीं आपण आहों, असें समजण्याचा मनुष्यास एक वेळ अभ्यास चांगला झाला म्हणजे तेणेंकरून मुलांकडून अमुक गोष्ट कशी करवावी किंवा कशी होऊं न द्यावी इतकें च त्याला साधतें असें नाहीं, तर त्या बरोबर च त्यांला विषय कसा समजवून द्यावा व त्यांच्या समजुतींप्रमाणें त्यांस एकामागून एक प्रश्न कसे करावे, हें ही समजूं लागतें. दुसरें असें आहे कीं, ही समजूत मनांत धरून शिक्षक काम करूं लागला म्हणजे त्याला आपले कामाचा कंटाळा येत नाहीं, त्यास शिकविण्याची गोडी लागते, व त्याचें आणि विद्यार्थ्यांचें एक चित्त होऊन जातें. तेणेंकरून कामांत आळस बिलकूल होत नाहीं आणि मन इतर गोष्टींकडे काडी मात्र सुद्धां जात नाहीं. अर्थात् या प्रकारें चाललेलें शिक्षण उत्साहपूर्वक होत आहे हें कोणाचे ही सहज च ध्यानांत येणार आहे.

विद्यार्थ्यांचे मनांतले विचार ओळखून कसें शिकवावें याबद्दल एक दोन दाखले देऊन हा विषय स्पष्ट केला पाहिजे. गणितांचीं उदाहरणें चाललीं ह्मणजे बहुतकरून या कामांत हयगय होते. वीस पंचवीस मुलांना एकदम उदाहरण घालतात; आणि पाट्या पडल्या ह्मणजे एकदम बराबर कोण आणि चुकले कोण याची निवड करून दुसरें उदाहरण घालतात. एखाद्या पंतोजीला शिकवावयाची हौस असली तर तो उदाहरण करून दाखवितो; पण तेवढ्यानें मुलांचें समाधान होत नाहीं. मुलगा जड असला तर त्याला पंतोजीनें केलेलें बराबर आहे इतकें समजलें तरी आपलें कां चुकलें हें समजत नाहीं आणि मनांत तशी च खुरखुर राहून जाते. पंतोजीनें उदाहरण घातलें:—

"एका व्यापाऱ्यानें १०० रुपयांस ५ पल्ले गूळ खरेदी करून त्यांपैकीं एक पल्ला गूळ घरखर्चास ठेविला, व बाकीचा १०० रुपयांस विकून टाकिला. तर ह्या व्यापारांत शेंकडा नफा किती झाला"? विद्यार्थ्यांनीं उत्तर दिलें, "२० रुपये." पुढें पंतोजीनें त्यांस चुकलां म्हणून सांगून आपण उदाहरण करून दाखविलें. त्यांत प्रथम विकलेल्या ४ पल्ले गुळाची खरेदी ८० रुपये काढून नंतर ८० रु० ख० : १०० रु० ख० :: १०० रु० वि० किती रुपये विक्री? असें त्रैराशिक

मांडून आलेल्या १२५ रुपयांतून खरेदीचे १०० रुपये वजा केले, आणि बाकी राहिलेले २५ हा शेंकडा नफा असें उत्तर आणून दिलें. इतक्यानें कदाचित् चाणाक्ष विद्यार्थ्यांची समजूत होईल. पण बाकीच्या विद्यार्थ्यांच्या मनांत खुरखुर राहील. यासाठीं सर्व मुलांच्या मनाची खात्री करून देणें असेल तर पंतोजीनें मनांत असें आणलें पाहिजे कीं या मुलांनीं २० रुपये असें उत्तर दिलें, या चुकीचें बीज काय? इकडे लक्ष पोहोंचतां च त्याच्या ध्यानांत येईल कीं घरखर्चाकरितां ठेविलेला जो गूळ नफ्यांत पडला, त्याची किंमत मुलांनीं खरेदीच्या दरानें केल्यामुळें त्यांचें उत्तर चुकलें. इतकें ध्यानांत आल्यावर "घरखर्चाकरितां ठेविलेला गूळ त्या व्यापाऱ्यानें विकला असता तर त्यास वीस च रुपये नफा झाला असता का?" असा सूचक प्रश्न मुलांस विचारला तर लागलींच त्यांची चुकी त्यांच्या ध्यानांत येऊन "आपण कोठें चुकलों काय कीं" ही खुरखुर त्यांच्या मनांतून निघून जाईल. आणि असलीं दुसरीं उदाहरणें ही त्यांस करितां येतील.

---

१ "तीन वाजल्यानंतर अवरकांटा आणि मिनिटकांटा सरळरेषेंत प्रथम केव्हां येतील"? विद्यार्थ्यानें उत्तर दिलें. "पावणेचार वाजतां." पुढें पंतोजीनें त्याला चुकलास ह्मणून सांगून आपण उदाहरण करून दाखविलें. त्यांत आरंभीं एक मिनिटांत मिनिटकांटा एक $= \frac{१२}{१२}$ घरें जातो असें सांगितलें; पुढें अवरकांटा $\frac{१}{१२}$ घर जातो असें सांगून दोहोंची वजाबाकी करून $\frac{११}{१२} : ४५ :: १ : \frac{५४०}{११}$ असें प्रमाण मांडून $४९\frac{१}{११}$ मिनिटें उत्तर आणून दिलें. इतक्यानें कदाचित् विद्यार्थी आठवणीचा धड असला तर पुनः तसलें उदाहरण दिलें तर चुकणार नाहीं. पण एवढ्यानें काम झालें असें समजूं नये. मुलांचे मनाची खातरी करून देणें असेल तर पंतोजीनें मनांत असें आणलें पाहिजे कीं या मुलानें पाऊण तास असें उत्तर दिलें, या चुकीचें बीज काय? इकडे लक्ष पोहोंचतां च त्याच्या ध्यानांत येईल कीं मुलानें मिनिटकांटा चालते वेळेस अवरकांटा जेथला तेथें च राहील अशी खोटी कल्पना केली, त्यामुळें त्याचें उत्तर चुकलें. इतकें ध्यानांत आल्यावर, "तोंपर्यंत अवरकांटा तेथें च राहील काय? असा सूचक प्रश्न

"गेला लोकान्तरातें दिनकर अवघ्या भासवी जो जगातें," याचा अर्थ सांगते वेळेस एके विद्यार्थ्यानें सांगितलें 'जो सूर्य सर्व लोकांना विचार करावयास लावतो तो लोकांपासून दूर अंतरावर गेला.' आतां हा अर्थ बराबर नाहीं, खरा अर्थ "सर्व जगाला प्रकाशित करणारा जो सूर्य तो दुसऱ्या लोकाला गेला" हा आहे, एवढें च त्याला सांगितल्यानें काम झालें असें नाहीं. विद्यार्थ्यांचे मनांत "विचार करावयास लावतो" हा अर्थ "भासवी" या पदापासून कसा आला, हें शिक्षकास समजलें पाहिजे. भासणें म्हणजे वाटणें असा प्रयोग असतो त्यावरून प्रयोज्यार्थीं प्रयोग होऊन तो अर्थ निष्पन्न होईल हें जाणून, भासणें याचा वाटणें हा अर्थ लाक्षणिक आहे, त्याचा मूळचा अर्थ दृष्टिगोचर होणें, शोभणें, दैदीप्यमान असणें असा आहे; इतकें विद्यार्थ्यास सांगितलें पाहिजे, म्हणजे त्याचें समाधान होतें. त्या च प्रमाणें अन्तर शब्दाचा प्रयोग संस्कृतांत कसा होतो हें ठाऊक नसल्यामुळें दुसरी चुकी झाली. ती ही, देशान्तर, जन्मान्तर, कालान्तर इत्यादि उदाहरणें सांगून त्यांतील अन्तर शब्दाचा अर्थ आणि सामान्यतः अंतर ह्मणजे भेद अथवा दोन पदार्थांचे मधील अवकाश हा अर्थ, यांतील भेद स्पष्ट करून, विद्यार्थ्यास समजवून सांगावा. याप्रमाणें शिकविणारानें आपले अंतःकरणांतील आशय ओळखला, अशी विद्यार्थ्यांची खातरी झाली म्हणजे त्यांचें समाधान होतें एवढें च नाहीं पण तो ओळखल्यानें खरी गोष्ट त्या विद्यार्थ्यांचे मनांत कशी ठसवावी हें शिक्षकांस उत्तम कळतें.

---

विद्यार्थ्यास विचारला तर लागलीं च त्याची चुकी त्याच्या ध्यनांत येऊन दोन्ही कांटे चालतात च, तेव्हां दोघांच्या गतींचें अंतर काढून मग प्रथम मिनिटकांटा अवरकांट्यामागें १५ मिनिटांचीं घरें आहे, त्याला अवरकांट्याचे पुढें तीस मिनिटांचीं घरें जाण्याला एकंदर किती घरें जावें लागेल तें प्रमाणानें काढावें असें सहज सुचेल." हें उदाहरण पहिल्या आवृत्तींतलें. त्याहून अधिक योग्य म्हणून रा० सा० विष्णु बाळकृष्ण सोहनी यांनीं कृपा करून सांगितलेलें हल्लीं त्याचे बदली घातलें आहे.

## २ विषय सुलभ केल्यानंतर तो युक्तीनें वर्गास शिकवितां येणें.

**विद्यार्थ्यानें दिलेलें उत्तर सरासरी बराबर असलें तर तें लक्षपूर्वक ऐकून घेऊन सुधारावें.** जो विद्यार्थी इतपत उत्तर देत आहे त्याचे मनांत त्या उत्तराबद्दल विचार चालला आहे यांत संशय नाहीं. पुष्कळदां असें घडतें कीं मुलाला शब्द माहित नसतात, किंवा वाक्य कसें जुळावें हें कळत नाहीं; त्यामुळें त्यांना उत्तर चांगलें देतां येत नाहीं. अशा वेळेस शिक्षकानें मदत केली तर फार उपयोग होतो. मुलाचें बोलणें ऐकलें न ऐकलेंसें केलें म्हणजे त्याचा हिरमोड होतो. यासाठीं तसें न करतां मुलाचे उत्तरांत कांहीं तथ्यांश असला तर तेवढ्यापुरतें त्याला बरें म्हणून मग उत्तरांत जी कसर राहिली असेल ती पुनः दुसरा प्रश्न विचारून काढून टाकावी. पदार्थांच्या किंमतीविषयीं विचार वर्गांत चालू असतांना विद्यार्थ्यांस शिक्षकानें विचारलें कीं वस्तूस किंमत कशानें येते. विद्यार्थ्यांपैकीं कोणी च कांहीं वेळपर्यंत बोलला नाहीं. कांहीं वेळानें विद्यार्थ्यानें उत्तर दिलें कीं कोणते ही पदार्थाचे आंगीं उपयोगी पडण्याचा गुण असला म्हणजे तेणेंकरून त्याला किंमत येते. आतां सर्व किंवा बऱ्या च किंमतदार वस्तूंत हा गुण असतो इतकें ज्या विद्यार्थ्यानें विचार करून शोधून काढलें त्याचा 'छत्; असें नाहीं' असें म्हणून हिरमोड करूं नये. तर त्याचें ऐकून घेऊन म्हणावें "बरें, वस्तु उपयोगी असल्या शिवाय किंमत कोण देईल? तेव्हां उपयोगी वस्तूस मात्र किंमत येईल हें खरें च आहे." नंतर असें विचारावें कीं 'अति उपयोगी अशा सर्व वस्तूंस किंमत असते काय' ह्मणजे तो अगर दुसरा कोणी विद्यार्थी अंमळ विचार करून सांगेल कीं हवा, उजेड, वगैरे जिनसा फार उपयोगी आहेत परंतु त्यांना किंमत कोणी देत नाहीं व कोणी घेत नाहीं. इतकें सर्व मुलांस समजल्यावर पाण्यास कोठें कोठें किंमत असते व कोठें कोठें नसते असें उदाहरणें देऊन दाखवावें. इतकें झाल्यावर ज्यानें पूर्वी उत्तर दिलें होतें त्या च विद्यार्थ्यास, तर मग वस्तूस किंमत केव्हां येते म्हणून पुनः विचारावें. मग तो सांगेल कीं ज्या उपयोगी

वस्तूंचा संचय करतां येतो व ज्यांचा उपभोग संचय करणाराच्या परवानगीशिवाय दुसऱ्याला करतां येत नाहीं, त्या वस्तूंला किंमत येते. मग पुनः उपयोगी वस्तूंमध्यें सुंदर दिसणाऱ्या वगैरे वस्तूंचा सुद्धां समावेश होतो असे हिरे, मोतीं इत्यादि जिनसांचे दाखले घेऊन सांगावे.

लहान मुलांस शिकवीत असतांना, 'सत्य जोडा अहर्निश' हें वाक्य आलें आणि अहर्निश म्हणजे काय ह्मणून विचारलें व एखाद्या विद्यार्थ्याला 'पळाली निशा' यांतील निशा शब्दाचें स्मरण होऊन तो अहर्निश म्हणजे रात्री म्हणाला तर त्याचा अगदीं च तिरस्कार करूं नये; तेवढ्यापुरतें च त्याला बरें म्हणून समजावून सांगावें कीं, खरें, निशा म्हणजे रात्र पण अहर् म्हणजे काय? मग कोणी तरी अजमासानें निशा म्हणजे रात्र तेव्हां अहर् म्हणजे दिवस असें कदाचित् सांगेल; न सांगेल तर आपण सांगावें; परंतु ज्या मुलानें निशा शब्दाच्या अर्थावर लक्ष देऊन रात्र ह्मणून अर्थ सांगितला त्याला थोडीशी शाबासकी दिल्यासारखें करून मग सगळ्या शब्दाचा अर्थ समजावून सांगण्यास आरंभ करावा; असें केल्यानें मुलांना स्वतः विचार करण्याची संवय लागते.

**कोणतें ही उत्तर कां अशुद्ध आहे तें सांगितलें पाहिजे.** केवळ चुकी काढली म्हणजे काम झालें असें नाहीं. उत्तर कां अशुद्ध आहे हें मुलांस समजावूं लागलें म्हणजे त्यांची विचारशक्ति वाढते आणि शिकविणाराचे मनांत काय आहे तें त्यांला बराबर समजतें. जो विषय चालला असेल त्याजवर त्यांचें चित्त लागतें आणि सांगितलेली गोष्ट त्यांचे मनांत पक्की ठसते. एके ग्रन्थकारानें म्हटलें आहे "शिक्षकानें कसें शिकविलें याची परीक्षा मुलांच्या ध्यानांत किती राहिलें यावरून च करावी; आणि शिक्षक किती चांगला आहे याची परीक्षा करणें असेल तर त्याचे विद्यार्थ्यांस कोणते ही गोष्टीकडे कितपत लक्ष देतां येतें, यावरून करावी." शिकवितांना विद्यार्थ्यांची चुकी कोठें आहे हें त्यांला शोधावयास लाविलें म्हणजे त्यांला विचार करावा लागतो. मग विद्यार्थ्यांचें लक्ष त्या विषयावर पोंहचून तेथें ठरतें. आणि ज्या गोष्टी आपल्या पूर्वींच्या ज्ञानापासून उत्पन्न होतात किंवा त्यांशीं कांहीं संबंधानें जोडलेल्या असतात, व ज्यांची माहिती

विद्यार्थ्यांस आपले स्वतःचे श्रमानें होते, त्या त्यांच्या पक्क्या ध्यानांत राहतात व ते कधीं ही विसरत नाहींत.

कितीएक शिक्षकांची अशी वहिवाट असते कीं, आपण जो प्रश्न विचारावयाचा त्याचें उत्तर आधीं मनांत योजून ठेवावयाचें आणि जेव्हां शब्दशः तसें च उत्तर विद्यार्थ्यांचे तोंडांतून निघेल, तेव्हां च पसंत करावयाचें; दुसरे कोणते ही रीतीनें त्यानें उत्तर दिलें तरी तें कबूल करावयाचें नाहीं. हें केल्यानें मुलाला अन्याय झालासा वाटतो आणि शिक्षकाचें ही वाईट होतें. कारण मुलगा दुसऱ्या रीतीनें बोलला म्हणून काय झालें; कदाचित् त्याचें उत्तर शिक्षकानें योजिलेल्या उत्तराप्रमाणें च समर्पक असून त्याहून स्पष्ट व सुलभ असेल. तेव्हां अर्थात् मुलाचा विनाकारण अनादर केला असें होणार. दुसरें असें कीं, त्याचें उत्तर बरोबर नाहीं असें सांगून शिक्षकानें आपलें स्वतःचें उत्तर सांगितलें आणि त्यांत कांहीं विशेष अंतर नसलें म्हणजे विद्यार्थी सहज म्हणणार, "मग, मीं असें च नव्हतें कां म्हटलें ?" असें च वारंवार मुलांचे मनांत आलें म्हणजे त्यांची शिक्षकाविषयीं पूज्यबुद्धि बिघडते आणि तो कुरठ्या मनाचा होतो. कारण मुलांना काय आणि मोठ्यांना काय, आपल्या मेहनतीचें व हुशारीचें फळ आपणांस मिळावें असें सहज वाटतें आणि जो तें त्यांस मिळूं देत नाहीं तो अर्थात् त्यांना आवडत नाहींसा होतो.

असा दुराग्रह न धरतां विद्यार्थी जें उत्तर देईल तें च उचलून घेऊन पुढें काम चालविण्यांत आणखी एक मोठा उपयोग आहे. तो असा कीं विद्यार्थ्यांना जें येत आहे त्याची व जें त्यांना नवीन सांगावयाचें आहे त्याची बराबर सांगड घालतां येते. या गोष्टीकडे शिक्षकानें नेहमीं लक्ष पुरविलें पाहिजे. विद्यार्थ्यांकडून मेहनत करवून, हरएक गोष्ट त्यांजकडून शोधून काढवावी. अगदीं तयार असें त्यांना कांहींएक सांगूं नये. असें करण्यांत कितीएक फायदे आहेत. एक तर जी माहिती आपले पूर्वींचे माहितीशीं कांहीं संबंधानें जोडलेली असते ती ध्यानांत बरी राहते. दुसरें मुलांना स्वतः उगीच बसून ऐकणें आवडत नाहीं. त्यांच्या मनाला नेहमीं कांहीं तरी व्यवसाय असावा, म्हणजे त्यांना ठीक वाटतें. खेरीज आपले श्रमानें संपादन केलेल्या ज्ञानाचें

मुलांना मोठें महत्त्व वाटतें. तें त्यांचे चित्तावर चांगलें ठसतें आणि लवकर विसरत नाहीं. विद्यार्थ्यांकडून काम घेतल्यानें त्याला नवीन विषय स्वतः शिकणें झाल्यास कसा शिकावा हें कळूं लागतें. तात्पर्य, या कृतीनें मुलें आपलीं आपण च ज्ञान संपादन करताहेत असें होतें. पंतोजीस त्यांजकरितां थोडें च करावें लागतें.

विद्यार्थ्यांना आपल्याला काय येतें हें दाखवावयाची मोठी हौस असते. कांहीं तरी एक मुद्दा काढून त्यावर शिक्षक लांब लांब चऱ्हाट वळूं लागला ह्मणजे मुलें कंटाळतात आणि जड होतात. इतक्यांत त्या शिक्षकाला त्या मुद्याविषयीं, तुला काय ठाऊक आहे, ह्मणून एका विद्यार्थ्याला विचारूं द्या, (त्या विषयाची थोडीशी तरी माहिती मुलाला आगाऊ असावी मात्र) किंवा वर्गांत त्याबद्दल कोणाला कांहीं ठाऊक आहे कां, म्हणून विचारूं द्या कीं लागलीं च एके क्षणांत मुलांचा सगळा आळस जाऊन त्यांना हुशारी येईल. दर एकाला वाटत असतें कीं दुसऱ्यापेक्षां आपल्याला जें अधिक सुचलें असेल तें दाखवावें. वर्गांत अशी तरतरी आणि असें विषयाकडे चित्त असणें हें फार उपयोगाचें आहे. शिकविण्याचा विषय असतो त्यापेक्षां देखील याचा उपयोग अधिक आहे. शिकविलेला विषय आज नाहीं उद्यां मुलें विसरून जाणार. परंतु ही विषयाकडे लक्ष देण्याची आणि त्यांत आपण होऊन गति करण्याची जी सवय विद्यार्थ्यांस लागेल ती लवकर जाणार नाहीं. आणि क्रमाक्रमानें आपण विद्यार्थ्यांस जें साहाय्य द्यावयाचें तें कमी कमी करीत गेलें असतां, ही सवय फार उत्तम प्रकारची होणार आहे. एके मोठे हुशार शाळा तपासणारानें ह्मटलें आहे, "वास्तविक पाहतां मुलाचे मनावर खरा संस्कार व्हावयाचा तो त्याचे स्वतःचे श्रमापासून च उत्पन्न होतो. आणि जसजसा शिक्षक विद्यार्थ्यांमध्यें, दुसऱ्याचें साहाय्य मुळींच घेतल्याशिवाय, स्वतः श्रम करण्याची सवय उत्पन्न करील, तसतसें त्याचें काम चांगलें होत आहे असें मानलें पाहिजे. शिक्षकांचें मुख्य काम मुलांला विषय सांगणें हें नाहीं, तर स्वतः शिकावें कसें हें त्यांना शिकविण्याचें आहे. या रीतीनें स्वतः विषय शिकण्याचा त्यांजकडून प्रयत्न करवितांना त्यांना

मौज वाटावी, जें त्यांना ज्ञान होईल तें त्यांचे मनांत पक्कें ठसावें, आणि त्यांत कांहीं उणीव राहूं नये, ह्मणून पंतोजीनें योग्य स्थळीं मदत दिली च पाहिजे; परंतु जें काम त्यांनीं स्वतः केलें पाहिजे तें पंतोजी आपण होऊन त्यांना करून देऊं लागला व त्यांनीं, मदतीशिवाय जें केलें पाहिजे तें करतांना मदत देऊं लागला, ह्मणजे उभयतांच्या घातास आरंभ झाला असें समजावें." प्रथम सांगितलें आहे कीं मुलांना होईल तितकी थोडी मदत द्यावी आणि होईल तेथवर सर्व काम त्यांजकडून करून घ्यावें, त्याचा आणि वर उतारा घेतला आहे त्याचा सारांश एक च आहे. हा च सिद्धांत **"आर्नोल्ड् साहेबांचें चरित्र."** या ग्रंथांत एके ठिकाणीं उत्तम रीतीनें सांगितला आहे आणि त्यांत या संबंधीं दुसरे ही कांहीं विषय स्पष्ट होतील असा मजकूर आहे, त्याचा सारांश खालीं घेतला आहे.

"**आर्नोल्ड्** साहेबांचे मनाचा पूर्ण सिद्धांत असे कीं, मुलांना ज्ञान प्राप्त करून देणें हें आपलें काम नाहीं; परंतु आपलें काम हें आहे कीं, मुलांनीं ज्ञानसंपादन स्वतः कसें करावें हा मार्ग त्यांना लावावा. त्यांच्या सर्व शिक्षणक्रमाचें बीज म्हटलें म्हणजे प्रत्येक विद्यार्थ्याची बुद्धि जागृत करावी हें असे. यामुळें जें कांहीं शिकवावयाचें तें प्रश्नद्वारें शिकवावें असा त्यांचा पाठ असे. आणखी त्यांचा पाठ असा असे कीं, मुलाला त्याच्या मगदुराप्रमाणें आधीं प्रश्न विचारावा, त्यानें श्रम करून उत्तर दिलें ह्मणजे जसें काय त्याला बक्षीस च द्यावयाचें, अशा रीतीनें नवी एखादी गोष्ट त्याला सांगावयाची. कधीं कधीं मुलांनीं उत्तर शोधून काढण्याकरितां बरोबर मेहनत घेतली नाहीं किंवा ती माहिती आपल्याला असावी असा उत्साह त्यांनीं दाखविला नाहीं, तर ती गोष्ट ध्यानांत ठेवून बोलतां बोलतां मध्यें च ते थांबत आणि त्या वेळेस ती माहिती मुलांस देत नसत. असें झालें ह्मणजे सहज च मुलांना स्वतः श्रम करण्याची सवय लागे.

जसजशीं मुलें प्रौढ होत तसतशी ते त्यांना माहिती स्वतः मिळविण्याची, मिळविलेली माहिती लोकांना सहज सांगण्याची, आणि त्या माहितीच्या गोष्टी कोणत्या नियमानें घडतात याविषयीं शोध करण्याची

सवय लावण्याचा नेहमीं प्रयत्न करीत. ते मुलांना ह्मणत "तुम्ही शाळेंत कोणत्या ही विषयाचें ज्ञान संपादन करण्याकरितां किंवा कोणता ही ग्रंथ वाचण्याकरितां येतां असें समजूं नये; तर तुम्ही ग्रंथ कोणते रीतीनें वाचावा व विषय कसा शिकावा हेंच शिकण्याकरितां येतां." यामुळें त्यांच्या शिकविण्याचा नेहमीं मुलांचे मनांत काय आहे त्याशीं फार संबंध असे; शिकविण्याच्या प्रसंगांत जी नवीन गोष्ट येईल, त्या गोष्टीविषयीं मुलांचे मनांत काय कल्पना असेल, इकडे त्यांचें लक्ष असे. त्यांच्या मनाची नेहमीं अशी समजूत असे कीं दर एक विद्यार्थ्याचे मनांत त्याच्या माहितीप्रमाणें आणि त्याच्या अकलेप्रमाणें दरएक शिकण्याचे गोष्टीमध्यें स्वतःचा कांहीं तरी अभिप्राय असावा. एखादे पद्याचा अथवा वाक्याचा अर्थ वर्गांत चालला असला तर ते तो अर्थ आपण वर्गांतील विद्यार्थ्यांस सांगावयाचा आहे असें कधीं ही मनांत आणीत नसत. ते नेहमीं असें समजत कीं, विद्यार्थ्यांनीं आणि आपण मिळून त्या वाक्याचा अर्थ लावावयाचा आहे. विद्यार्थी चुकण्याबरोबर लागलीच त्या वाक्याचा अर्थ असा असा आहे म्हणून ते एकदम कधीं सांगत नसत. थोडथोडें सुचवून सुचवून खरा अर्थ मुलांचे ध्यानांत येई, असें ते करीत असत. किंवा वर्गांतील हुशार मुलांस त्यांतील कांहीं भागांवर प्रश्न करीत; त्यांचीं उत्तरें खालच्या मुलांनीं ऐकलीं ह्मणजे मग ते त्यांजकडून पुनः प्रयत्न करवीत असत. अशा रीतीनें, म्हणजे आपणास जें वर्गांतील खालच्या मुलांस सांगावयाचें तें वरचीं हुशार मुलें मध्यें घेऊन त्यांच्या कडून सांगविल्यानें, दोन्ही प्रकारच्या मुलांस लाभ होतो असें त्यांचें म्हणणें असे. असा पाठ ठेविल्यानें जीं मुलें अधिक बुद्धिमान् असतात व ज्यांना आपल्या शिक्षणाचा विशेष लाभ मिळालेला असतो अशा चांगल्या मुलांस आपली योग्यता काय आहे हें चांगलें समजतें. विद्येच्या व सुशिक्षितपणाच्या संबंधानें आपणांमध्यें काय गुण असले पाहिजेत व ते आपण कसे दाखवावे हें त्यांच्या मनांत चांगलें वागतें असें ते म्हणत. जीं मुलें अभ्यासांत वगैरे अंमळ मागें असतात त्यांना या वहिवाटीमुळें काय लाभ होतो हें त्यांच्या तोंडच्या शब्दांवरून च चांगलें

ध्यानांत येईल. ते म्हणत. "जीं मुलें वर्गांत कांहींशीं मागसलेलीं असतात त्यांना असें च पाहिजे. म्हणजे प्रथम त्यांना काय येतें हें पाहावें, नंतर त्यांना न सुचेल तेथें वरच्या मुलांकडून त्यांना सांगवावें; याप्रमाणें नित्य क्रम ठेविला पाहिजे म्हणजे त्यांला उमेद येते आणि अवघड विषय समजण्याचा यत्न करण्याची हौस येते. इतकें च नव्हे, पण त्यांचा दुसरा ही मोठा फायदा होतो. तो हा. जो विद्यार्थी एकटा च एखादा विषय वाचतो त्याला त्यावर कोणी प्रश्न विचारिले नाहींत, म्हणजे त्याचे माहितींत एके प्रकारचा गोंधळ उत्पन्न होतो. आपल्याला बरोबर समजलें कोणतें आणि न समजलें कोणतें हें त्याला कळत नाहीं. जें पुरतें समजलें नाहीं तें त्याला समजलें असें वाटतें व ज्या गोष्टीविषयीं अधिक माहिती असावी तिजविषयीं थोडी च माहिती आहे ती पुरी आहे असा त्याचा ग्रह होतो. याप्रमाणें एकटेपणीं अभ्यास करणारे विद्यार्थ्यांचे अभ्यासांत नेहमीं दोष राहतात. हे दोष शिक्षकानें शिकवितांना प्रथम त्याला प्रश्न करून त्याला न सुचेल तेथें अधिक हुशार मुलांकडून थोडेंसें सांगवून नंतर त्यावर आपण पूर्णपणें उपपादन केल्यानें दूर होतात."

**विद्यार्थ्यानें उत्तर देण्याबरोबर तें खरें आहे किंवा खोटें आहे हें शिक्षकास जलद आणि निश्चितपणें समजलें पाहिजे**—त्या खेरीज एका प्रश्नाचें उत्तर घेऊन त्यावरून दुसरा, तिसरा विचारणें हें चालत नाहीं. बहुतकरून एका प्रश्नाचें उत्तर एके वेळेस एके च मुलाकडून घ्यावें, म्हणजे पुष्कळ मुलांस एकदम बोलूं देऊं नये; तशानें वर्गांत दंगा होतो; शेजारच्या वर्गास गडबड होते; खेळकर पोरांना दडावयास अवकाश मिळतो; आणि दर एक जण काय काय बोलला हें पुरतें शिक्षकास न कळल्यामुळें अमुक अमुक च शब्द चुकला असें मुळीं च सांगतां येत नाहीं. सर्व वर्गाला एकदम एक च प्रश्न विचारण्यांत इतके दोष आहेत, तथापि एखादे वेळेस वर्गांत पांचचार जणांकडून उत्तर आलें नाहीं असें झाल्यास "कोणी ही सांगा" असें म्हणण्यास हरकत नाहीं. असें म्हटल्यावर दहापांच मुलें एकदम उत्तर देतील. अशा वेळेस पंतोजी

जड असला तर गोंधळून जाईल, कोण काय बोलला हें त्याच्या ध्यानांत येणार नाहीं. परंतु जर तो चलाख असेल तर तितक्या घोळक्यांतून साऱ्यांत बरें च उत्तर कोणतें आहे व तें कोणीं दिलें हें ओळखून तें उचलून घेऊन त्यावरून जें सांगावयाचें असेल तें सांगेल. ही हुशारी शिक्षकाच्या फार कामाची आहे. सर्व विद्यार्थ्यांना वाटतें कीं आपण बराबर उत्तर दिलें ह्मणजे, तें शिक्षकाला समजल्याशिवाय कधीं राहावयाचें नाहीं आणि तेणेंकरून त्यांचा त्याजवर पूर्ण भरंवसा बसतो. या करितां ही शक्ति सर्व शिक्षकांनीं श्रमानें संपादन करावी. ज्याचे आंगीं ही शक्ति नाहीं त्याच्या शिकविण्यांत तरतरी किंवा उल्हासवृत्ति कधीं ही राहणार नाहीं.

**एका मुलाला प्रश्न विचारल्यावर दुसऱ्याला विचारणें तो फार जलदीनें विचारिला पाहिजे**—प्रश्न अवघड असला तर मुलाला विचार करावयास वेळ पाहिजे च. पण दरएक धडा शिकवितांना शेंकडों सोपे प्रश्न विचारावयाचे असतात. एखादे वेळेस आपण जें सांगितलें असेल तेंच विचारावयाचें असतें, किंवा अशी एखादी माहिती विचारावयाची असते कीं, ती ठाऊक असली तर विद्यार्थी तत्क्षणीं सांगेल व ठाऊक नसली तर तासभरानें देखील सांगणार नाहीं. असा प्रश्न नुसत्या हाताच्या किंवा डोळ्याच्या खुणेनें शिक्षकानें पहिल्यापासून शेवटल्या मुलापर्यंत विजेसारखा लकदिशीं न्यावा. या प्रमाणें पाठ चालला म्हणजे शिक्षक प्रश्न केव्हां विचारील म्हणून त्याचे ओठांकडे विद्यार्थ्यांचे सारे डोळे लागलेले असतात. मुलांचें लक्ष विषयावर कसें राहील ह्मणून प्रयास करावा लागत नाहीं, कारण अशा पद्धतीनें दुर्लक्ष होणें अशक्य च आहे.

**संज्ञा फार उपयोगी आहेत.** शिक्षकानें अमुक रीतीनें हात केला ह्मणजे अमुक समजावें, हें विद्यार्थ्यांस ठाऊक पाहिजे. आपल्याकडे पाहिलें म्हणजे आपण उत्तर द्यावें हें विद्यार्थ्यांस सहज समजलें पाहिजे. अशानें विनाकारण गोंगाट होत नाहीं; आणि मुलें चलाख राहतात. जरा बोट फिरविलें किंवा मुलाकडे नजर केली ह्मणजे आपली उत्तर देण्याची पाळी आहे असें विद्यार्थ्यास समजावें. कांहीं शि-

क्षक एक दोन विद्यार्थ्यावरून पाळी गेली ह्मणजे मध्येंच म्हणतात, 'खालचा' "बोल त्याच्या खालचा हँ," असला शिकविणारा एकाला प्रश्न विचारील इतक्या वेळांत दुसरा एखादा दहांला विचारून जाईल. वेळेंत इतकें अंतर पडून, खेरीज त्याचीं मुलें पण तरतरीत राहतील. मुलाला वर जा ह्मणून सांगावयाला किंवा उत्तर बरावर आहे असें समजविण्याला, बोलण्यांत च काय अर्थ आहे? खूण केली तरी तें च काम होणार आहे. उगीच शब्द उच्चारण्यांत काय हांसल आहे? एखादे वेळेस उत्तर फार च चांगलें असलें तर 'ठीक,' 'शाबास' म्हणावें; ह्मणजे त्या शाबासकीची किंमत ही राहते. पण अशी कांहीं तरी संज्ञा असावी कीं तेणेंकरून उत्तर शिक्षकास पसंत झालें कीं नाहीं हें विद्यार्थ्यास ताबडतोब समजावें. शिक्षकाचे मुद्रेवरून च बहुशः विद्यार्थ्यांनीं हें ओळखावें. या संबंधानें एक ठिकाणीं **स्काट्लंड्** देशांतील एका शाळेचें वर्णन दिलें आहे त्याचा उतारा खालीं घेतला आहे. त्याप्रमाणें च अक्षरशः वर्तन ठेवणें चांगलें नाहीं, तथापि वर्गांत तरतरी ह्मणजे काय पदार्थ असतो हें बराबर समजण्याकरतां या उताऱ्याचा पुष्कळ उपयोग होईल. "तो शिक्षक अशा जलदीनें प्रश्न विचारीत असे कीं, तें सांगितलें तर एखाद्याला खरें देखील वाटणार नाहीं. इतकें ही असून एकदा प्रश्न विचारल्यावर पुनः तो त्याच्या तोंडांतून कधीं ही निघत नसे. पहिल्यानें ज्याला प्रश्न विचारला, त्याला तो आला नाहीं तर, पुनः प्रश्न तर कोण सांगतो? पण नुसतें 'खालचा' किंवा 'दुसरा' इतकें म्हणण्यास तरी फुरसत कोठली? शिक्षक ज्याला विचारलें त्याजकडे एक हात लांब करून व बोट पुढें धरून उभा आहे च. सर्व मुलांचे डोळे पंतोजीच्या नजरेकडे बांधल्यासारखे लागले आहेत. त्यांचीं सर्व इंद्रियें आणि बुद्धि हीं शिक्षकाचे तोंडांतून काय निघतें, व त्याची नजर कोठें फिरते इकडे तत्परतेनें लागलीं आहेत. इतक्यांत शिक्षक गरगरा डोळे फिरवीत इकडून तिकडे व तिकडून इकडे विजेसारखा फिरतां फिरतां दुसऱ्या मुलाकडे अति जलदीनें बोट आणि डोळे फिरवून, त्याजकडून उत्तर न आलें तर लागलीं च त्याच्या

खालच्याकडे वळतो; व प्रश्न अवघड असला तर याप्रमाणें शेवटल्या मुलापर्यंत जाऊन, पुन: झरदिशीं बोट आणि नजर वर्गाच्या पहिल्या बाजूकडे करितो; त्यांत मतलब असें समजविण्याचा कीं, इतक्यांपैकीं कोणाला येत असेल तर अझून बोला. ती बाजू झाली कीं दुसरे बाजूकडे चटकर वळतो. हा सगळा प्रकार पांचपंचवीस अंकांत पार होऊन जातो. तोंडानें बोलण्यांत वेळ फार जातो आणि खटपट फार पडते म्हणन सगळें काम खुणांवर चालतें; आणि सर्वांचा सगळा जीव, कोण काय करतो, कोण काय बोलतो, हें पाहण्याकडे आणि ऐकण्याकडे लागला असल्यामुळें एकमेकांचें मन एकमेकांला समजावयास वीज लवते इतका सुद्धां वेळ लागत नाहीं. पंतोजी एका मागून एक दहा मुलांना बोट फिरवून प्रश्न विचारीत आहे तों च खालचीं दहा मुलें आपले हात पुढें करून आपणांवर पाळी आल्यास उत्तर देण्याची आपली तयारी आहे झणून सुचवीत च आहेत. याप्रमाणें काम चालल्यावर पंनास साठ अगर ऐशीं विद्यार्थ्यांस प्रश्न विचारावयास पंचवीस अंक मोजी इतका वेळ लागतो.''

''एवढ्यानें वर्गाचें वर्णन पुरतें झालें नाहीं. आधीं **स्काट्लंड्**मध्यें शिक्षक बसून कधीं च शिकवीत नाहींत. पण हा पंतोजी तर एकाजागीं उभा सुद्धां राहत नसे. मुलें ही निश्चित दगडासारखीं आपल्याजागीं बसत नसत; किंवा अगदीं तोंडावरून माशीसुद्धा न उडे तशीं हळू च या बाजूवरून त्या बाजूवर आणि त्या बाजूवरून या बाजूवर अशीं लोळत नसत. त्या वर्गांत अशी चाल होती कीं, दर एक मुलानें उठून मग उत्तर द्यावें. हें काम पण इतकें जलद होत असे कीं नेहमीं माणूस उठून पुन: बसतो तसें दिसत सुद्धां नसे. मुलगा चटदिशीं बसलेला उभा राहणें आणि उभ्याचा पुन: बांकावर बसणें हें सगळें जसें यंत्राचे धक्यानें एकदम व्हावें तसें दिसे. याप्रमाणें सर्व वर्गांत जिकडे तिकडे तरतरी आणि हुशारी दिसे. पण जेव्हां एखादे वेळेस वर्गांत कोणाला ही येत असेल त्यानें बोलावें, असा इशारा अशा पंतोजीकडून मिळतो तेव्हां तर काय कमाल च होते. दाहावीस मुलें खाडदिशीं उभीं राहून एकदम किंकाळतात. पं-

तोजीच्या मुद्रेवरून त्यांना एकदम समजतें कीं, आपलें उत्तर पटलें; कीं बसलीं च एकदम टपटप सारीं खालीं. इतक्यांत आला दुसरा प्रश्न. त्याचें उत्तर न आलें कीं, तिऱ्हाईत बघणारांला समजतें न समजतें तों गेला पुढें प्रश्न. तेथून उत्तर न आलें कीं दुसऱ्या बांकाकडे बोट आणि नजर गेली च, कीं तिकडून दहा बारा मुलें भुईवर उडी मारून ओरडलीं च काय उत्तर असेल तें."

"ही व्यवस्था बराबर समजण्याकरितां अशा शाळेंत ज्या संज्ञांचा प्रचार पडतो त्या थोड्याबहुत समजल्या पाहिजेत."

"एखाद्या मुलाला प्रश्न विचारला आणि त्याजकडून उत्तर न आलें; आणि त्याला उत्तर द्यावयाला तर लावावयाचें; (कारण किती ही मूर्ख मुलगा असला तरी त्याजबद्दल चालढकल करून उपयोग नाहीं); तर अशा वेळेस करावयाची त्याची खूण म्हटली ह्मणजे 'बोल' 'बोल पाहूं;' इतकें ही करून त्यानें उत्तर न दिलें आणि त्याच्या खालच्यानें उत्तर दिलें तर त्यानें ह्मणावें, 'जा त्यावर' सगळ्या वर्गाला कांहीं वेळ उत्तर सुचलें नाहीं आणि नंतर एके मुलानें खाडदिशीं उत्तर दिलें तर त्याला म्हणावें 'पहिला,' ह्मणजे त्यानें सगळ्या मुलांस खालीं टाकून वर पहिला जाऊन बसावें."

"वर सांगितल्याप्रमाणें काम चाललें ह्मणजे वर्गांत पेंगणें किंवा आळस किंवा दुर्लक्ष हीं अगदीं चालत नाहींत. जरा विद्यार्थ्यांचा डोळा इकडे तिकडे झाला, किंवा त्याचे चेहऱ्यावर दुर्लक्षाचें चिन्ह दिसूं लागलें कीं, त्याला योजून पंतोजी बोलतो च कांहीं तरी; आणि एकमेकांची हुशारी पाहून वर्गांत अशी चढाओढ लागते कीं ज्या मुलांत मुळींच जीव नाहीं त्याजपुढें मात्र इलाज नाहीं; पण बाकीच्या सर्व मुलांचीं मनें अगदीं तरतरीत राहतात."

मागें सांगितलें च आहे कीं, वरच्या उताऱ्याप्रमाणें अक्षरशः वर्तन ठेवणें बरोबर नाहीं. तिरासारखें ताडदिशीं पुढें होणें, किंकाळणें, वगैरे गोष्टींनीं विचार करणें किंवा उत्तरांतील शब्दार्थाचा सूक्ष्म रीतीनें अर्थ ध्यानांत आणणें अशा अति उपयुक्त प्रकारांस बिलकूल मदत होत नाहीं; या करितां त्या गोष्टींचा प्रचार फारसा करूं नये. परंतु एखादे

पंतोजीचे वर्गात अगदीं च निर्जीव अशीं मुलें बसतात; त्यानें इकडे फार लक्ष द्यावें म्हणून हा उतारा येथें दिला आहे. खरी हुशारी आणि खरा उत्साह वर्गात असावा. उगा च कल्ला आणि वरकरणी तरतरी यांन कांहीं हांसल नाहीं.—असो.

**पाठ सारखा चालवावा. त्यांत खंड पडूं देऊं नये:**—पुष्कळदां शिक्षक एखाद्या मुलाला मध्येंच ह्मणतो 'हँ, तूं हंसतो आहेस, बरें का.' दुसऱ्याला ह्मणतो 'तुझें लक्ष कोणीकडे आहे?' हा सर्व प्रकार वाईट आहे. याप्रमाणें मध्यें बोलावें लागणें म्हणजे आपलें शिकविणें बराबर चालत नाहीं असें कबूल करणें होय; कारण जर शिकविणें बराबर चालेल तर असे अव्यवस्थेचे प्रकार मुलांचे हातून घडणार च नाहींत. क्वचित् असें कांहीं झालें तर ज्याची चलबिचल झाली असेल त्याला च पुढचा प्रश्न विचारावा म्हणजे झालें; ज्या मुलाचें दुर्लक्ष झालें असतें, त्याचें चित्त पाठाकडे लागतें आणि आपल्या पाठांतील पूर्वापर संबंधांत तर तूट पडत नाहीं. हा च हेतु सिद्धीस जाण्याकरितां आणखी एका नियमाची जरूर आहे. तो हा:—

**प्रश्न विचारावयाचा तो आधीं विचारून मग उत्तर कोणीं द्यावयाचें तें सांगावें अथवा खुणेनें दाखवावें:**—असें केल्यानें सारा वर्ग सावध राहतो. उत्तर देण्याची पाळी कोणावर येईल हें कोणास च ठाऊक नसल्यामुळें जरूर पडली तर उत्तर देण्यास आपण तयार असावें म्हणून सारे च लक्षपूर्वक प्रश्न ऐकतात. नेहमीं एकामागून एकानें क्रमानें उत्तर द्यावें ही व्यवस्था चांगली नाहीं. या व्यवस्थेनें मुलांना, दुर्लक्ष केलें तर चालेल, असें मुद्दाम सांगितल्यासारखें होतें. विशेषेंकरून ज्या मुलापर्यंत पाळी आली असेल त्याच्या वरच्या मुलांना तर 'आतां खेळा' म्हणून सांगितल्यासारखें होतें. कारण एकदां आपली पाळी झाली, तेव्हां आतां कांहीं वेळपर्यंत आपल्याला कांहीं धाक नाहीं, ह्मणून मुलगा सहज च निश्चिन्त बसतो आणि पाठाकडे दुर्लक्ष करतो. तें च जर सर्वांला असें वाटेल कीं, आपणांवर केव्हां पाळी येईल कोण जाणे; तर इतका निश्चिन्तपणा होणार नाहीं. आतां एखादे वेळेस प्रश्न ओळीनें केले तरी चा-

लेल. सोपे प्रश्न थोड्यांत उत्तरें देण्यासारखे असल्यास सारखे क्रमानें जलद विचारल्यांत कांहीं फायदा आहे. कारण वेळ फुकट गेल्या-शिवाय, जलदीमुळें च सर्वांचें लक्ष प्रश्नावर सारखें राहतें.

**प्रश्न फार सोपे नसावे आणि फार अवघड ही नसावे व ते मुलांच्या योग्यतेप्रमाणें असावेः**—फार च सोपे असले म्हणजे वर्गांतील मुलांस विचार करावा लागत नाहीं आणि त्यांचें दुर्लक्ष होतें. बुद्धिमान् मुलांस असल्या प्रश्नांचा फार च कंटाळा असतो. तसें च प्रश्न अति अवघड ही करूं नयेत; कारण, मुलांच्या शक्तीच्या बाहेर प्रश्न केले ह्मणजे त्यांची उमेद खचते. एखादे वेळेस फार च अवघड प्रश्न विचारला तर फार विलंब न लावतां त्या च प्रश्नाचे उत्तराचा सूचक असा दुसरा सोपा प्रश्न विचारावा; त्याचें उत्तर घेऊन दुसरा त्याहून अवघड विचारावा; असें करतां करतां आपण प्रथम विचारलेले प्रश्नाचें उत्तर काढून घ्यावें. उदाहरणार्थः व्यत्यय शब्दाचा धातु मुलाला विचारला आणि सहज च उत्तर न आलें तर 'व्य' या भागावरून एखादे उपसर्गाचें भान होतें काय? असें विचारावें; त्याचें उत्तर न आल्यास 'व्यर्थ' याचे भाग विचारावे. अशा क्रमानें 'वि' हा उपसर्ग काढावा; मग अति काढावा, आणि मग राहिलेल्या अय एवढ्या भागांतून अ प्रत्यय काढवून 'ए' पासून इ धातूपर्यंत विद्यार्थ्यांचें मन पोहोंचवावें. याप्रमाणें प्रश्नांचा एकमेकांशीं संबंध राहून आपण मुलांकरितां सारे च श्रम न करितां त्यांजकडून श्रम करवून उत्तर काढल्यासारखें होतें.

प्रश्न मुलांच्या योग्यतेप्रमाणें असावे असें ह्मटलें आहे त्यांत, सोपेपणा किंवा कठिणपणा एवढ्याचा च समावेश होतो असें समजूं नये. ते विचारण्यासारखे आहेत किंवा नाहींत याचा ही समावेश यांत च होतो. एक एक गुरुजी असे प्रश्न विचारतात कीं त्यांचें उत्तर च देतां येऊं नये. एके वेळेस पंतोजीनें "तमाशा पहात राहूं नये" ह्मणजे काय ह्मणून प्रश्न विचारला. एथें मुलांनीं काय सांगावें? याहून हें वाक्य सोपें कसें करावें? हें वाक्य ज्याला समजणार नाहीं असे थोडे च आ-

हेत; तेव्हां असला प्रश्न करूं नये. याचें स्पष्टीकरण कोणाला पाहिजे असेल असा अर्थ नाहीं. या च संबंधानें पुढचा नियम उपयोगीं आहे.

**अर्थ सांगावयाचा तो मुळापेक्षां सोपा असावा.** अल्पवयस्क शिक्षक हा नियम फार वेळ मोडतात; या गोष्टीचा कोणाला ही चमत्कार वाटण्यासारखा आहे. एखादा विषय निघाला ह्मणजे केवळ बोलण्याच्या हौसेनें ते व्याख्यानास आरंभ करतात व आपण सांगतों त्यापासून मुलांना काय समजेल याजकडे त्यांचें ध्यान मुळीं च नसतें. सर्व शिक्षकांनीं ध्यानांत ठेवावें कीं, निरर्थक वाग्जालानें अर्थ अधिक गूढ मात्र होतो. मुद्याचे एक दोन शब्दांनीं खुलासा चांगला होतो. ज्याला पांडित्य करण्याची फार इच्छा आहे त्याचे हातून शिकविण्याचें काम कधीं ही चांगलें होणार नाहीं. जें विद्यार्थ्यांस सांगावयाचें तें प्रश्न करून त्यांचे अंतःकरणांत शिरे असें करावें. उगीच लांबलचक व्याख्यान देऊन माहिती विद्यार्थ्यांचे अंतःकरणावर ओतून उपयोग नाहीं. कारण अशा रीतीनें जें ओतलें तें वाहून जाणार आहे. थोडक्यांत अर्थ सांगावयाचा, तो ही नीट सांगितला पाहिजे. कोणी कोणी अर्थ अवघड मात्र करून सांगतात. "एका लहान काळ्या मुंगीला गवसला बहु थोर, दाणा गोधूमाचा" याचा अर्थ, एका क्षुद्र पिपीलिकेला गोधूमनामक धान्याचा स्थूल कण प्राप्त झाला; बाप याचा अर्थ पिता; असें सांगणारे शिक्षक पुष्कळ आढळतात. असल्या शब्दांचा अर्थ सांगण्याचें अथवा विचारण्याचें कारण नाहीं; वाक्यार्थ मुलांला समजला किंवा नाहीं हें पाहणें असेल तर, कोणाला सांपडलें? काय सांपडलें? असे सोपे प्रश्न करून उत्तरें घेतलीं म्हणजे मुलांला अर्थ समजला किंवा नाहीं व वाक्याकडे मुलांचें लक्ष गेलें आहे किंवा नाहीं हें सहज समजतें.

**बहुतकरून शिकवणें तें सर्व प्रश्नद्वारा शिकवावें.**—ही च अध्यापनाची पद्धति सर्वोत्कृष्ट आहे असें यापूर्वीं कितीएक वेळ सांगितलें च आहे. इतर पद्धतींपेक्षां ही पद्धति चांगली म्हणण्याचीं दोन कारणें आहेत. एक तर, पाठ देत असतां या पद्धतीनें विद्यार्थ्यांचीं मनें सावध आणि हुशार राखतां येतात. दुसरें, या पद्धतीनें विद्यार्थ्यांस

जें शिकवावें तें त्यांचे मनावर चांगलें ठसतें. प्रश्नपद्धतीनें शिकवावयाचें म्हटलें म्हणजे प्रश्न योजितांना पुष्कळ गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत. त्यांपैकीं कितीएक वर येऊन गेल्या च आहेत. प्रश्न सोपे असावे. त्यांचीं उत्तरें लांब च लांब आणि अनिश्चित असतील असे नसावे. इतिहास शिकवीत असतां 'मग काय झालें?' 'पुढें कोण मेला?' असे प्रश्न अप्रयोजक होत. ज्या प्रश्नांचीं उत्तरें पुस्तकांतील शब्द जशाचे तसे च ह्मटल्यानें होतील असे प्रश्न विचारूं नयेत. त्या शब्दांनीं तर उत्तर होऊं नये; परंतु त्या शब्दांचा अर्थ ज्याला समजला असेल, त्याला उत्तर देतां यावें असे प्रश्न विचारावे, ह्मणजे मुलांची विचारशक्ति वाढते. उदाहरणार्थ, मुलांनीं पुढील वाक्य वाचलें असें समजा (पुस्तक चवथें पृ० १६७ ओळ १६ ).

"परंतु पाणी नळानें नेलें असतां मध्यें खोल लवण जरी आडवें आलें तरी तें उगमाचे उंची इतकें चढतें असा पाण्याचा स्वभाव लोकांस कळून आल्यापासून उगमापासून शहरांतील मुख्य खजिन्यापर्यंत पाणी नेण्यासाठीं मोठा नळ केला म्हणजे पुरे असें झालें आहे." आतां "परंतु पाणी इ०" कळून आल्यापासून काय झालें आहे, असें विचारून मुलांपासून "उगमापासून.........असें झालें आहे." असें उत्तर घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं. "उंच ठिकाणावरून लवणांतून पाणी आणलें तर तें या दुसरे ठिकाणीं कोठवर चढेल?" असा प्रश्न विचारावा. ज्या मुलाला हें वाक्य समजलें असेल तो ताबडतोब उत्तर देईल, "प्रथम ठिकाणाचे उंचीपर्यंत" म्हणून. ज्याला तें वाक्य समजलें नाहीं तो तें पुनः एक दोन वेळ जपून वाचील तर त्याला ही तें उत्तर देतां येईल. मग असें विचारावें, "हा पाण्याचा धर्म समजल्यापासून शहरांत पाणी आणण्याची कशी सोय निघाली आहे?" ह्मणजे विचार करून विद्यार्थी इष्ट उत्तर देईल. परंतु इतक्यानें काम झालें नाहीं; वाक्य पक्कें समजण्याकरितां आणखी थोडे श्रम केले पाहिजेत; उलटा च एक प्रश्न विचारावा. "पाण्याचा धर्म खोलीकडे जाण्याचा किंवा उंचीकडे जाण्याचा?" मग विचारावें ( पुणें येथील विद्यार्थी आहेत असें समजून) "पर्वतीचे तळ्यापासून लष्करांत जावयास चढण आहे किंवा उ-

तरण?" मग विचारावें, लष्करांत सदर बाजारांत तळ्याचें पाणी नेणें असेल तर जाईल किंवा नाहीं?" शेवटीं विचारावें, "पाणी जावयाचें कोठें थांबेल?" मग "शहरांत ज्या पेठांत पाणी माडीवर चढतें त्या पेठा उंच समजाव्या किंवा सखल समजाव्या?" असे पांच चार प्रश्न विचारून पुन: एक वेळ मूळ वाक्याचा अर्थ शेवटील मुलाकडून बोलवून पुढें पाठ चालवावा.

प्रश्न नानातऱ्हेचे करावे. कांहीं सोपे, कांहीं अवघड असावे. म्हणजे मुलांना कंटाळा येत नाहीं आणि कमजास्त बुद्धीचीं मुलें असतात त्या सर्वांला आपआपल्या लायकीचे प्रश्न सांपडून उत्तरें देतां येतात.

**उत्तरें मुलांकडून घ्यावयाचीं तीं नेहमीं वाक्यरचनेचे संबंधानें पुरीं असावीं.** मुद्याचा एखादा दुसरा शब्द ऐकून घेऊन उत्तर बराबर आहे किंवा चुकलें हें कधीं ही सांगूं नये. "**अक्कलकोटचें** राज्य कोणीं स्थापिलें?" असें विचारलें असतां उगीच मुलानें "शाहू राजा कैदेंतून सुटल्यावर" असें म्हटलें तर एवढीं च अक्षरें ऐकून कोणी कोणी दुसरा प्रश्न विचारूं लागतात. अशा प्रकारच्या उत्तरावर कधीं ही काम चालवून घेऊं नये. मुलाला उत्तर पुरतें सांगूं द्यावें. कांहीं मुलगे खातरी असेल तेवढे च शब्द बोलतात आणि बाकीच्यांबद्दल उगीच कांहीं तरी गुळमुळ करितात. असें अगदीं चालूं देऊं नये. उत्तर मुलानें अर्धें सोडलें असलें तर त्याजकडून तें पुरतें करवावें; गुळमुळीत बोलून गेला असेल, तर तें त्याजकडून पुन: स्पष्ट बोलवावें. यामुळें दोन फायदे होतात. एक तर जें मुलगा संदिग्ध बोलला असेल, तें स्पष्ट करण्यास संधि चांगली सांपडते. व दुसरें, मुलांना बोलण्यापूर्वीं पुरता विचार करण्याची सवय लागते. कितीएक मुलांना अशी खोड च असते कीं मोघम उत्तर द्यावें आणि विचारणारा अधिक अधिक विचारूं लागला म्हणजे त्यांतून सुटावयासाठीं चुकवाचुकव करावी. तें च उत्तर पुन: दे ह्मणून सांगितलें म्हणजे बदलून दुसरें च द्यावें. अशा मुलांची माहिती बहुतकरून कच्ची असते. त्यांची त्यांला च आपण काय म्हणतों याची खातरी नसते. व त्यांची बोलण्याची तऱ्हा ही संदिग्ध असते. हे दोन्ही दोष दिवसेंदिवस वाढत जातात.

कारण त्यांचीं उत्तरें स्पष्टपणें न समजल्यामुळें त्यांतील चुक्या कधीं च कोणी सुधारीत नाहीं, त्यामुळें ते त्या चुक्या नेहमीं नेहमीं करतात आणि त्यांचें सर्व ज्ञान संदिग्ध होऊन जातें. या सवयीमुळें मुलांची वागणूक देखील बिघडते. कारण मुलांना एक बोलावें, मग तें फिरवावें, असा अभ्यास होऊं लागला म्हणजे खरें बोलणें, बोलावयास न भिणें, मनांत येईल तें निष्कपटपणें उघड करणें, सरळ रीतीनें वागणें इत्यादि गुणांचा ऱ्हास होऊं लागतो.

प्रश्नपद्धतीचे संबंधानें पुढील उतारा फार उपयोगीं आहे.

"जी माहिती मुलांस सांगणें ती प्रश्नद्वारा हळूहळू मुलांचे मनांत बिंबविणें फार इष्ट आहे. जसें सरळ वाटेनें एखादी वस्तु नळींत अथवा भांड्यांत घातली तर ती सहज बाहेर पडते तसें मनाचें आहे. ज्ञान श्रमाशिवाय मनांत सरळ ओतून दिलें तर तें तसें च सहज बाहेर वाहून येईल. जर एखादे भांड्याला आंत पडदे आणि खण असले आणि एखादी वस्तु त्यांत गुंतवून टाकली तर श्रम करून देखील ती बाहेर पडत नाहीं. तो च दाखला ज्ञानास ही लागू आहे. जें नवीन सांगावयाचें तें वांकड्यातिकड्या रीतीनें सांगावें आणि मुलांस जी मुळची माहिती आहे तिचा आणि नवीन सांगावयाचें त्याचा असा नाना तऱ्हांनीं संबंध जोडून द्यावा कीं, मनांतून त्यांपैकीं कोणती ही गोष्ट सहसा बाहेर जाऊं देऊं नये. प्रथम एक सहज उत्तर देतां येईल असा सोपा प्रश्न विचारावा; त्याचें उत्तर घेऊन त्यावरून दुसरा जरा अवघडसा विचारावा; त्यापुढें तिसरा, त्यापुढें चवथा, याप्रमाणें क्रमानें जें शेवटीं सांगावयाचें असेल त्यापर्यंत इमारत चढवावी. याप्रमाणें काम चाललें म्हणजे आधीं मुलांला पुढें पंतोजी काय विचारणार आहे याचा ध्यास लागतो आणि त्यांचें लक्ष जागृत राहतें. शिवाय, आपली बुद्धि चालून काम होऊं लागलें आहे असें त्यांचे मनाला वाटलें म्हणजे तितक्यानें त्या कामाची त्यांला गोडी लागते. आणि या रीतीनें जे सिद्धांत त्यांला ठाऊक होतील ते आपण श्रमानें शोधून काढले असें त्यांला वाटूं लागून त्याजबद्दल त्यांला एक प्रकारचा अभिमान उत्पन्न होतो. आईबापांची जशी मुलांवर ममता असते तशी त्या सिद्धांतांवर

त्यांची ममता उत्पन्न होते. याप्रमाणें नवीन माहितीची इच्छा, आपल्या पराक्रमानें आपण ही गोष्ट माहीत करून घेतली हा अभिमान, आणि शेवटीं सांगितल्याप्रमाणें आपण स्थापित केलेला हा सिद्धांत ह्मणून त्यावर राहणारी ममताबुद्धि, या तीन प्रबळ स्वाभाविक वृत्तींच्या संबंधानें जें ज्ञान मनावर ठसविलें तें बहुत दिवस विसरलें नाहीं तर त्यांत काय आश्चर्य आहे! मुख्य मुद्दा हा आहे कीं, प्रश्न असे एकावर एक चढते यावे कीं, केव्हां सुद्धां त्यांचीं उत्तरें घेण्याकरितां आपले पदरचें फारसें सांगण्याची गरज पडूं नये. आणि शेवटला प्रश्न असा असावा कीं, त्याचे उत्तराचें जें वाक्य होईल त्यांत समग्र सिद्धांत स्पष्ट आणि एकदम खरा वाटे अशा रीतीनें यावा. या रीतीनें शिकवितां येण्याकरितां शिक्षकाचे आंगीं फार गुण पाहिजेत. प्रथम शिकविण्याचा विषय त्याला पुरतेपणीं ठाऊक असला पाहिजे; ह्मणजे, नुसते त्या विषयांतील सिद्धांत त्याला निभ्रांतपणें ठाऊक असून उपयोग नाहीं; अगदीं सोप्या गोष्टींपासून ते कसे रचितां येतील हें त्याला स्पष्टपणें दिसलें पाहिजे. अर्थात् कोणते सिद्धांताचा सर्वांस माहीत असणाऱ्या गोष्टींशीं काय संबंध आहे; जो सिद्धांत इतका अवघड दिसतो तो मनुष्यजात अज्ञानांत होती तेव्हांपासून कशा कशा क्रमानें सिद्ध होत गेला; हें त्याला निर्मळपणें माहीत असलें पाहिजे. खेरीज ज्या मुलांना शिकवावयाचें त्यांची ग्रहणशक्ति किती आहे हें त्याला पूर्णपणें ठाऊक पाहिजे, आणि मुलांची कल्पना एका गोष्टीवरून दुसऱ्या गोष्टीवर कशी धांवते हें ही त्याला सूक्ष्मपणीं समजलें पाहिजे. तर च त्याला कोणत्या मुद्यावर प्रश्न आला म्हणजे आग्रह धरून मुलांकडून उत्तर घेतां येईल हें समजेल.”

चतुर कारागीर घाटाचा रस्ता बांधतांना फार लांबीच्या घेराचा बेत धरून कळतें न कळतें इतका चढाव ठेवतो, त्यामुळें रस्त्यानें जात असतां आपण वर चढतों आहों असें वाटसराच्या मनांत सुद्धां येत नाहीं, मग थकवा येणें किंवा दम लागणें या गोष्टी तर दूर च राहिल्या; तथापि एक एक टप्याचे माथ्यावर पोहोंचल्यावर तो खालीं पाहूं लागला म्हणजे खोल आणि सुंदर असा खालचा प्रदेश पाहून त्याची

दृष्टि गार होते आणि आपण इतके उंच सहज चढून आलों ह्मणून त्याचे जिवास हुशारी वाटून पुढची मजल करावयास त्याचे आंगीं हुरूप येतो. प्रश्नपद्धतीनें उत्तम शिकविणाराचे हाताखालीं शिकणाऱ्या मुलांस अशीच मौज वाटते. जें त्यांचें त्यांला ठाऊक आहे त्यापासून च हळूहळू विचार करतांकरतां नवीन नवीन सिद्धांत क्रमाक्रमानें त्यांस ठाऊक होत जातात. त्यांचा व त्यांचे पूर्वींच्या ज्ञानाचा असा कांहीं निकट संबंध असतो कीं, आपणांस कांहीं नवीन गोष्टी समजत आहेत, ही कल्पना देखील त्यांचे मनांत येत नाहीं. परंतु सर्व अशा गोष्टींचा संग्रह ज्याचे उत्तरांत होईल असा एखादा प्रश्न शिक्षकानें शेवटीं विचारला आणि त्याचें उत्तर विद्यार्थ्याला समर्पक रीतीनें देतां आलें म्हणजे जसा वाटसरास टप्प्याचे माथ्यावर गेलें म्हणजे आनंद आणि उत्साह वाटतो त्याप्रमाणें विद्यार्थ्यास ही होतें. आपली विचारशक्ति कशी चालते हा विद्यार्थ्यास अनुभव आला ह्मणजे ती चालवून आपलें ज्ञान वाढविण्याची त्याला हौस येते. इतकें मात्र ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, जसा घोड्याचा वेग वाढला म्हणजे त्याला कहांत ठेवणें जड जातें, त्याप्रमाणें च विद्यार्थ्यास याप्रकारें विचार करण्याची शक्ति उत्पन्न झाली म्हणजे त्याला योग्य विषय अथवा योग्य माहिती सांगण्याचें काम अवघड होत जातें. कारण एक वेळ त्यांची विचारशक्ति प्रज्वलित झाली ह्मणजे ज्या ज्या गोष्टी त्यांचे नजरेस आणाव्या त्यांवरून कल्पना करून तो आपला अभिप्राय लागलाच तयार करून ठेवतो. सारांश प्रश्न करणारानें प्रथम प्रश्न करून जी नवीन माहिती विद्यार्थ्यास देणें असेल ती त्यांचे मनांत खोंचूनखोंचून घातली पाहिजे; व हें काम पुरें झालें म्हणजे पुनः प्रश्न विचारून त्यांच्या च योगानें ती सर्व माहिती विद्यार्थ्यांचे तोंडांतून बाहेर काढून त्यांची परीक्षा केली पाहिजे.

शिक्षणाचे मुख्य प्रकार दोन आहेत. एक असा आहे कीं, आपण जें ज्ञान संपादन केलें असेल, तें शिक्षकानें आपण च विद्यार्थ्यास एकसारखें सांगावें. या प्रकाराचें नांव व्याख्यानपद्धति. दुसरा प्रकार आहे त्याचें नांव प्रश्नपद्धति. मुलांस या दुसऱ्या पद्धतीपासून फार लाभ होतो. ही पद्धति ह्मणजे जो विषय शिकवावयाचा असेल त्या विषयीं

प्रथम एक सोपासा प्रश्न मुलास विचारावा; त्याचें त्यानें योग्य उत्तर दिलें, तर त्यापुढें जो भाग त्याला समजवावयाचा असेल त्या भागाला लागू असा दुसरा प्रश्न करावा; त्याचा पुरता विचार करून विद्यार्थी त्याचें ही उत्तर देईल. या प्रकारें जें मुलाला सांगणें असेल तें तो सांगे तोंपर्यंत चालूं द्यावें. पहिल्या प्रश्नाचें उत्तर न येईल तर त्याहून सोपा प्रश्न विचारावा आणि तेथून आरंभ करावा. किंवा विचारलेले प्रश्नाचें उत्तर विद्यार्थी यानें दिलें पण तें चुकलें असें झालें तर दुसरा प्रश्न विचारावा आणि त्याचें उत्तर घेऊन त्या संबंधानें पहिलें उत्तर कसें बदललें पाहिजे हें त्याचें त्याला दाखवून वास्तविक उत्तर त्याचे तोंडांतून काढवून मग विषयाच्या पुढील भागास उपयुक्त असे प्रश्न वर सांगितल्याप्रमाणें करावे. या मार्गाचें नांव प्रश्नपद्धति.

प्रश्नपद्धतीनें शिकविण्यापासून फार लाभ आहेत. या पद्धतीच्या योगानें विद्यार्थिलोकांस थोडाबहुत तरी विचार करावा लागतो. प्रश्न विचारला म्हणजे विद्यार्थ्यांची इच्छा नसली तरी त्याचें मन विषयाकडे लागल्यावांचून राहत नाहीं. पंतोजीनें लांबलचक चऱ्हाट न वळतां प्रश्न विचारला आणि उत्तर आलें तर बरें च झालें. परंतु उत्तर मुळीं च न आलें किंवा अशुद्ध आलें तरी त्याचे श्रम अगदीं च व्यर्थ गेले असें समजूं नये. कांहीं न झालें तरी विद्यार्थ्याला अमुक एक गोष्ट आपल्याला ठाऊक नाहीं ती समजून घेतली पाहिजे इतकें तरी पक्कें समजेल. मुलाची अमुक गोष्ट आपल्याला ठाऊक नाहीं अशी खातरी होणें, आणि अमुक गोष्ट माहीत असल्यानें अमुक प्रश्नाचें उत्तर बराबर देतां येईल हें ठाऊक असणें, हें काम थोडें आहे असें नाहीं; आणि प्रश्न विचारल्यानें अधिक कांहीं न झालें तर हें काम तरी खास होतें.

**शिकवणें आणि परीक्षा घेणें या दोन गोष्टीं अगदीं पृथक् आहेत, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.**—ही गोष्ट सर्वांस सहज साधते असें नाहीं. बहुतेक अनभ्यस्त शिक्षकांस या विषयाचें मुळींच ज्ञान नसतें. त्यांस प्रश्नपद्धतीनें शिकविण्यास सांगितलें असतां ते विद्यार्थ्यांची परीक्षा च घेऊं लागतात. परंतु कोणते ही पद्धतीनें पाठ

देणें म्हणजे विद्यार्थ्यांस जें ज्ञान नाहीं तें करून देणें आहे; केवळ विद्यार्थ्यांस पूर्वीं च काय येत आहे हें पाहणें, याचें नांव पाठ नव्हे. पाठ देते वेळेस मुलांस पूर्वीं काय येत आहे हें वारंवार पाहणें अवश्य आहे; कारण, तें समजलें नाहीं तर जी नवीन गोष्ट विद्यार्थ्यांस सांगावयाची ती समजण्याची त्यांची कितपत तयारी आहे, हें समजणार नाहीं. याकरितां शिकविते वेळेस वारंवार मुलांस कितपत समजलें आहे, याचा निश्चय करण्याकरितां प्रश्न विचारले च पाहिजेत. परंतु पाठ द्यावयाचा असें तोंडानें मात्र म्हणून सारा वेळ परीक्षा च घेत बसणें हें अप्रयोजक होय. एके शिक्षकानें त्रैराशिक शिकवावयास आरंभ केला त्यानें प्रथम विद्यार्थ्यांस विचारलें गुणोत्तर म्हणजे काय? अर्थात् विद्यार्थ्यांस या प्रश्नाचें उत्तर देतां आलें नाहीं. मग गुणोत्तर या शब्दाची व्याख्या गुळमुळत गुळमुळत सरासरी सांगितली न सांगितली, तों च दुसरा प्रश्न विचारला 'प्रमाण ह्मणजे काय?' या शिकविण्यानें मुलांना काय समजणार आहे? शिक्षणशास्त्राच्या सिद्धांतांप्रमाणें शिकवावयाचें ज्याला परिज्ञान आहे, तो याहून अगदीं भिन्न रीतीनें काम करील. तो प्रथम विद्यार्थ्यांस विचारील "चार आण्यांचे सात आंबे, तर चौदा आंब्यांस काय द्यावें?" बहुतकरून कोणी तरी विद्यार्थी या प्रश्नाचें उत्तर देईल च; न देईल तर पंतोजी पुनः विचारील "चौदा आंब्यांतून एक सात आंबे काढले तर बाकी किती राहतील?" या प्रश्नाचें उत्तर येण्यास कांहीं विलंब लागणार नाहीं. पुढें तो विचारील कीं, "जर पहिले सात आंब्यांस एक पावली पडली तर या दुसऱ्या सात आंब्यांस काय पडेल?" याचें ही उत्तर सहज च येईल. पुढें तो विचारील कीं, पहिल्या सात आंब्यांची एक पावली झाली व दुसऱ्या सातांची एक पावली झाली. तेव्हां किती आंब्यांस काय पडलें? थोड्या वेळानें विद्यार्थी सांगतील कीं, चौदा आंब्यांस दोन पावल्या अथवा आठ आणे पडले. हें उत्तर घेतल्यानंतर तो शिक्षक पुनः विचारील कीं, पहिल्यापेक्षां आंबे कितीपट झाले व त्यामुळें आणे कितीपट करावे लागले? विद्यार्थी विचार करून उत्तर देईल कीं, आंबे दुप्पट घेतले ह्मणून आणे ही दुप्पट द्यावे लागले. मग शिक्षक विचारील कीं,

चौदा आंबे घेतले त्यांबद्दल एकवीस घेतले, तर आणे किती द्यावे लागतील. असें विचारल्यानंतर एखादा विद्यार्थी तरी बरोबर उत्तर देईल च. बाकीच्यांस समजलें नसलें तर पुनः पहिल्याप्रमाणें एकविसांचे सात सात प्रमाणें किती भाग होतात, व दर एकास काय काय पडेल, वगैरे प्रश्न विचारून आंबे तिप्पट घेतले असतां आणे ही तिप्पट पडतील, असें उत्तर विद्यार्थ्यांचे तोंडांतून काढील. इतकें झाल्यानंतर या च प्रकारचीं दुसरीं दहापांच उदाहरणें देऊन ज्या मानानें एक संख्या वाढेल त्या च मानानें दुसरी ही संख्या वाढेल, अशी पक्की समजूत घालून देईल. इतकें झाल्यानंतर त्रैराशिक म्हणजे काय व अमुक दोन संख्यांचा गुणाकार करून त्यास तिसऱ्या संख्येनें भागिलें असतां उत्तर कसें बरोबर येईल, हें सहज समजवून देतां येईल. इतकें सगळें झाल्यानंतर पुनः गुणोत्तर, प्रमाण व त्रैराशिक या शब्दांच्या व्याख्या सांगेल आणि विद्यार्थ्यांचा त्या पदार्थांशीं चांगला परिचय झाल्यामुळें त्यांस त्या व्याख्या समजण्यास व ध्यानांत ठेवण्यास कांहींएक प्रयास पडणार नाहींत. कदाचित् या पारिभाषिक संज्ञा व त्यांच्या व्याख्या प्रथम मुळीं च सांगितल्या नाहींत तरी पाठ देण्यांत मोठासा दोष झाला असा अर्थ नाहीं. त्रैराशिक आणि प्रमाण या काय वस्तु आहेत, या विषयावर या प्रकारचा पाठ चांगला झाला असें ह्मणण्यास कांहींएक हरकत नाहीं. व्याख्येपासून आरंभ करणें हें प्रथम दिसण्यांत शिस्तवार दिसतें खरें, परंतु व्याख्या करते वेळेस ज्या शब्दाची व्याख्या देणें आहे त्याच्या रूपाचें व्याख्या करणाऱ्यास पूर्ण ज्ञान पाहिजे. त्याप्रमाणें च ज्या विद्यार्थ्यास ती व्याख्या समजवून द्यावयाची त्यास ही त्या पदार्थाच्या घटकांचें ज्ञान पूर्वीं च झालें पाहिजे. तर च ती व्याख्या निःसंशयपणें आणि पूर्णपणें समजणार आहे. आतां ही व्याख्या इतक्या श्रमाशिवाय तोंडपाठ करणें सुलभ आहे, परंतु केवळ शब्दांचा उच्चार करणें आणि त्यांचा अर्थ समजणें या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. वर सांगितल्याप्रमाणें ज्या मुलास प्रमाण शब्दाचा अर्थ समजवून दिला नाहीं, त्यानें "प्रमाण ह्मणजे संबंधाचें ऐक्य होय" असें तोंडपाठ म्हणून दाखविण्यांत काय हांसल आहे ?

भूगोल शिकवितांना हा प्रकार विशेषेंकरून आढळतो. बहुतेक शिक्षकांना हिंदुस्थान देशाचें वर्णन शिकवावयास सांगून, ते काय करतात पाहा. ते विचारतील 'हिंदुस्थान कोठें आहे?' 'त्यांत पर्वत कोणकोणते आहेत?' 'त्या एकएकांतून नद्या कोणकोणत्या निघतात?' वर्गांत कांहीं मुलें जुनीं असतात, व कांहीं घरून शिकून येतात. तेव्हां असे जरी प्रश्न विचारले तरी वर्गांतून उत्तरें मिळतात. परंतु याचें नांव भूगोल शिकविणें नव्हे. ज्या देशाची वर्गास कांहीं माहिती नाहीं, असल्या देशाचें वर्णन शिकवावयास लागावें आणि मग पाहावें अशा शिकविण्यानें कसें काय काम चालतें तें. भूगोलासारखा विषय देखील प्रश्नपद्धतीनें शिकवितां येतो; पण उगीच परीक्षा घेतांना विचारावयाचे तसे प्रश्न विचारून उपयोग नाहीं. मुलांना पूर्वीं शिकविलें असेल त्यावर आणि आपण त्या वेळेस सांगतों त्यावर विचार करून मुलांना ज्यांचीं उत्तरें देतां येतील असे प्रश्न करावे. सर्व विषय विद्यार्थ्यांस आधीं च अवगत आहेत असें समजून प्रश्न विचारूं नये. हिंदुस्थानाची माहिती शिकवावयाची असली तर नकाशा जवळ ठेवून प्रथम विचारावें:—प्र० आपण कोणते शहरांत आहों? उ० पुण्यांत. प्र० पुणें शहर कोणत्या इलाख्यांत आहे? उ० मुंबई इ०. प्र० मुंबई इलाखा कोणत्या देशांत आहे? उ० हिंदुस्थानांत. प्र० बरें, या हिंदुस्थान देशाविषयीं थोडासा विचार करूं. पुण्याहून पश्चिमेकडे गेलें असतां प्रथम कोणता डोंगर लागेल? उ० सह्याद्री. प्र० त्याच्या पलीकडे काय लागेल? उ० कोंकण. प्र० त्याच्या पलीकडे काय लागेल? उ० समुद्र. प्र० तर मग हिंदुस्थानाच्या पश्चिमेस समुद्र आहे. बरें पूर्वेस गेलें तर काय लागेल? या प्रश्नाचें उत्तर त्यांजकडून येण्यासारखें नाहीं; तेव्हां फार वाट न पाहतां पंतोजीनें आपण होऊन च सांगावें कीं, तिकडे ही असा च समुद्र आहे. असें सांगितल्यानंतर खालच्या एखाद्या मुलास विचारावें, तर मग हिंदुस्थानाच्या किती बाजूंस समुद्र आहे? उ० दोन बाजूंस. प्र० दोन बाजूंस तर आहे च. बरें उत्तरेस गेलें असतां काय लागेल, कोणाला ठाऊक आहे? तिकडे थंडी फार आहे. हिम म्हणजे बर्फ अतिशय; तिकडे बर्फाचें घर

आहे असें म्हणतात. इतकें सूचकवाक्य ऐकून कोणी तरी हु-शार मुलगा "हिमालय" असें म्हणेल. न म्हणेल तर तें ही आपण च सांगावें. मग हिंदुस्थानची आकृति शिक्षकानें फळ्या-वर काढून विद्यार्थ्यांकडून दोहोंबाजूंचे समुद्रांचीं आणि उत्तरेकडील पर्वतांचें अशीं नांवें त्यावर लिहवावीं, आणि इतक्या माहितीवरून उत्तरें देतां येतील असे उलटे सुलटे प्रश्न करून मर्यादा व दिशा यांची माहिती पक्की करून द्यावी. मग क्रमाक्रमानें मोठाले डोंगर काढावे, व त्यांचीं नांवें सांगून नंतर त्यांबद्दल प्रश्न करावे. पुढें त्यांज-पासून निघणाऱ्या नद्यांचे प्रवाह दाखवून, त्या संबंधानें जमिनीचे उंची खोलीविषयीं माहिती द्यावी. पुढें नद्यांचे कांठांवर शहरें कशीं काय आहेत, रस्ते कोणते प्रकारचे कोठून कोठवर आहेत, हें दाखवावें. पुष्कळ कारणांनीं या नद्या, पर्वत, शहरें व क्षेत्रें हीं विद्यार्थ्यांस ठा-ऊक असण्यासारखीं असतात. त्या संबंधानें विद्यार्थ्यांस प्रश्न विचारून त्यांजकडून उत्तरें येतील त्यांला जोडून जोडून च नवीन माहिती सांगावी. मुख्य ध्यानांत ठेवण्याची गोष्ट ही आहे कीं, प्रश्नपद्धतीनें शिकवावयाचें ह्मणजे, सर्व गोष्टी विद्यार्थ्यांस पूर्वीं च अवगत आहेत असें धरून व्यापक प्रश्न विचारले ह्मणजे झाले असें नाहीं. शिकविणें आणि परीक्षा घेणें या दोन गोष्टी अगदीं स्वतंत्र आहेत. हें जरी स-कृद्दर्शनीं अगदीं उघड दिसतें, तरी शेंकडा दहापांच देखील शिक्षक असे सांपडणार नाहींत कीं, जे शिकवितांना ही गोष्ट बराबर ध्यानांत ठेवून त्याप्रमाणें काम करितात. अध्यापनाकरितां जे प्रश्न करावयाचे ते परस्पर संबंधाशिवाय असूं नयेत. जशा सांखळीच्या कड्या एकांत एक अडकलेल्या असतात तसा त्यांचा परस्परांशीं संबंध असावा. पहिल्या प्रश्नाचें उत्तर असें असावें कीं, त्यानंतर जो प्रश्न विचाराव-याचा त्याच्या विषयाचें मूळ त्यांत असावें. या च प्रमाणें शेवटपर्यंत संगतवार प्रश्न असावे. असले प्रश्न योजावयास वेळ लागतो आणि विचारल्यावर उत्तर देण्यास ही वेळ लागतो. मागील उत्तर काय झालें, त्याचा आणि आतांचे प्रश्नाचा काय संबंध आहे, हा विचार मनांत आणून उत्तर देणें म्हणजे सहज च विचाराचें काम आहे; व

हा विचार विद्यार्थी न करील तर त्यास उत्तर देतां येणार नाहीं. परंतु विद्यार्थ्यांचे मुखचर्येवरून हा विचार करून उत्तर देण्याचे मार्गांत आहे किंवा अडला आहे हें चतुर शिक्षक तेव्हां च ओळखतो. व जर प्रश्नाचें धोरण विद्यार्थ्यांस समजलें नसेल तर फुकट वेळ न जाऊं देतां लागलीं च प्रश्न बदलून विद्यार्थ्यास समजेल असे रीतीनें घालतो. आणि मग त्याचे उत्तराची थोडीशी वाट पाहतो. ही प्रश्नपद्धतीनें शिकविण्याचे प्रश्नाची गोष्ट झाली. परंतु जेव्हां मुलांस विषय अवगत झाला आहे किंवा नाहीं याची परीक्षा करावयाची, तेव्हां जे प्रश्न विचारावयाचे ते जलदीनें च विचारले पाहिजेत. तेव्हां मुलांस विचार करावयाचें कांहींएक काम नाहीं, त्यांस जें माहीत असेल तें आठवण धरून सांगावयाचें आहे. व असले प्रश्नांचीं उत्तरें देतांना विद्यार्थ्यांची तयारी च पाहणें असते. त्या कामाकरितां सावकाशीपेक्षां जलदीचा च विशेष उपयोग आहे. तात्पर्य, प्रश्नपद्धतीनें शिकविणें आणि शिकविल्यानंतर परीक्षेकरितां प्रश्न करणें या गोष्टी परस्पर अगदीं भिन्न आहेत. शिक्षणाकरितां प्रश्न करावयाचे त्यांत असा संबंध असावा कीं पहिल्याचे उत्तरापासून दुसऱ्याचें उत्तर, विद्यार्थ्यानें विचार केला असतां, त्यास सुचावें. विचारतांना ही असे प्रश्न सावकाश विचारावे आणि विद्यार्थ्यास उत्तराचा विचार करावयास वेळ पुष्कळ द्यावा. परीक्षेकरितां प्रश्न विचारावयाचे त्यांचा परस्पर संबंध विशेष नसला तरी चालेल, व ते प्रश्न एकामागून एक अंमळ जलद विचारावे आणि विद्यार्थ्यांकडून उत्तरें ही जलद जलद घ्यावीं.

**सर्व पाठांची पूर्वीं यत्न करून तयारी केली पाहिजे.**— पूर्वीं भूगोलाच्या पाठाचें उदाहरण सांगितलें त्या प्रकारचा पाठ पुस्तक हातीं घेतल्याशिवाय द्यावयाचा असला तर पूर्वीं पुरी तयारी केल्याखेरीज शिक्षकाचें एक क्षणभर देखील चालावयाचें नाहीं, हें कोणी ही कबूल करील; परंतु पुस्तकावरून शिकवावयाचें असल्यास तयारी कशाला करावयाला पाहिजे, असें कोणाच्या मनांत येईल. पण ही शंका अगदीं निराधार आहे. बहुतेक पाठ असे असतात कीं, त्यांचें बराबर विवेचन करण्यास व मुलांस जीं मूळतत्त्वें माहीत असतील,

त्यांचा व त्या पाठांतील सिद्धांतांचा संबंध पूर्णपणें स्पष्ट करून दाखविण्यास पूर्वीं विचार करून ठेवला च पाहिजे; आणि फार काळजीनें आणि दक्षतेनें तयारी केली नसेल तर, प्रसंगास योग्य अशीं उदाहरणें आणि प्रस्तुत विषयास उपयोगी असे इतर विषयांचे सिद्धांत वेळचेवेळेस सांगून, पाठ मनोरंजक करून, मुलांचें चित्त तरतरीत राखून, त्यांस वास्तविक ज्ञानाचा लाभ करून देणें, आणि त्यांची कल्पनाशक्ति वाढविणें, इत्यादि गोष्टी कधीं ही साधावयाच्या नाहींत. जो पाठ मुलांस द्यावयाचा त्याजकडे शिक्षक वर्गांवर गेल्यावर पहिल्यानें पाहील तर त्या पाठांत मुलांच्या लक्षांत विशेष भरवून देण्यासारख्या गोष्टी कोणकोणत्या आहेत हें त्याचे लक्षांत बरोबर येणार नाहीं; ह्यामुळें वर्गांत गेल्यानंतर वेळचे वेळेवर पाहून दिलेला पाठ अर्थात् अपुरता होईल. तसें च विद्वान् शिक्षकास पाठ पाहतां च शेंकडों गोष्टी व उदाहरणें एकदम सुचतात; इतकीं सारीं विद्यार्थ्यांस सांगावयास वेळ नसतो व तीं सांगितल्यापासून त्यांना तादृश लाभ ही नसतो. अशा प्रसंगीं ह्या सुचलेल्या गोष्टींपैकीं प्रसंगास विशेष उपयोगी आणि अत्युत्तम बोधकर अशीं च उदाहरणें निवडून विद्यार्थ्यांस सांगितलीं पाहिजेत. शिक्षकानें पाठ वाचला म्हणजे त्याच्या मनांत तत्काळ कित्येक अशा गोष्टी येतात कीं, त्या विद्यार्थ्यांस सांगून लाभ नाहीं किंवा त्या त्यांस समजावयाजोग्या नाहींत असें विचाराअंतीं शिक्षकाच्या ध्यानांत यावयाजोगें असतें. जो शिक्षक पूर्वीं पाठ पाहिल्याशिवाय वर्ग घ्यावयास जातो, त्याला अशा तात्कालिक सुचणाऱ्या गोष्टींपैकीं कोणत्या गोष्टी सोडून द्याव्या व कोणत्या गोष्टी सांगाव्या; सांगावयाच्या गोष्टींपैकीं ही कोणती गोष्ट केव्हां सांगावी, व तीं कोणते प्रकारें सांगावी, हें समजावें तसें ठीक समजणार नाहीं. अर्थात् पूर्वीं तयार करून दिलेले पाठांत आणि वेळचेवेळेस सुचेल त्याप्रमाणें दिलेले पाठांत जमीन-अस्मानीचें अंतर होईल. कित्येक पोकळ प्रतिष्ठा बाळगणारे शिक्षक व इतर लोक ही आधीं तयारी करून जाणारे शिक्षकांस नांवें ठेवितात आणि अशी पूर्वीं तयारी करणें हें विद्वत्तेस लांछन आहे, असें समजतात; परंतु ही सर्वथा भ्रांति

होय. जो शिक्षक पाठ चांगला देतो त्याची योग्यता त्यानें पूर्वी पाठ पाहून ठेवला म्हणून तिळमात्र ही कमी होत नाहीं; व जो मनुष्य पाठ वाईट देतो त्यानें मीं पूर्वी पाठ तयार केला नाहीं ही सबब सांगणें, व ऐकणाऱ्यानें ती ऐकणें, हें ही रास्त नाहीं. ह्याकरितां कसा ही सोपा पाठ देणें असलें तरी तो पूर्वी वाचून त्याविषयीं विचार करून ठेवणें हें आगदीं अवश्य आहे. तो पाठ एक वेळ किंवा अधिक वेळ पूर्वी शिकविला असला तरी त्याचें पूर्वावलोकन अवश्य च आहे; कारण ज्या विद्यार्थ्यांस तो पाठ सांगावयाचा त्यांची योग्यता वेळोवेळीं भिन्न च असणार व त्या संबंधानें पूर्वावलोकन न केलें तर त्या विद्यार्थ्यांस ज्या गोष्टींची अपेक्षा आहे त्यास अनुलक्षून पाठ होणार नाहीं; म्हणजे सहज च त्यांची योग्यता कमी होईल. सारांश, कधीं ही पाठ देणें झालें तरी पूर्वावलोकन केलें च पाहिजे.

**विद्यार्थ्यांचे उत्तरांत चुकीचा अंश कोणता आहे हें तत्काळ ओळखून सर्व वर्गाची त्याजबद्दल स्पष्टपणें खातरी करून देणें हें शिक्षकास आलें च पाहिजे.** मुलाचें उत्तर थोडेसें चुकलें असलें तर पुनः सबंध उत्तर त्याजकडून ह्मणवून घेण्यांत नेहमीं च हांसल असतें असें नाहीं. पुनः म्हणतांना एखादे वेळेस तो ती च चुकी पुनः करील किंवा कदाचित् ती चूक सुधारील; पण दुसरी च एखादी नवी करील; तर चुकलेला भाग प्रथम नीट करून नंतर मुलाकडून सर्व उत्तर पुनः ह्मणवून घ्यावें. एका मुलाचे उत्तरांत चुकी झाली तर दुसरे एक दोन मुलांस थोडक्या वेळांत विचारून चुकीचा मुद्दा त्यांचे मनांत आला नाहीं असें समजतां च त्या मुद्याकडे वर्गाचें लक्ष पोहोंचवून नंतर वर्गाकडून एकंदर प्रश्नाचें उत्तर निर्दोष करून घ्यावें हें नीट आहे. विनाकारण पहिल्यापासून शेवटल्या मुलापर्यंत पाळ्या कराव्या आणि त्यांत खरी चुकी कोठें आहे हें न समजल्यामुळें एकानें एक, दुसऱ्यानें दुसरें, ह्याप्रमाणें कांहींएक धोरणाशिवाय ओरडावें हें अति वाईट आहे. आणि प्रश्नपद्धतीनें शिकविण्याच्या कामांत तर ही खोड अति अहितकारी आहे. अशानें एक

तर विद्यार्थ्यांचें चित्त एकाग्र राहत नाहीं व दुसरें त्यांची विचार करण्याची शक्ति अगदीं स्तब्ध राहते. विद्यार्थ्यांना कांहीं तरी बोलावयाचें म्हणून बोलावयाचें, मग त्यांत अर्थ असो किंवा नसो, ही खोड अगदीं लागूं देऊं नये. विद्यार्थ्यानें "औदार्यत्व हा फार श्लाघ्य गुण मनुष्यमात्रानें संपादन करावा" असें म्हटलें आणि शिक्षकानें, ह्यांत काय दोष आहे, ह्याचें दिग्दर्शन केल्याशिवाय उगीच खालच्या मुलांस विचारण्याचा क्रम सुरू केला तर, मुलें नानातऱ्हेनें उत्तरें देऊं लागतील. कोणी 'हा'चे ठिकाणीं हें करील; कोणी 'संपादन करावा' आहे तेथें 'संपादन करावें' असें करील; असा एक च घोंटाळा होईल. असें न करतां शिक्षक "औदार्यत्व" ह्या शब्दाचा पुनः अंमळ आघातपूर्वक उच्चार करून मग खालचे मुलांस तें वाक्य शुद्ध करावयास सांगेल, तर त्यांचें लक्ष "औदार्यत्व" ह्या शब्दावर जाऊन त्यांत भाववाचक प्रत्यय दुबार झाल्याचा जो दोष आहे, तो कोणाचे तरी मनांत येऊन तेव्हां च औदार्य असा शब्द असावा, असें कोणी तरी सांगेल. तेवढें झालें म्हणजे त्या चुकीचें स्वरूप समजून सांगून चुकलेल्या विद्यार्थ्यांपैकीं एकाकडून तें वाक्य पुनः सबंध उच्चारवून घ्यावें म्हणजे काम झालें. शिकवितांना चुक्या व मुद्याच्या गोष्टी ह्या दोन्ही विद्यार्थ्यांचे मनावर उत्तम प्रकारें ठसतील अशा रीतीनें सांगितल्या पाहिजेत, ही गोष्ट ध्यानांत धरणें अवश्य आहे. हें साधण्याकरितां ज्या वाक्यांत ती चुकी असेल तें वाक्य, तसें च, ज्यांत एखादा मुख्य सिद्धांत असेल तें वाक्य, स्पष्टपणें पुनः ह्मणून दाखवावें. आणि ह्मणतांना जेथें चूक असेल, त्या वाक्याच्या भागाचा उच्चार अधिक जोरानें करावा. ह्या कामाकरितां शिक्षकाची वाणी निर्मळ आणि उच्चार स्पष्ट असला पाहिजे.

**प्रत्येक शिक्षकानें लोकांस निर्मळ ऐकूं येईल असा आवाज ठेवणें आणि आपल्या मनांत जी गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे त्या गोष्टीकडे ऐकणाराचें लक्ष विशेषेंकरून जाईल असें वाचणें आणि बोलणें, ह्या दोन गोष्टींचा अभ्यास करणें हें फार जरूर आहे.**

प्रत्येक वाक्यांत, फारसें तात्पर्य ज्यांत नाहीं, असे शब्द पुष्कळ असतात. शिक्षकानें वाचतेवेळेस अशा शब्दांचा उच्चार स्पष्टपणें तर करावा च; परंतु त्यांवर फारसा आघात देऊं नये. म्हणजे बाकीचे तात्पर्यगर्भ शब्द असतात त्यांजकडे विद्यार्थ्यांचें चांगलें लक्ष जातें आणि त्यांच्या चित्तावर ते चांगले ठसतात. वाचनपाठाचा अर्थ सांगतेवेळेस ह्या रीतीचा विशेष उपयोग आहे. एखादे वाक्याचा अर्थ विद्यार्थ्यांस चांगला न समजला तर शिक्षकानें त्यांतील मुख्य मुख्य शब्दांवर योग्य आघात देऊन, त्या वाक्याच्या भागांचा परस्परांशीं संबंध असेल तो ऐकणाराचे मनांत सहज येईल अशा प्रकारानें, तें वाक्य साद्यंत स्वच्छ वाचून दाखवावें; म्हणजे बहुतकरून त्या वाक्यांतील मुख्य भागांचा सारांश विद्यार्थ्यांचे ध्यानांत येईल; त्यांजकडून तो ऐकून घेऊन जीं इतर अंगभूत वाक्यें असतील त्यांतील एकेकाचा अर्थ करून घेऊन त्याचा समावेश मुख्य वाक्यांत करावा. असें झालें ह्मणजे वाक्याचे दरएक भागाचा अर्थ स्पष्टपणें मुलांस समजून त्यांचा परस्पर संबंध त्यांचे ध्यानांत येतो; ह्या दोन गोष्टी झाल्या म्हणजे वर्गास त्या वाक्याची पूर्णपणें व्युत्पत्ति झाली च. हें च एक दोन उदाहरणें देऊन स्पष्ट करूं.

"त्या प्रसंगीं कोलंबसास असें भय पडलें कीं, आपण जे हे आश्चर्य करण्याजोगे शोध केले, त्यांचें ज्ञान आतां नाशाप्रत पावेल; आणि आपल्या युक्तीची जी ही आनंददायक सिद्धि तीपासून मनुष्यमात्रास जे लाभ झाले असते, ते नष्ट होतील; आणि आजपर्यंत जीं पराक्रमाचीं कृत्यें झालीं, त्यांमध्यें सर्वोत्कृष्ट जें हें कृत्य तें उपस्थित करून तें पुढें चालविणारास योग्य अशी जी प्रतिष्ठा तिणेंकरून आपलें नांव वंशपरंपरा चालावयाचें, त्याचे बद्दल आतां एके अविचारी आणि ठक अशा साहस-कर्त्यांच्या नांवाप्रमाणें चालेल."

हें वाक्य ज्या विद्यार्थ्यांनीं तीन चार पुस्तकें मात्र वाचिलीं असतील, त्यांना प्रथम च वाचल्यानें स्पष्टपणें समजेल असें नाहीं. ह्याकरितां तें वाक्य शिक्षकानें स्वतः अशा रीतीनें सावकाश वाचून दाखवावें कीं, तेणेंकरून कोलंबसास तीन प्रकारचें भय पडलें

होतें, असा आशय विद्यार्थ्यांचे मनांत यावा. हें वाचणें कोणच्या प्रकारचें असावें हें शब्दांनीं लिहून दाखवितां येत नाहीं. तरी इतकें दिग्दर्शनार्थ सांगतां येईल कीं 'भय पडलें कीं' येथें कांहीं वेळ थांबून नंतर बाकीचें वाक्य वाचतांना "ज्ञान आतां नाशाप्रत पावेल" "लाभ झाले असते ते नष्ट होतील" आणि "साहस-कर्म-कर्त्यांच्या नांवाप्रमाणें चालेल" हीं तीन्हीं अंगभूत वाक्यें इतर शब्दांहून अधिक अशा सारख्या आघातानें वाचलीं असतां, ग्रंथकर्त्याचा आशय स्पष्ट होईल; असें वाचून दाखविल्यानंतर विद्यार्थ्यांस, कोलंबसाला कशाचें भय पडलें, असा प्रश्न विचारावा म्हणजे कोणी तरी हुशार विद्यार्थी, "शोध केले त्यांचें ज्ञान आतां नाशाप्रत पावेल" हें भय पडलें, असें उत्तर देईल. "त्याला बरें म्हणून उत्तेजन देऊन दुसऱ्यास, 'आणिक कसलें भय पडलें ?' असें विचारावें म्हणजे तो 'लाभ नष्ट होतील' हें भय त्यास पडलें, असें सांगेल; त्याला ही थोडी शाबासकी देऊन बराच हुशार मुलगा असेल त्याला 'आणखी कोणतें भय कोलंबसाला पडलें ?' असा प्रश्न विचारावा; म्हणजे थोड्या विचाराअंतीं "एके अविचारी आणि ठक अशा साहसकर्मकर्त्यांच्या नांवाप्रमाणें आपलें नांव चालेल," हें भय पडलें, असें तो उत्तर देईल. हे प्रश्न विचारतांना विद्यार्थ्यांस वाक्यांत असलेल्या शब्दांनीं च उत्तर देण्याविषयीं सूचना करावी. म्हणजे विद्यार्थ्यांनीं आपल्या मनाप्रमाणें शब्द बदलल्यानें त्यांचें उत्तराबद्दल इतर विद्यार्थ्यांचे मनांत घोळ होणार नाहीं; आणि एखाद्या शब्दाचा अर्थ विद्यार्थ्यांस बरोबर ठाऊक नसला तर ती चुकी एकंदर वाक्यार्थाच्या विचारांत शिरून घोंटाळा होणार नाहीं. सर्व वाक्याची समजूत झाल्यानंतर दरएक शब्दाचा अर्थ विचारून पाहणें व ठाऊक नसतील त्यांजबद्दल सर्व माहिती विद्यार्थ्यांस करून देणें हें काम अगत्याचें च आहे. परंतु दोन्ही प्रकार एके च वेळेस करूं लागूं नये. तारतम्य पाहून जेथें वाक्यार्थ आधीं सांगणें अवश्य असेल, तेथें वाक्यार्थ; आणि शब्दार्थ अवश्य असेल तेथें शब्दार्थ, आधीं शिकवून मग दुसऱ्यास आरंभ करावा. ह्याप्रमाणें प्रस्तुत वाक्याचा सरासरी अर्थ विद्यार्थ्यांचे मनांत आल्यावर पुनः कोणते तरी विद्यार्थ्यांस "जें

ज्ञान नाशाप्रत पावेल" असें कोलंबसास भय पडलें, त्या ज्ञानाचा कांहीं प्रकार ह्या वाक्यांत सांगितला आहे काय ? म्हणून विचारावें. ह्याचें उत्तर अगदीं च सोपें आहे. कोणी ही सांगेल कीं, तें ज्ञान आपण केलेल्या आश्चर्यकारक शोधाचें, असें वाक्यांत सांगितलें आहे. ह्याप्रमाणें च जे लाभ नष्ट झाले असते ते कोणते? असें विचारून "आपल्या युक्तीची जी ही आनंददायक सिद्धि तीपासून मनुष्यमात्रास जे लाभ झाले असते ते लाभ," असें उत्तर घ्यावें. इतकें झाल्यावर "जर कोलंबसाच्या उद्योगाचा परिणाम चांगला झाला असता, तर त्याचें नांव कसें काय प्रसिद्ध झालें असतें?" असें विचारावें, म्हणजे "प्रतिष्ठेनें वंशपरंपरा त्याचें नांव चाललें असतें," असें उत्तर येईल. न येईल तर वाक्याचा तिसरा भाग पुनः स्पष्ट रीतीनें वाचून दाखवून आपले उपयोगी पडणाऱ्या शब्दांवर अधिक जोर द्यावा म्हणजे उत्तर मुलांचे ध्यानांत येईल. मग "कोलंबसास जी प्रतिष्ठा त्याचा यत्न सिद्धीस गेला असतां मिळावयाची ती कोणच्या प्रकारची मिळाली असती?" असें विचारावें. त्याचें उत्तर "हें कृत्य उपस्थित करून तें पुढें चालविणारास योग्य अशी प्रतिष्ठा." असें मिळेल. हें उत्तर आल्यावर "हें कृत्य कितपत मोठें होतें?" असें पुसावें, म्हणजे वाक्यांतील शब्द घेऊन "आजपर्यंत जीं पराक्रमाचीं कृत्यें झालीं त्यांमध्यें सर्वोत्कृष्ट असें," म्हणून उत्तर येईल. ह्या वाक्याचा तिसरा भाग लहान मुलांच्या समजुतीस कांहींसा अवघड आहे, म्हणून पुनः विचारावें कीं, "ह्या प्रसंगीं कोलंबसाबरोबरच्या सर्व लोकांचा नाश झाला असता तर त्याला लोकांनीं काय म्हटलें असतें? विचारी आणि साळसूद असें म्हटलें असतें काय?" असें ही सुचवावें. म्हणजे ग्रंथांतील वाक्याकडे पाहून विद्यार्थी सांगतील कीं, त्याला अविचारी आणि ठक साहसकर्मकर्ता असें म्हटलें असतें. हें ऐकून घेऊन पुनः विचारावें "बरें, जर कोलंबसास दैवयोगेंकरून त्यानें आरंभिलेले कामांत सर्वोत्कृष्ट यश आलें असतें, तर त्याची प्रतिष्ठा कशी काय झाली असती?" मग विद्यार्थी "फार मोठ्या पराक्रमाचें कृत्य आरंभून शेवटास नेणारास जी प्रतिष्ठा मिळते ती त्याला मिळाली असती." असें सांगतील. मग शिक्षकानें म्हणावें कीं, तर मग अतिउत्तम लौकि-

काचें साधन करीत असतां फार वाईट अपयश कोलंबसावर येऊं पाहत होतें, अशावेळेस कीर्ति संपादन करण्याची हौस बाळगणाऱ्या पुरुषास भय वाटणें साहजिक आहे किंवा नाहीं?" "साहजिक आहे." असें उत्तर आल्यावर "ह्या वाक्याच्या शेवटल्या भागांत जें भय वर्णिलें आहे, तें हेंच कीं नाहीं ?" असें विचारून तें आणि हें भय एक च असें मुलांकडून बोलवावें. इतकें झाल्यावर वर्गांतील मंद मुलांपैकीं, एखाद्याकडून तें सर्व वाक्य पुनः वाचवावें; त्याच्या वाचण्यावरून च जेथें बरोबर संबंध त्याचे ध्यानांत आला नसेल तें स्थळ शिकविणारास तत्काळ समजेल. त्याविषयीं पुनः प्रश्न करून दुसऱ्या मुलाकडून त्याची गैरसमजूत दूर करवावी. शेवटीं त्या वाक्यांतील शब्दांचा अर्थ, व्युत्पत्ति, व्याकरण वगैरे योग्य दिसेल तसें समजावून देऊन दुसऱ्या वाक्यास आरंभ करावा.

**उत्तर देणें तें निश्चितपणानें आणि विचारलेल्या प्रश्नास बरोबर जुळेल अशा रीतीनें देण्याची संवय मुलांना असणें फारच उपयोगी आहे.** हरएक प्रसंगीं ह्या संवयीचें काम पडतें. ही संवय विद्यार्थ्यांमध्यें उत्पन्न होण्याकरितां शिक्षकानें जें सांगणें तें सर्व निश्चितपणें सांगावें. संदिग्ध अथवा ज्यापासून आपणास पाहिजे त्या अर्थाहून भिन्न अर्थाचा बोध होईल, असें कांहीं सांगूं नये. शिकवितांना बोलावयाचें त्यांत व्याकरणादिकांचे दोष नसावे, हें तर सांगावयास नको च. बारीक पाहूं गेलें असतां पुष्कळ शिक्षकांचे बोलण्यांत अशा प्रकारचे दोष घडतात असें दिसून येईल. एखादा शिक्षक विचारतो कीं, घड्याळाचा उपयोग काय? मुलांपासून उत्तर आलें नाहीं म्हणजे तो स्वतः सांगतो "वेळ मोजण्याचें साधन." हें उत्तर प्रश्नाशीं किती विसंगत आहे हें सहज ध्यानांत येईल. जेथें अध्यापनाचा क्रम ह्या प्रकारचा आहे तेथें विद्यार्थ्यांस भाषेच्या किंवा विचाराच्या प्रकारांतील सूक्ष्म भेद कधीं ही समजणार नाहीं. कित्येक शिक्षक नियमादिकांची उपपत्ति सांगूं लागले म्हणजे त्यांतील कांहीं भाग सामान्य रीतीनें सांगतात, व कांहीं भाग

एखाद्या विशेष उदाहरणाच्या संबंधानें सांगतात. ही चुकी ह्या च सदराखालीं येते.

एक शिक्षक मोठ्या संख्येनें भागावयाचें असलें तर भाज्यास तिच्या अवयवांनीं भागून भागाकार कसा करावा, हें सांगत असतां म्हणाला, दुसऱ्या बाकीस पहिल्या भाजकानें गुणून, त्यांत दोन मिळवावे. ह्यानें जें उदाहरण दिलें होतें तें हें.–२३२ ह्या संख्येस ३० नीं भागावयाचें असलें तर प्रथम ५ नीं भागून आलेल्या भागाकारास ६ नीं भागलें ह्मणजे झालें. हें करून दाखवीत असतां २३२ ह्यांस प्रथम ५ नीं भागून भागाकार ४६ आला आणि बाकी २ राहिली. पुनः ४६ स ६ नीं भागलें तेव्हां भागाकार ७ आला आणि बाकी ४ राहिली. ह्या उदाहरणांत दिलेल्या भागाकाराची बाकी काढते वेळेस ४ स ५ नीं गुणून आलेल्या गुणाकारांत २ मिळवावे लागतात. एवढ्यावरून शिक्षकानें सामान्य नियम सांगतां सांगतां शेवटीं, जो बाकीचा आंकडा डोळ्यापुढें दिसला त्याचा च झट्कन् उच्चार केला. ही चुकी आहे. पाहिजे तर प्रथम दिलेल्या उदाहरणांत बाकी कशी काढावी हें सांगून मग सामान्य नियम सांगावा अथवा प्रथम सामान्य नियम सांगून तो प्रकृत उदाहरणास कसा लावावा तें नंतर सांगावें. परंतु दोहींचा घोंटाळा केल्यानें विद्यार्थ्यांस कांहीं च धड समजणार नाहीं.

हा प्रकार शिक्षकानें स्वतः बोलतांना जपावयाचा झाला. परंतु शिक्षकानें एवढ्यापुरतें च जपून पुरे नाहीं. विद्यार्थ्यांकडून उत्तरें घ्यावयाचीं तीं ही तशीं च म्हणजे विचारलेल्या प्रश्नास बराबर जुळणारीं असावीं. प्रश्नाच्या बराबर बेताचीं नसल्यास तशीं करवावीं. उत्तरांत चुक्या दोन प्रकारच्या असतात, कांहीं मजकुराच्या अशुद्धपणाच्या असतात, व कांहीं त्या मजकुराच्या जुळणीच्या वगैरे संबंधानें असतात. जर विद्यार्थ्यानें दिलेले उत्तरांतील मजकूर बराबर असला आणि केवळ ज्या रूपानें तें असावें, त्या रूपानें मात्र तें नसलें, अथवा त्यांत व्याकरणादिकांचा दोष असला, तर विद्यार्थ्यांचें लक्ष तिकडे पोहोंचेल असें करून उत्तर त्यांच्याकडून च योग्य रीतीनें नीट करवून

घेऊन सोडून द्यावें. कदाचित् उत्तराचा मजकूर चुकलेला असून खेरीज त्याची जुळणी चुकलेली असेल; असें असलें म्हणजे प्रथम उत्तराचे रूपांत जो दोष असेल तो साफ करवून घेऊन, मग मजकुराचे चुकीकडे मुलांचें लक्ष लागेल असें करावें. परंतु केवळ विद्यार्थ्यांचे मनांत सरासरी मजकूर येऊन चुकला आहे, तेव्हां आतां बाकीच्या कामीं घिसघिस कशाला करावी, असें कधीं ह्मणतां कामा नये. आतां असा क्रम चालविण्यास शिक्षकानें मुलांच्या बोलण्यांतील दरएक अक्षराकडे सारखें लक्ष दिलें पाहिजे; आणि चुकी शुद्ध केल्याशिवाय जाऊं न देण्याचे कामांत नेहमीं दक्षता राखून आळस आंगांत अगदीं शिरूं देतां कामा नये. हें काम मोठे श्रमाचें आहे. परंतु कांहीं काळपर्यंत दृढ निश्चय राखिला ह्मणजे ते श्रम आंगवळणीं पडतात. खेरीज असा क्रम ठेविल्यानें शिक्षकाचे चित्तास मोठें समाधान वाटतें. तें असें कीं, मुलांस शिकविण्याचे कामांत जे उद्देश आहेत, त्यांपैकीं मुलांला आपण जें बोलतों तें नीट नेटकें, मुद्देशीर, आणि समर्पक बोलावयाची आणि भाषा शुद्ध बोलावयाची संवय लागावी, हा मुख्य उद्देश होय. आणि तो वर सांगितलेले श्रम शिक्षकानें घेतले असतां जसा कडेस जातो तसा कशानें ही जात नाहीं. तेव्हां जरी आपल्याला श्रम पडले तरी ते फार च उपयोगी आणि विद्यार्थ्यांस हितकारी अशा कामाकरितां पडले म्हणून चांगल्या शिक्षकास मोठें समाधान वाटतें. शिक्षक बोलतांना अव्यवस्थित कसें बोलतात, याचा मासला मागें दाखविला च आहे. आतां विद्यार्थ्यांचे गलथानपणाचीं एक दोन उदाहरणें सांगतों. बहुधा विद्यार्थ्यांस, हिमालयाचे कोणते बाजूस हिंदुस्थान आहे, म्हणून विचारलें तर 'उत्तरेस हिमालय पर्वत' असें ते उत्तर देतात. गुणविशेषण म्हणजे काय म्हणून विचारलें, म्हणजे कांहीं मुलें 'चांगला वाईट इत्यादि' म्हणतात. शिवाजीचे थोरले मुलाचें नांव काय असें विचारावें; म्हणजे मुलें ह्मणतात 'शिवाजी राजास दोन पुत्र होते; वडील पुत्राचें नांव संभाजी आणि धाकट्याचें नांव राजाराम.' बहुतकरून ज्या रूपानें मुलांचे ग्रंथांत मजकूर असतो त्या रूपानें तीं उत्तर देतात; प्रश्नाचे रूपाप्रमाणें त्यांत काय फेरफार करावा, हें त्यांस

समजत नाहीं. ग्रंथाचा आशय समजून घेऊन प्रश्नास जसें योग्य असेल तसें उत्तर विद्यार्थ्यांनें दिलें पाहिजे हें अध्यापन करतांना ध्यानांत ठेवावें. असें केलें नाहीं, तर विद्यार्थ्यांची केवळ पाठ करण्याची खोड कधीं जाणार नाहीं.

**शिकवितांना उदाहरणें द्यावयाचीं तीं मुलांच्या रोजच्या माहितींतील द्यावीं.**—जें मुलांनीं प्रत्यक्ष पाहिलें आहे, व ज्याचा त्यांना नित्य प्रसंग आहे, तें जसें स्पष्टपणें त्यांचे मनांत उतरतें तसें जें त्यांच्या माहितींत नाहीं तें कधीं ही उतरत नाहीं; व त्यामुळें गैरमाहितीच्या उदाहरणांवर त्यांचें पूर्ण लक्ष लागत नाहीं, आणि त्यांवर त्यांची कल्पना ही चालत नाहीं. एक शिक्षक आपले वर्गाला पक्ष्यांविषयीं कांहीं सांगत होता. त्यानें मुलांना म्हटलें एका पक्ष्याचें नांव घ्या? पहिल्याला येईना, दुसऱ्याला विचारलें, तिसऱ्याला विचारलें, याप्रमाणें सतरा असामींस विचारलें पण उत्तर आलें नाहीं; आणि चमत्कार काय कीं वर्गापासून दहा हातांवर कावळा एका खिडकीच्या गजावर बसून ओरडत होता; पण एका मुलाचें सुद्धां लक्ष तिकडे गेलें नाहीं. इतक्या प्रकारची अवस्था नेहमीं असते असें नाहीं, पण या उदाहरणावरून इतकें शाबीत होतें कीं त्या मुलांला जें आपण वाचतों तें, आणि व्यवहारांत ज्या गोष्टी आपल्या दृष्टीस पडतात त्या, यांचा संबंध कसा जोडावा याविषयीं कांहीं च माहीत करून दिलें नव्हतें; ज्या प्रकारच्या अध्यापनानें विद्यार्थ्यांस शाळेंत आपण जें शिकतों, त्याचा व्यवहारांत उपयोग कसा करावा, हें समजूं लागत नाहीं, तो अध्यापनाचा प्रकार मुळापासून च सदोष समजावा. विद्यार्थ्यांना अगदीं पहिला वाचनपाठ द्यावयाचा तो त्यांच्या माहितींतील पदार्थ असतील त्यांवर द्यावा आणि मग आपण जें सांगितलें असेल त्यावर प्रश्न करून तितकें त्यांजकडून बोलवावें. हा क्रम चालविल्यानें विद्यार्थ्यांस आपण जें पुस्तकांत वाचतों त्याचा, आणि व्यवहारांत जें दृष्टीस पडतें अथवा करावें लागतें त्याचा, मेळ घालण्याचा अभ्यास होतो. असें झाल्यानें आपले इकडील लहान थोर मंडळींत जो एक मोठा दोष दिसतो, तो सहज दूर होईल. तो दोष हा होय कीं, पुस्तकांतील ज्ञान पुस्तकांत रा-

हतें; फार झालें तर बोलण्यांत येतें, परंतु कृतींत त्याचा कांहीं च गुण दिसत नाहीं. हा दोष शिक्षकापासून जें शिकावें तें नेहमींच्या वागणुकींत ध्यानांत न ठेवण्याची खोड लागते तिजपासून मूळ उत्पन्न होतो, आणि वयादिकांच्या मानानें तो उत्तरोत्तर वाढत जातो. याकरितां ज्या शिक्षकाचे मनांत आपले विद्यार्थी लोकांत उपयोगी आणि प्रतिष्ठित व्हावे अशी कळकळ आहे, त्यानें, आपण जें शिकवितों त्याचा आणि व्यवहारांत ज्या वस्तु अथवा जे प्रकार दिसतात त्यांचा नित्य संबंध आहे, ही गोष्ट विद्यार्थ्यांस समजाविण्याचा कोणता ही प्रसंग फुकट जाऊं देऊं नये. व याकरितां विद्यार्थी लहान असतां त्यांस ज्या गोष्टी रोज त्यांचें दृष्टीस पडतात, त्यांजविषयीं सांगण्यास आरंभ करून त्यांपासून च पुढें दूरच्या आणि अवघड गोष्टींशीं त्यांचा परिचय करून देण्याचा क्रम ठेवावा. असें केल्यानें मुलांची बुद्धि ही नेहमीं कामास लागल्यामुळें निर्मळ राहते आणि वाढते.

हल्लीं, राज्यव्यवस्था इत्यादि कारणांनीं, या हिंदुस्थान देशाची स्थिति अशी झाली आहे कीं, प्रत्येक पुरुषास आणि बायकोस वाचतां आलें च पाहिजे आणि तें ही इतकें सहज वाचतां आलें पाहिजे कीं, त्यांस वाचण्याचे श्रम वाटूं नयेत किंवा कंटाळा येऊं नये. तसें च वाचतांना लिहिणाराचा आशय सहज मनांत येण्याची त्यांस संवय लागावी. हा हेतु सिद्धिस जाण्यास अध्यापनानें मुलांची बुद्धि जितकी लवकर जागृत होईल, तितकें चांगलें. लहान मुलांपुढें प्रथम एखादा पदार्थ ठेवावा. त्याच्या गुणावर, आकृतीवर व उपयोगावर त्यास सोपे सोपे प्रश्न करून त्याची माहिती थोडीशी वाढवावी आणि त्यानंतर ज्या पाठांत तो च विषय लिहिला असेल असा पाठ त्याजकडून वाचवावा. ही पद्धति–म्हणजे वाचन-पाठ आणि प्रत्यक्ष पदार्थविषयक पाठ या दोहोंच्या साहाय्यानें शिकविण्याची पद्धति–सर्वांत उत्तम आहे, असें वाटतें. हिच्या योगानें मुलांचें वय अगदीं च लहान असतां ही त्यांच्या बुद्धीचा विकास होण्यास आरंभ होतो; परंतु या पद्धतीनें शिकविणें हें काम सोपें नाहीं. शिक्षकांचे आंगीं प्रौढपणा, पुष्कळ वस्तूंचें वास्तविक ज्ञान, मुलांच्या मनोवृत्तींचा खरा परिचय, आणि त्यांस शिकण्याची

गोडी लागण्याची खरी कळकळ, इत्यादि गुण असल्याखेरीज त्यांस ह्या पद्धतीनें शिकवितां येणार नाहीं. आणि अशा रीतीनें शिकविल्याखेरीज विद्यार्थ्यांस शिकविण्यापासून जो खरा फायदा व्हावा, तो कधीं ही व्हावयाचा नाहीं. लहान शाळांतील मुलें दहा बारा वर्षांचीं होत तों लिहिणें वाचणें शिकतात आणि मोठीं झालीं ह्मणजे त्यांची आणि अक्षराची सर्व ओळख बुजून शाळेंत न गेलेले लोक आणि ते एकसारखे च होतात. ह्याचें कारण हें च आहे कीं, त्यांचें अध्यापन वर सांगितलेले पद्धतीनें होत नाहीं. परंतु ज्या क्रमानें घोड्यास चाल शिकवितात किंवा पोपटास बोलावयास शिकवितात त्याप्रमाणें लहानपणीं त्यांस शिकवितात. मग त्या मुलांची अक्षरांची ओळख पंतोजीच्या ओळखीबरोबर च बुजते ह्यांत काय नवल आहे! आतां अनिवार्य अडचणीमुळें मुलांच्या बुद्धीचे कोमल अंकुर अशिक्षित आणि अप्रौढ व पोरसवदा शिकविणारांचे हातीं पडतात. यामुळें असा परिणाम होतो, हें कांहीं अंशीं खरें आहे. परंतु एवढ्या च सबबेनें ती निरुपायाची गोष्ट आहे म्हणून हात टेंकून बसणें ठीक नाहीं. असतील त्यांत जो उत्तम शिक्षक असेल त्यानें दिवसांतून घटका दोन घटका तरी अगदीं लहान मुलांचा वर्ग आपण स्वतः घ्यावा, वर सांगितलेले क्रमानें मुलांस शिकवावें, आणि ज्या अल्पवयस्क शिक्षकाच्या हाताखालीं तो वर्ग असतो त्यास जवळ ठेवावें म्हणजे मुलांस त्या वेळेपुरता तरी उपयोग घडून त्या शिक्षकास ही शिकविण्याचा मार्ग थोडाबहुत कळूं लागेल. केवळ ज्या मनुष्यास वाचतां येत आहे, त्याला वाचावयास शिकवितां येईल व जो गुणाकार शिकला आहे, त्याला गुणाकार शिकविण्यास हरकत नाहीं; असें ह्मणून मुख्य शिक्षकानें त्यावर विसंबूं नये.

**कोणती ही गोष्ट स्वतः येणें आणि ती शिकवितां येणें, यांत फार अंतर आहे तें विसरूं नये.**—देश काल वर्तमानाप्रमाणें सरासरी योग्यतेच्या मनुष्याचे हातून काम घेण्याचा प्रसंग आला तरी त्यांतले त्यांत सारासार विचार करून अध्यापनक्रम

म्हणजे केवळ घोंकणें, अशा समजुतींपासून होणारे वाईट परिणाम स्वतः मेहनत घेऊन टाळवतील तितके टाळावे.

**पहिल्यानें विशेष उदाहरण सांगून नंतर त्यावरून सामान्य नियम समजावून द्यावाः**—मुलांना प्रत्यक्ष दिसणाऱ्या एखाद्या वस्तूचें नांव घेतलें म्हणजे ती वस्तु सहज समजते. ती च गोष्ट सामान्यरूपानें सांगितली असतां ती त्यांस तशी समजत नाहीं. याचें बीज असें आहे कीं, कोणत्या ही पदार्थाचें सामान्य स्वरूप दृष्टीस पडत नाहीं. हा एक घोडा किंवा दुसरा एक घोडा; असे विशेष घोडे दृष्टीस पडतात. परंतु सामान्यरूपानें घोडा असा पदार्थ दृष्टिगोचर होत नाहीं. आणि जें दृष्टिगोचर होत नाहीं तें मुलांस कसें समजावें? तें समजण्याकरितां दरएक घोड्याचे आंगीं जीं विशेष लक्षणें दृष्टीस पडतात, तीं सोडून देऊन ज्या गुणांच्या योगानें त्याला घोडा असें नांव पडतें ते गुण मनांत आणावे लागतात. हें जें गुणांचें पृथक्करण तें प्रौढ दशेंत ही थोड्यांस च करितां येतें; मग मुलांस कोठून येईल? आधीं जो विषय शिकवायाचा असतो तो समजण्याची विद्यार्थ्यांस अडचण असते च, त्यांतून आणखी ही पृथक्करणाची आणि सामान्यरूपानें पदार्थाचें ज्ञान करून घेण्याची अडचण त्या अडचणीचे भरीस घालावी हें वाईट आहे. भूमितिशास्त्र शिकवूं लागलें ह्मणजे ह्या गोष्टीचा अनुभव तेव्हां च येतो; सामान्य प्रतिज्ञा विद्यार्थी पाठ मात्र करितो, परंतु एखादी आकृति काढून ती प्रतिज्ञा विशेष रूपानें तिजवर बसविल्याखेरीज प्रतिज्ञेचा अर्थ मुलाचे नजरेसमोर उभा राहत नाहीं. यास प्रमाणें सर्वत्र आहेत. सामान्य नियम तोंडानें म्हटला तरी म्हणतेवेळेस किंवा ऐकतेवेळेस विशेष उदाहरण मनांत आणून त्याशीं तो नियम जुळल्याखेरीज मुलांस त्याविषयीं कांहींएक समजत नाहीं. याकरितां प्रथम एक दोन उदाहरणें मुलांचे मनांत पक्कीं ठसवून दिल्यावर मग सामान्य नियम सांगितला तर त्या उदाहरणांच्या साहाय्यानें तो त्यांस ध्यानांत धरितां येईल. मागें भागाकाराचें उदाहरण सांगितलें आहे, तेथें जो सामान्य नियम सांगितला आहे तो हा:-"शेवटल्या बाकीला पहिल्या भाजकानें गुणून त्यांत पहिली बाकी मिळ-

वावी” सहा वर्षांच्या मुलापुढें एवढा नियम किती ही सावकाश आणि स्पष्टपणें म्हणून दाखविला, तरी त्यास समजणें मुष्किल आहे. परंतु प्रथम त्याला सांगितलें कीं, चोंहोंस पांचांनीं गुण आणि त्यांत दोन मिळीव तर त्यास सहज समजेल. नंतर चार काय तर शेवटली बाकी, पांच काय तर पहिला भाजक, आणि दोन काय तर पहिली बाकी, असें त्यांस प्रश्न करून समजवावें, ह्मणजे त्याचे पुढें असलेल्या उदाहरणाचे अंकावरून तो सामान्य नियमाचा अर्थ काढितो. एखादे वेळीं “शेवटली बाकी चार हिला पहिला भाजक पांच याणें गुणून त्यांत पहिली बाकी दोन ही मिळीव” असें फळ्यावर लिहवावें. आणि एक वेळ विशेषरूपानें आणि एक वेळ सामान्यरूपानें असें, तें च वाक्य त्याजकडून वाचवावें. अशा रीतीनें विषय समजावून देण्यास शास्त्रांत लक्ष्यलक्षणसंगति करणें असें म्हणतात. दरएक विषय या प्रकारें शिकविणें म्हणजे मोठें श्रमाचें व कल्पनेचें काम आहे. तरी या रीतीनें सहज शिकवितां येण्याकरितां जे श्रम पडतात त्यांचें फळ ही पुष्कळ येतें. शिक्षकाला आपलें काम योग्य रीतीनें करावयाचें असेल तर त्यानें केवळ पाठ करून घेण्याकडे चित्त ठेवून उपयोग नाहीं. विद्यार्थ्यांस नुस्ती माहिती करून देण्यानें ही त्यांचें काम पुरें होत नाहीं. विद्यार्थ्यांचे बुद्धीवर संस्कार झाला पाहिजे आणि जो विषय पुढें येईल त्यावर विचार करण्याचा त्यांला अभ्यास झाला पाहिजे. हें सिद्ध होईल तर च शिक्षकानें आपलें काम केलें असें म्हणतां येईल. ह्मणून वरील पद्धती साधण्याकरितां जे श्रम शिक्षक करील ते योग्य स्थळीं च होतील; व त्यांपासून फलप्राप्ति झाल्याशिवाय कधीं ही राहणार नाहीं.

**शिकवितांना सोप्या भाषेनें बोलावें:**—प्रश्न विचारतांना त्यांत अवघड शब्द घातले किंवा सोप्या च शब्दांचा असा प्रयोग केला कीं तेणेंकरून स्पष्ट अर्थ समजूं नये तर मुलाला जी थोडीबहुत कल्पना चालविण्याची शक्ति असते, ती प्रश्नाचा अर्थ शोधून काढण्यांत च खर्च होऊन जाते आणि त्यांच्या हातून उत्तर काय द्यावें याचा विचार होत नाहीं. प्रश्नाची भाषा जशी सोपी पाहिजे तशी च अर्थ सांगतांना आणि कोणत्या ही सिद्धांताची उपपत्ति सांगतांना

ही भाषा सरळ आणि सोपी असावी. नाहीं तर सांगितलेलें विद्यार्थ्यांस समजणार नाहीं, आणि सांगण्यांत घालविलेला वेळ व्यर्थ जाईल. मुलांस उपपत्ति आणि अर्थ न समजत अशा रीतीनें सांगण्यांत आणखी एक याहून मोठा दोष आहे, त्यापासून फार दुष्ट परिणाम होतात. तो दोष हा; मुलांना जी गोष्ट आपल्याला समजत नाहीं ती आपण चित्त देऊन ऐकत आहों असें वरकरणी दाखविण्याचा प्रसंग शिक्षकाच्या न समजण्यासारखे बोलण्यानें येतो. अशा प्रसंगीं मुलें केवळ शिक्षकाचे तोंडाकडे मात्र पाहतात, परंतु त्याचे बोलण्याकडे त्यांचें चित्त लागत नाहीं. त्यामुळें शून्य अंतःकरणानें पेंगत बसण्याची विद्यार्थ्यांस संवय लागते, व या संवईमुळें त्यांचें आंगीं आपली बुद्धि चालविण्याचा जो यत्किंचित् उत्साह असतो, त्याचा समूळ नाश होतो. कांहीं शिक्षक लहान मुलांस शिकवित असतां असें बोलतातः—"मक्षिकेचा चरण यद्यपि सकृद्दर्शनीं यःकश्चित् पदार्थ दिसतो, तथापि तत्साध्य जीं जीं कार्यें आहेत, त्यांच्या साधनाविषयीं जे जे योग्यताविशेष परमेश्वरानें आपल्या अचिंत्य योजनेनें त्या चरणांत उत्पन्न केले आहेत त्यांचें विवरण करण्यास मी आरंभ करितों." वयानें प्रौढ आणि थोडींबहूत शिकलेलीं अशीं ही मुलें असलीं, तरी त्यांना सुद्धां असल्या दुर्बोध वाक्याचें अनुसंधान ठेवून त्याचा अर्थ स्पष्ट समजणें अवघड आहे; तेव्हां अर्थात ज्या लहान मुलांस शिकवावयाचें असतें त्यांस त्यांतील अक्षर सुद्धां समजणार नाहीं. असल्या शिकविण्याचा काय उपयोग? प्रत्येक शिक्षकानें असा नियम ठेवावा कीं, आपल्या वर्गास न समजे असें अक्षर सुद्धां वर्गात तोंडानें काढूं नये. जर कोणती ही गोष्ट त्यांना सांगण्यासारखी असेल तर ती त्यांना समजण्यासारखी ही असली च पाहिजे. याकरितां अमुक एक गोष्ट सांगितली तर पाहिजे परंतु ती विद्यार्थ्यांस समजणार नाहीं म्हणून आपण कशी तरी एकदां सांगून टाकावी; म्हणजे आपलें काम झालें; असें शिक्षकानें कधीं ही मनांत आणूं नये. मुलांच्या समजुतीबाहेरची गोष्ट त्यांस सांगूं लागलें असतां ती त्यांना कळत नाहीं आणि जी गोष्ट त्यांना कळत नाहीं तिजकडे त्यांचें चित्त लागत नाहीं.

ज्या अध्यापनापासून मुलांस समजूत पडत नाहीं, आणि त्यामुळें त्यांचें लक्ष तिकडे लागत नाहीं, तें अध्यापन वाईट होय. आपण जें शिकवितों तें फुकट जाऊं नये व त्यापासून विद्यार्थ्यांचें हित व्हावें, असें पंतोजीचे मनांत असेल तर, वर्गाचें चित्त आपल्याकडे लावून घेऊन तें स्थिरपणें तसें च राखणें, हें त्याचें पहिलें काम आहे; परंतु मुलांची वृत्ति चंचळ असते, याकरितां स्थिरपणें लक्ष ठेविल्यापासून त्यांना थोडाबहुत तरी आनंद झाल्याशिवाय तीं कधीं ही तसें स्थिर लक्ष ठेवणार नाहींत. जुलुमानें त्यांनीं ठेविलें असें दाखविलें तरी, तें इकडे तिकडे गेल्याशिवाय राहणार नाहीं. याकरितां मुलांचें चित्त खरोखरी आपल्या शिकविण्याकडे लागावें असें मनांत असलें तर आपल्या शिकविण्याकडे लक्ष दिल्यापासून पदोपदीं मुलांस आनंद आणि उत्साह उत्पन्न होईल अशी तजवीज पंतोजीनें नेहमीं राखिली पाहिजे. मुलांस न समजे अशा रीतीनें बोलूं लागलें तर हें कधीं ही साधणार नाहीं, म्हणून नेहमीं सुलभ आणि सरळ रीतीनें बोलण्याचा पाठ पंतोजीनें ठेवावा. ह्यावरून आपल्या वर्गास ठाऊक नाहींत असे शब्द किंवा अशा वाक्यरचना शिक्षकानें वर्गांत कधीं तोंडांतून काढूं च नयेत असें समजूं नये. असें केलें तर मुलांचें शब्दज्ञान आणि वाक्यरचनेची माहिती हीं कधीं च वाढणार नाहींत. याकरितां शिक्षकानें असा नेम ठेवावा कीं, मुलांस न समजे असा एखादा शब्द अथवा वाक्य आपले बोलण्यांत आलें तर लागले च त्यावर प्रश्न करून वर्गास तें समजलें आहे किंवा नाहीं तें पाहून, समजलें नसेल तर त्याचा अर्थ समजावून द्यावा. एखादेवेळेस नवीन शब्दांचा प्रयोग केला तर लागली च बोलतांबोलतां त्याचा अर्थ सांगून पुढें जावें. मुलांना शब्दांचा अर्थ स्पष्टपणें समजावा आणि त्यांचें त्यांना पक्कें स्मरण राहावें, याला आणखी एक चांगला उपाय आहे तो खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

**अमुक पदार्थाचा बोध होण्याकरितां विशेष शब्दाचें कारण आहे, असें पहिल्यानें दाखवून मग तो शब्द सांगावा.** हें नेहमीं च साधतें असें नाहीं, पण होईल तेथपर्यंत करावें. भूगोल शिकवितांना नकाशावरून असें दाखवावें कीं, पु-

ष्कळ ठिकाणीं दोन्हीं बाजूंस मोठाले जमिनीचे प्रदेश असून त्यांस जोडणारा अरुंद जमिनीचा भाग असतो व त्याच्या दोहों बाजूंस पाणी असतें अशीं दहापांच स्थळें नकाशावर दाखवून अमुक जागा अशा प्रकारची आहे हें दाखविण्याकरितां एवढें लांब वर्णन वारंवार देण्यापेक्षां त्या अर्थी एक शब्द योजिला असतां सुलभ होईल, असें प्रथम सांगून नंतर संयोगीभूमी हा या प्रकारचा शब्द आहे असें सांगावें. ज्या गोष्टीचें अगत्य काय आहे हें समजत नाहीं, ती गोष्ट मनुष्य टाकून देतो अथवा तिकडे लक्ष च देत नाहीं. ज्या गोष्टीची गरज समजली त्या गोष्टीला कोणी ही मान देतो. शब्दाचा ही प्रकार असा च आहे. अमुक पदार्थाचा बोध होण्याकरितां शब्दाची अपेक्षा आहे, असें एक वेळ मुलास समजलें आणि नंतर तो शब्द त्याचे कानीं पडला म्हणजे तो त्याचा आदरपूर्वक संग्रह करितो. आणि मग त्याचें त्याला कधीं ही विस्मरण होत नाहीं. स्मरण राहण्याचें हें बीज ठाऊक असणें हें शिक्षकास फार उपयोगीं आहे आणि याचा चतुर शिक्षकानें नेहमीं उपयोग करावा.

**भाषा सरळ आणि स्पष्ट असली ह्मणजे शिक्षकाचा आशय विद्यार्थ्यांस तत्काळ समजून तो त्यांजपुढें मूर्तिमान् उभा राहतो.** एखाद्या मनुष्याच्या आंगीं बोलण्याची अशी शक्ति असते कीं, तो ज्या गोष्टीचें वर्णन करितो ती गोष्ट प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांपुढें आहे, असें ऐकणारास वाटतें. ज्याच्या आंगीं हा गुण आहे त्याजपाशीं उत्तम शिक्षक होण्याची निमे सामग्री आहे च असें मानिलें पाहिजे. हा गुण थोड्या च लोकांचे आंगीं असतो आणि हा संपादन करण्याकरितां यत्न कसा करावा हें सांगणें ही अवघड आहे; परंतु इतकें मात्र सांगतां येईल कीं, विषयाचें पूर्ण ज्ञान, ज्या भाषेंत शिकवावयाचें त्या भाषेचा पूर्ण परिचय, आणि दुसऱ्याची चित्तवृत्ति बरोबर समजण्याचें सामर्थ्य, यांजपासून तो गुण उत्पन्न होतो. सारांश शिक्षकानें कोणती ही गोष्ट संदिग्धपणें सांगूं नये; बोलणें तें तत्काळ बोध होईल असें बोलावें; आणि ज्या पदार्थाचें वर्णन करावयाचें असेल तो पदार्थ विद्यार्थ्यांचे डोळ्यांसमोर उभा राहील असें करावें.

**पाठ द्यावयाचा त्याचे सर्व भागांचा संबंध मनांत जुळवून ठेवावा.** जेव्हां असा संबंध नसतो, तेव्हां जी माहिती द्यावयाची ती विसकळीत आणि असंबद्ध अशी असल्यामुळें विद्यार्थ्यांचे ध्यानांत राहत नाहीं. ज्या गोष्टींचा परस्पर संबंध असतो त्या गोष्टी ध्यानांत सहज राहतात. असंबद्ध गोष्टी तेव्हां च विसरतात. शिक्षकाचे मनांत अमुक रीतीनें पाठ द्यावयाचा अशी संगति बरोबर लागलेली नसली, म्हणजे त्याचे प्रश्नांत परस्पर संबंध कांहीं राहत नाहीं. असें झाल्यानें पूर्वीं प्रश्नपद्धतीविषयीं लिहिलेला नियम मोडतो. यास्तव जो पाठ द्यावयाचा असेल त्याचा उपक्रम कसा करावयाचा, त्या संबंधानें काय काय गोष्टी सांगावयाच्या, आणि त्याचा उपसंहार कसा करावयाचा, ह्मणजे तो कसा संपवावयाचा, त्याची संगतवार जुळणी करून ठेवून त्याप्रमाणें शिकवावें.

**शिक्षकाला वर्ग चांगला वागवितां आला पाहिजे.** वर्गांत कोणीं कांहीं बोललें, किंवा कांहीं हालचाल केली, किंवा नुसतें एकमेकांकडे खुणेनें पाहिलें, तर तें पंतोजीच्या लक्षांत आल्याशिवाय राहूं नये. याप्रमाणें वर्गावर नजर ठेवितां येणें याचें नांव वर्ग नीट वागवितां येणें. आतां पंतोजीस बरें न वाटेल असे रीतीनें कोणी बोललें, चाललें, अथवा पाहिलें तर त्याबद्दल पंतोजीनें लागलीं च बोललें च पाहिजे असें नाहीं; तर, ज्या मुलाच्या हातून हा प्रकार घडत असेल, त्याला लागली च एक प्रश्न विचारिला, ह्मणजे त्याला नीट वागावयास सांगितल्यासारखें च झालें. पंतोजीची आपणावर एकसारखी नजर आहे अशी विद्यार्थ्यांची पक्की खातरी असली म्हणजे दुर्लक्ष किंवा दांडगाई कांहींएक होत नाहीं. आतां सांगितलें यावरून, मुलांना अगदीं जागचे जागीं खिळून टाकून त्यांनीं अगदीं स्तब्ध राहावें किंवा पंतोजी जें वेडेंवांकडें आणि न समजे असें शिकवीत असेल तें च ऐकत राहावें, असा बंदोबस्त असावा असें कोणी समजूं नये. परंतु शिकविणें अशा स्पष्ट रीतीनें व उत्साहानें चालावें आणि वर्गांतील सर्व मुलें अशीं डोळ्यांच्या दाबांत असावीं कीं, त्यांचें लक्ष एकाग्रतेनें पंतोजीकडे लागल्यावांचून राहूं च नये. जर

पंतोजी वर्गांतील सर्व मुलांकडे लक्ष देईल, तर सर्व मुलें ही त्याजकडे लक्ष देतील. याप्रकारें सर्व वर्गावर लक्ष ठेवावें कसें आणि सर्व वर्गाचें लक्ष आपणावर लावून घ्यावें कसें, याजविषयीं विस्तार मागाहून करितां येईल; त्या पूर्वी एके ग्रंथांतून लहानसा उतारा खालीं दिला आहे त्याकडे लक्ष द्यावें. त्यांतील भाषा आणि विषय, शिकविण्याचे कामांत ज्याचें मन गढलें नाहीं, त्याला समजावयास अवघड आहे; परंतु त्यांत विद्यार्थ्यांचें मन वळवून घेण्याचें चातुर्य शिक्षकाचे आंगीं कसें असतें, हें उत्कृष्ट वर्णिलें आहे. तो उतारा येणेंप्रमाणें. "मुलानें लक्ष लाविल्यासारखें दाखविणें ही गोष्ट वेगळी आहे आणि पंतोजीनें आपणाकडे त्याचें चित्त स्थिरपणें वेधून घेणें, त्याचें सर्व तन आणि मन बुद्धीच्या व्यापारांत तन्मय होऊन जाईल अशी त्याची स्थिति करणें, ही गोष्ट वेगळी आहे. अडाणी पंतोजीस पहिला प्रकार करावा लागतो, दुसरा चतुर शिक्षकाचें लक्षण होय. बाळपणीं मन विकास पावूं लागतें, तेव्हां मुलांचे चित्तांत कांहीं चमत्कारिक चंचळपणा असतो. हा चंचळपणा मुलांचा स्वाभाविक धर्म होय; आणि तो त्यांना अति उपयोगी आहे. फार तर काय परंतु पुढें उत्पन्न होणाऱ्या ज्ञानमय तेजाची ही लहानशी ज्योति च आहे. अडाणी पंतोजी दांडगेपणानें ही ज्योति बुझवून टाकतो आणि मुलांस वळणीस आणिलें, त्यांला शिक्षा लाविली, अशी शेखी मोठे प्रतिष्ठेनें मिरवितो. चतुर पंतोजीस मुलांचा बाळपणाचा चंचळ स्वभाव हें एक साधन च होय. मुलांचे आंगीं जी साहजिक उल्हासवृत्ति असते, ती, ज्या मार्गानें मुलांचें ज्ञान फलद्रूप व्हावें असें त्याला वाटतें, त्या मार्गाकडे तो वळवितो. त्यांचें लक्ष शिकण्याच्या विषयाकडे एकसारखें लाविल्यामुळें त्यांस कंटाळा येऊं लागतो तेव्हां या उल्हासवृत्तीनें च तो त्यांचे आंगीं नवा दम आणितो आणि ज्या मार्गानें विद्यार्थ्यांस नेण्याचें काम आपण पतकरिलें आहे त्या मार्गांत, पदोपदीं आनंद देऊन, त्यांस प्रवृत्त करितो. लहान मुलांचें वाढतें शरीर नेहमीं लवलव हालत असतें. एकसारखें जखडून बसणें त्यांचे हातून घडत नाहीं. तसें च मन ही बाळपणीं प्रफुल्लित होतांना चंचळ असतें. अशा चंचळ-

पणाचें समाधान कसें करावें, हें तो पक्केपणीं ओळखतो; आणि शिकवावयाच्या विषयाचें स्वरूप अनेक तऱ्हांनीं तो त्यांस दाखवितो. तऱ्हेतऱ्हेचे विषय पाहण्याची त्यांची हौस, ज्ञानाचा प्रपंच तऱ्हेतऱ्हेनें त्यांजपुढें पसरून तो यथेष्ट पुरवितो. वर सांगितल्याप्रमाणें शिकविणारा मनुष्य आपलें नेमलेलें काम बजाविण्याविषयीं जसा जागत असतो, तसा च आपले विद्यार्थी मंडळीच्या चित्तवृत्ति बरोबर ओळखण्याविषयीं ही तत्पर असतो. आणि त्यामुळें शाळेंत उठण्याबसण्याचे कामांत मुलांना आपल्या मर्जीप्रमाणें वागविण्याची जशी हुशारी त्याचे आंगीं असते, तशी च मुलांच्या मनाची कोणत्या ही विषयावर प्रवृत्ति अथवा निवृत्ति करण्याचीं सूत्रें त्याच्या हातीं असतात. आतां मुलांचें लक्ष आपणाकडे लावून घेण्यास काय साधनें करावीं, याविषयीं थोडें लिहितों. हे पुढें लिहिलेले नियम वर सांगितलेले दुसरे नियमांप्रमाणें च सर्वत्र उपयोगीं पडण्यासारखे आहेत. ते कांहींसे तपशीलवार असल्याकारणानें त्यांना पाठ चालविण्याकरितां सूचना असें नांव दिलें तर शोभेल.

## पाठ चालविण्याकरितां सूचना.

१ आपण शिकवितों तें सगळ्या वर्गाकरितां आहे हें ध्यानांत ठेवावें.

२ वर्ग शिकवीत असतांना उठून बाहेर जाऊं नये किंवा दुसरें काम करण्याचें मनांत आणूं नये.

३ बहुतेक प्रश्न निर्बुद्ध मुलांस विचारावे.

४ स्पष्ट, जोरानें आणि हुशारीनें बोलावें; परंतु ओरडूं नये किंवा घाईनें ही बोलूं नये.

५ मुलांस ताकीद करणें ती स्पष्ट आणि सर्वांस सारखी करावी.

६ फळ्यावर लिहून दाखवितां येईल तितकें लिहून दाखवावें.

७ वर्गांत आपण विनाकारण इकडे तिकडे फिरूं नये आणि मुलांना जाग्यांवरून उठूं देऊं नये.

८ बोलण्यांत खोड असूं देऊं नये.

**(१) आपण शिकवितों तें सगळ्या वर्गाकरितां आहे हें ध्यानांत ठेवावें:**-ही सूचना ध्यानांत न ठेविली तर वर्गांत दुर्लक्ष आणि अव्यवस्था हीं झाल्याशिवाय राहणार नाहींत. पंतोजी एक दोन च मुलांशीं बोलूं लागला म्हणजे बाकीचीं मुलें सहज च खेळतात. वर्गापैकीं थोड्या मुलांशीं थोडा वेळ सुद्धां बोलत राहणें हा मोठा दोष आहे. एका च मुलानें एखादी चुकी केली, तरी त्याच्या पुरती मात्र ती शुद्ध करूं नये. सगळ्या वर्गाला ती चुकी काय आणि शुद्ध कशी करावी, हें समजेसें करावें. इकडे लक्ष ठेवलें ह्मणजे पंतोजीस एकुण-एक मुलें सावध आणि उद्योगी ठेवितां येतात. वाचून घेत असतां एक मुलगा वाचूं लागला, म्हणजे बाकीच्यांनीं तो काय वाचतो तें लक्षपूर्वक ऐकिलें पाहिजे. म्हणजे मुलगा स्वतः वाचीत असो किंवा नसो, जोंपर्यंत वाचन चाललें आहे तोंपर्यंत स्वतः वाचीत असल्याचें श्रेय सर्व मुलांस सारखें येतें. असें न केलें, आणि पंतोजी एकेका मुलास च घेऊन बसूं लागला, तर असें होतें कीं, पंतोजी जितका वेळ ज्या मुलाशीं बोलत असेल, तितका वेळ च त्याचें पंतोजीकडे लक्ष असतें; यामुळें जर वर्गांत तीस मुलें असलीं आणि पंतोजीनें एक तासभर शिकविलें तर पाळीपाळीनें दर एकाचे वांटणीस दोन मिनिटें येणार, ह्मणजे प्रत्येकाचा दोन मिनिटें अभ्यास व अठ्ठावन मिनिटें खेळणें. ज्या मुलास एक प्रश्न विचारला त्याजपासून दहापांच मुलें सोडून पुढच्यास दुसरा प्रश्न करावा. एक मुलगा चुकला तर ती चुकी नीट करण्याकरितां तेथून दूर एखादा मुलगा बसला असेल, त्याला प्रश्न विचारावा. या युक्तीमुळें सर्व मुलांना सावध आणि चपळ राहवेंसें वाटतें. या विषयावर अधिक सांगणें ह्मणजे फार च बारीक गोष्टींचा पाल्हाळ केला पाहिजे. याकरितां येथें इतकें च सांगणें आहे कीं, ही सूचना अति महत्वाची आहे, व इजकडे ध्यान न ठेविलें तर वर्गाचें काम कधीं ही बराबर चालणार नाहीं.

**( २ ) वर्ग शिकवीत असतांना उठून बाहेर जाऊं नये किंवा दुसरें काम करण्याचें मनांत आणूं नये:**—एका मनुष्याकडे एक च वर्ग असला तरी तो बाहेर गेल्यानें अव्यवस्था

झाल्याशिवाय राहणार नाहीं. मग जर दोन तीन इयत्तांचीं लहान लहान मुलें एका च पंतोजीचे हाताखालीं असलीं आणि तो वर्ग सोडून जाऊं लागला, तर किती अव्यवस्था होईल हें सांगावयास नको. कितीएक पंतोजी, लोकांस अगत्य दाखविण्याकरितां व इतर कांहीं हेतूंनीं, शाळेचें काम नियमित वेळापेक्षां अधिक वेळ करण्याचा पाठ घालितात; मग घरचीं लहानसहान अवश्य कामें करण्यास त्यांस स्वतंत्र वेळ राहत नाहीं. तेव्हां वर्गांत बसून त्या कामाची तजवीज लावणें, अथवा वरचेवर बाहेर उठून जाणें, जरूर पडतें. त्यामुळें मुलांस ही वर्गांत बसून च नानाप्रकारच्या खोड्या करावयास सवड सांपडते. मुलें इतकीं द्वाड नसलीं तर पुस्तक अथवा पाटी पुढें घेऊन उगीच बसण्याची वाईट खोड तरी त्यांस लागते. ही सवय एकदां लागली, ह्मणजे पुढें अधिक च वाढत जाते. याकरितां लहानपणापासून च काम करणें तें एकनिष्ठेनें करण्याची सवय लावावी. एकाहून अधिक वर्ग एका च मनुष्यास चालवावयाचे असल्यामुळें हा नियम एकसारखा पाळणें कांहींसें अवघड आहे; तथापि ही गोष्ट अवश्य आहे, हें पक्कें ध्यानांत राहिल्यानें जेथपर्यंत होईल, तेथपर्यंत तो पाळण्याविषयीं पंतोजी सहज च काळजी बाळगील. निदान शाळेचा ज्या कामांशीं मुळीं च संबंध नाहीं, अशीं कामें, किंवा शाळेसंबंधी पत्रव्यवहार वगैरे, वर्ग चालविण्याचे वेळांत तो कधीं करणार नाहीं.

( ३ ) **बहुतेक प्रश्न निर्बुद्ध मुलांस विचारावेः**—वर्गांत हुशार मुलें असतात, त्यांना बहुतकरून शिक्षकाचें ह्मणणें समजतें. त्यांस प्रश्न विचारून त्यांजपासून उत्तरें घेणें सोपें आहे आणि त्यांत पंतोजीस संतोष ही वाटतो; आणि त्यामुळें त्यांना च वारंवार प्रश्न विचारावे, असा सहज च मोह होतो. परंतु असें च नेहमीं केलें तर बहुतकरून बाकीच्या मुलांचें कांहीं च शिकणें होणार नाहीं. चांगला पंतोजी साऱ्या वर्गभर प्रश्न विचारितो, परंतु जड मुलें असतील, त्यांजवर काळजीनें अधिक मेहनत घेतो. त्यांच्या उत्तरांवरून त्यांना विषय समजला असें दिसून आलें, तर शिक्षकानें खुशाल समजावें कीं, आपण जें वर्गास सांगितलें तें सर्वांस समजलें. अगदीं जड

मुलगा असला तरी त्याची समजूत पडल्याशिवाय शिकविणें पुढें चालवावयाचें नाहीं असा नेम केला तर तो पाळणें अवघड आहे. आणि इतर सर्व नियम पाळण्यास जसा पंतोजीचे आंगीं दृढ निश्चय लागतो तसा हा ही नियम पाळण्यास लागतो; परंतु त्यानें इतकें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, तो असें न करील आणि ज्या मुलांपासून उत्तरें जलद मिळतात, त्यांजपासून च तीं घेऊन समाधान पावेल तर त्यास वर्गाची खरी स्थिति कळणार नाहीं. जें वर्गास समजलें नाहीं, तें त्यास समजलेंस वाटेल, आणि यामुळें झालेल्या अभ्यासाची पुनः पुनः आवृत्ति करणें भाग पडून अखेरीस दुप्पट मेहनत पडल्याशिवाय राहणार नाहीं.

**(४।५) स्पष्ट, जोरानें, आणि हुशारीनें बोलावें; परंतु ओरडूं नये किंवा घाईनें ही बोलूं नये. मुलांस ताकीद करणें ती स्पष्ट आणि सर्वांस सारखी करावीः**—अध्यापनाविषयीं पहिल्या सूचनेंत जें सांगितलें आहे, तें च शिक्षण संबंधानें या दोन सूचनांबद्दल ध्यानांत ठेवावयाचें आहे. त्याजबद्दल विस्तार करण्याचें कारण नाहीं. परंतु या गोष्टीकडे पुष्कळ लोक दुर्लक्ष करितात. पंतोजी एखादेवेळेस हळूच कांहीं तरी हुकूम देतात; तो जवळ जवळच्या कांहीं मुलांस मात्र ऐकूं जातो, इतरांस ऐकूं जात नाहीं; आणि मग तो न पाळल्याबद्दल त्यांजवर ते रागें भरतात. बहुतकरून मुलें समजून उमजून हुकूम मोडीत नाहींत; गैर समजुतीमुळें त्यांच्या हातून हुकुमाची अमान्यता होते. याकरितां वर्गांतील मुलांस जें सांगावयाचें तें सर्वांस समजे अशा रीतीनें मोठ्यानें सांगावें. मुलें लहान असतील, तर एकदां सोडून दोनदां सांगितलें पाहिजे.

**( ६ ) फळ्यावर लिहून अगर काढून दाखवितां येईल तें तसें च दाखवावें:**—फळ्यावर लिहून दाखविल्याखेरीज चांगले रीतीनें शिकवितां येतील असे विषय थोडे च असतात. जें जें म्हणून मुलांना स्पष्ट समजलें पाहिजे असें असेल, तें तें फळ्यावर लिहून दाखवावें; म्हणजे मुलांच्या डोळ्यांसमोर जें समजावयाचें तें प्रत्यक्ष दिसतें, आणि त्याच्या आधारानें ज्या अनेक गोष्टी सांगावयाच्या

असतात, त्या सांगावयास सुलभ पडतें. गणित शिकवितांना फळा असला म्हणजे जी मदत होते तिचें वर्णन करावें तितकें थोडें च. एखादें उदाहरण पुष्कळ मुलांचें चुकलें तर दरएक मुलास चुकी काय आहे, हें वेगवेगळें दाखविण्यांत फुकट वेळ भारी जातो आणि धड कोणास ही समजत नाहीं. असें न करितां पंतोजीनें फळ्यापाशीं जाऊन सर्व मुलांस फळ्याकडे पाहावयास सांगावें आणि उदाहरण करूं लागावें. करितांना ज्या मुलांस उदाहरण अगदीं समजलें नसेल त्यांना बहुतेक प्रश्न विचारून त्यांजपासून उत्तरें घेऊन मग त्याप्रमाणें पुढें पुढें उदाहरण करीत जावें. भूगोल शिकवितांना नकाशा फळ्यावर काढून मोठमोठ्या स्थळांचीं आणि ज्या स्थळांचीं नांवें लिहिण्यास अवघड असतात त्यांचीं नांवें त्या आकृतींत मुलांकडून घालवावीं. तसें च शुद्ध लेखन शिकवितांना जे शब्द मुलांनीं अशुद्ध लिहिले असतील ते फळ्यावर शुद्ध लिहून दाखवावे. मोडी व बाळबोध लिहितांना सुद्धां ज्या अक्षराचें वळण पुष्कळ मुलें चुकत असतील, तें अक्षर आणि त्याचे वेगळाले भाग आपण स्वतः फळ्यावर काढून सर्व मुलांस दाखवावे. कोठें कशी गांठ द्यावी, कमीजाजती वळण कोठें असावें, अक्षराचे संबंधानें काने किती लांब असावे, कोणते रीतीनें लिहिलें असतां अक्षर वाईट दिसतें, वगैरे गोष्टी मुलांचें लिहिणें थांबवून त्यांस समजावून सांगाव्या; असें केल्यानें मुलांचें अक्षर लवकर चांगलें होईल. सर्व वर्गास सारखें शिकवावें, ह्मणून पहिल्या नियमांत सांगितलें आहे, त्याप्रमाणें काम चालविण्यास फळ्यावर लिहून दाखविणें अगदीं अवश्य आहे. फळ्यावर लिहितांना वर्गाकडे फार वेळ पाठ करून राहूं नये, वरचेवर मुलांकडे पाहतां येईल असें करावें. जाग्याच्या लांबीरुंदीच्या व उजेडाच्या सोईप्रमाणें वर्गांत फळा ठेविला पाहिजे. पण बहुशः आपण वर्गाकडे तोंड करून बसलों म्हणजे आपल्या उजव्या हातास फळा येईल असा ठेवावा. आणि त्याच्या पलीकडच्या बाजूस आपण उभें राहावें; म्हणजे लिहिण्यास आणि विद्यार्थ्यांकडे पाहण्यास सोईचें पडतें. आपली पाठ वर्गाकडे असेल तेव्हां मुलांचीं नांवें घेऊन त्यांस प्रश्न करीत असावे ह्मणजे आपण फळ्यावर जें क-

रून दाखवितों त्याकडे वर्गाचें लक्ष आहे कीं नाहीं, तें कळतें. शाहाणपणानें उपयोग केला असतां, जसे फळ्यावर लिहिल्यापासून लाभ आहेत तसे च वेडेपणानें त्याचा उपयोग केल्यापासून तोटे ही आहेत. जर कांहीं चुकलेली गोष्ट फळ्यावर लिहिली तर ती मुलांच्या प्रत्यक्ष दृष्टीसमोर असल्यामुळें त्यांचे मनांत दृढ होते. नुसतें कानांनीं ऐकावें त्यापेक्षां डोळ्यांनीं पाहावें तें मनांत अधिक ठसतें. म्हणून फळ्यावर लिहितांना चुकी केली आणि मागाहून खरें सांगितलें, तरी चुकी मात्र ध्यानांत राहते आणि तोंडानें सांगितलेलें विसरतें. जें मुलांच्या ध्यानांत राहावें, असें आपल्या मनांत असेल, तें जितक्या प्रकारांनीं आणि जितके वेळ सांगवेल तितक्या प्रकारांनीं आणि तितके वेळ पुन:पुन: सांगावें, परंतु जें मुलांनीं ध्यानांत ठेवावयास नको, तें बोलूं सुद्धां नये, आणि फळ्यावर कधीं लिहूं ही नये.

कित्येक शिक्षक, फळ्यावर लिहिणें चांगलें, एवढा सिद्धांत ऐकून उगीच कांहीं तरी फळ्यावर लिहितात, त्यांत कांहीं अर्थ नाहीं. फळ्यावर काय लिहावें आणि केव्हां लिहावें, हें बराबर समजण्यास पुष्कळ अनुभव लागतो. सामान्यत: फळ्यावर लिहिण्याचे उपयोग खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

१ मुलांना प्रश्न विचारीत असतां जे अंक किंवा जें वाक्य सतत मुलांच्या ध्यानांत राहिलें पाहिजे ते अंक अथवा तें वाक्य फळ्यावर लिहिणें उपयोगीं आहे.

२ जी एखादी गोष्ट मुलांस समजावयास अवघड असेल किंवा जिचा आणि इतर गोष्टींचा भेद समजविण्यास अवघड असेल, ती गोष्ट फळ्यावर लिहून दाखविणें उपयोगीं आहे.

३ उदाहरण करून दाखवितांना अथवा शिकवितांना किंवा सिद्धांत शिकवितांना ज्या एखाद्या मुद्यापासून दुसऱ्या कितीएक गोष्टी उघड होतात, तो मुद्दा फळ्यावर लिहून दाखविण्यासारखा होय.

या, व या प्रकारच्या दुसऱ्या गोष्टी, खेरीज करून उगीच जी पाहिजे ती गोष्ट फळ्यावर लिहिल्यानें नफा न होतां उलटें नुकसान मात्र होतें.

**(७) वर्गांत आपण विनाकारण इकडे तिकडे फिरूं नये. आणि मुलांना जाग्यांवरून उठूं देऊं नयेः**—जो पंतोजी सगळ्या वर्गाशीं सारखा बोलतो, त्याला आपल्या जाग्यावरून उठण्याचा प्रसंग बहुशः येत नाहीं. पंतोजीची बसण्याची जागा अशी असावी कीं, तेथून सर्व मुलांवर सारखी नजर पोहंचावी. कोणत्या ही मुलाशीं बोलण्याकरितां, किंवा त्याचें बोलणें ऐकण्याकरितां, उठून त्याजवळ जाणें वाईट आहे. पंतोजीनें बोलावयाचें तें सर्वांस ऐकूं जाईं, असें च बोलावें आणि प्रत्येक विद्यार्थ्यानें ही असें बोलावें कीं, तें पंतोजीस आणि इतर मुलांस स्पष्ट ऐकूं जावें. पाट्या तपासावयाच्या असल्या तर तें करण्याचे दोन मार्ग आहेत. लहानसें उदाहरण किंवा एखादा दुसरा शब्द किंवा एखादें लहानसें वाक्य, पाटीवर लिहावयास सांगितलें असलें, आणि तें तपासण्याकरितां सहज एकदां तिकडे पाहिलें म्हणजे पुरे असें असलें, तर सर्व मुलांना पाट्या घेऊन उभें करावें आणि पंतोजीनें झटकन एकेक मुलाची पाटी पाहून आपल्या जाग्यावर परत यावें. पाटी बरोबर असल्याबद्दल मानेनें खूण करण्याचा अथवा पाटीला हात लावून खूण करण्याचा पाठ ठेवावा. तेवढें न केलें ह्मणजे पाटी चुकली असें सहज समजतें; परंतु जर पाटीवर लिहिण्याकरितां निबंध, कवितेचा अर्थ, किंवा ऐकून लिहिण्याचीं मोठीं वाक्यें दिलीं असलीं, आणि तीं तपासण्याकरितां बरा च वेळ लागण्यासारखा असला, तर एका मुलाकडून सर्व पाट्या गोळा करवाव्या आणि तपासल्यानंतर त्या त्याजकडून च परत करवाव्या. दरएक मुलास जाग्यावरून उठून आपल्याकडे अथवा दुसऱ्या मुलाकडे जाण्यायेण्याचा प्रसंग आणूं नये.

**( ८ ) बोलण्यांत खोड असूं नयेः**—कांहीं ना कांहीं तरी बोलण्याची लकब नाहीं, असे शिक्षक थोडे च. एखाद्याला अशी खोड असते कीं, मुलाच्या बोलण्यांतील शेवटला शब्द घेऊन त्यापुढें 'बरें' असें मोठ्यानें ह्मणावें; कोणाला चुटकी वाजविण्याची सवय असते; कोणी दरएक वेळेस 'कळलें', 'समजलें', 'बरेंका', 'बरेंतर', 'ठीक आहे', असें ह्मणतात; कोणीकोणी पदोपदीं "आतां इकडे

पहा," "जे आहेत ते" इत्यादि शब्दांचा विनाकारण प्रयोग करितात. यांपैकीं दरएक शब्दाचा प्रसंग पाहून उपयोग केला च पाहिजे; परंतु यांपैकीं कोणता ही शब्द नेहमीं तोंडांत असणें हा दोष आहे. म्हणून तसें न होऊं देण्याविषयीं यत्न केला पाहिजे. असली खोड लागूं न देण्याविषयीं जपलें तर ती लागणार नाहीं. परंतु ती एकदां जडली ह्मणजे टाकून देणें अवघड आहे; याकरितां ज्या शब्दाची गरज नाहीं असा शब्द सहसा तोंडांतून काढूं नये; मुलांचें लक्ष आपणाकडे लागण्याकरितां, आपण सांगितलेलें मुलांस समजलें किंवा नाहीं हें पाहण्याकरितां, जीं एका च अर्थाचीं वाक्यें पळोपळीं बोलावीं लागतात, त्यांचे दहापांच प्रकार योजून ठेवून दरएक वेळेस चाळूनपाळून त्यांतला एकेक काढावा. एक वेळ समजलें का ?, असें विचारलें, तर दुसरे वेळेस 'आतां कांहीं शंका राहिली नाहींना ?,' तिसरे वेळेस 'आतां पुरतें कळलें किंवा नाहीं'?, असें विचारावें. या गोष्टींस पहिल्यापासून जपलें तर पुढें श्रम पडत नाहींत.

दरएक मुलास प्रश्न करून प्रश्नांच्या द्वारें च शिकविणें चांगलें आहे, असें वर सांगितलें आहे, त्यासंबंधानें खालीं एक उतारा देतों. यांत मागें सांगितलेल्या कितीएक गोष्टी फिरून येतील खऱ्या; तरी त्या उताऱ्यांतील सूचना काम करतांना फार उपयोगीं पडण्यासारखी आहे आणि सांगितलेला विषय त्यांत फार च स्पष्ट केला आहे. म्हणून जरी तो उतारा लांब आहे तरी तो येथें देतों च:—

"वर्ग पुढें बसवून व्याख्यान देण्यापेक्षां दरएक विद्यार्थ्यास वेगवेगळें विचारून शिकविण्यांत फार फायदे आहेत. मुलांच्या बुद्धि नानाप्रकारच्या असतात. एका प्रकारच्या बुद्धीच्या मुलांत देखील कोणाला बुद्धि कमी, कोणाला अधिक असते. दरएक मुलास वेगवेगळें शिकविलें ह्मणजे, शिकविणें एकंदरीनें दरएक मुलाच्या बुद्धीच्या बेताचें होतें आणि कोणाच्या ही बुद्धीस फारसा ताण पडत नाहीं. मनुष्यमात्राच्या बुद्धींत जेवढे भेद असतात, तेवढ्या सर्वांस थोडें थोडें काम पडून ते सर्व ही वृद्धि पावतात. याकरितां च असें शिकवितांना मुलांच्या बुद्धींचे सर्व प्रकार कामास लावून,

प्रसंगाप्रमाणें नवीन माहिती सांगणें, असेल ती खरी आहे अशी खात्री करणें, अवघड असेल ती समजायास साहाय्य करणें, पुढें अधिक विचार करण्याकरितां वारंवार उत्तेजन देणें, इत्यादि सर्व गोष्टी क्रमाक्रमानें केल्या पाहिजेत. तसें च एका मुलाचे बुद्धीवर जो संस्कार उत्पन्न केला तो सर्वांचे बुद्धीस पोंचावा आणि विशेषेंकरून ज्या मुलाला एखादी गोष्ट समजली नसेल त्याला ती पक्की समजावी असें धोरण मोठे तजविजीनें राखलें पाहिजे. खरें उत्तर सर्वांच्या मनांत पक्कें ठसलें आहे किंवा नाहीं आणि ज्या क्रमानें तें उत्तर निश्चित केलें, तो क्रम सर्वांस सारखा समजला आहे किंवा नाहीं हें पाहण्यास ही फार चातुर्यानें आणि बारकाईनें श्रम केले पाहिजेत. समजा कीं, वर्गांतील एखाद्या मुलानें एखाद्या तोंडच्या हिशेबाचें उत्तर बरोबर दिलें आणि ज्या मुलांना त्याची चाल पुरती ठाऊक नाहीं, त्या मुलांनीं त्या च प्रमाणें मोठ्यानें ओरडून तें च उत्तर दिलें, म्हणजे शिकविणें झालें काय? जे शिक्षक सगळ्या वर्गास एकदम शिकवितों म्हणून ह्मणतात ते बहुधा असा च प्रकार करितात; पण वर उदाहरण घेतलें आहे त्यांत हा प्रकार अगदीं उपयोगीं नाहीं, हें उघड आहे. इतकें च नव्हे, तर जेथें जेथें केवळ स्मृतीखेरीज थोडी तरी अक्कल चालविण्याचें काम आहे, तेथें तेथें हा प्रकार अगदीं निरुपयोगी आहे, असें सर्व कबूल करतील. प्रत्येक मुलास प्रश्न विचारून शिकविणाऱ्या पंतोजीचें काम इतकें जलद होणार नाहीं, पण तें याहून फार अधिक पक्कें होईल यांत तिळमात्र संशय नाहीं. मुलांस शिकवीत असतांना एखादा प्रश्न विचारिला, म्हणजे जितक्या मुलांना उत्तर येत असेल तितक्यांनीं हात पुढें करण्याचा क्रम फार उपयोगी आहे. त्यावरून उत्तर कितीकांना सुचतें, हें तेव्हां च समजतें. प्रश्न जसा सोपा किंवा अवघड असेल तशी हात पुढें करणारांची संख्या अधिक उणी असते. पंतोजीनें पुढें हात कोणी कोणी केले आहेत हें पाहून अंमळ कमी बुद्धिवान्, किंवा कमी धीराचीं मुलें असतील, त्यांना विचार करून उत्तर देण्याचा यत्न करण्यास उत्तेजन द्यावें. प्रश्न सोपा असून

फार च थोड्या मुलांनीं हात पुढें केले असले तर त्या प्रश्नाचें रूप उलटून अधिक सोपा होईल, असें करावें. चांगल्या शिक्षकानें मुलांनीं हात पुढें केल्यावर तरी उत्तर घ्यावयाचें तें अगदीं मंद मुलें असतील त्यांजपासून च घ्यावें म्हणजे तें अशुद्ध असलें, तर त्यांत काय चुकी आहे ती गोड शब्दांनीं समजून सांगावयास त्यास सहज च संधी सांपडते. चुकी सांगतांना तरी, ती चुकी विद्यार्थ्यांचे मनांत कशी उत्पन्न झाली, हें शिक्षकास तत्काळ समजलें पाहिजे. म्हणजे चुकीची दुरुस्ती नीट रीतीनें होऊन कोणत्या ही विषयावर निर्दोष विचार कसा करावा, हें सर्व विद्यार्थ्यांस समजतें. अति मंद मुलांपासून जें उत्तर घेतलें तें शुद्ध च असलें तर अर्थात काम पुढें चालेल. आणि वर्गांतील कनिष्ठ मुलांची योग्यता किती आहे, याचें मान शिक्षकास बरोबर समजेल; आणि पुनः अति सोपा प्रश्न न विचारण्याची सावधगिरी त्यांस राखतां येईल. एखादे वेळेस ज्या मुलास पहिल्यानें विचारिलें, त्यानें बरोबर उत्तर दिलें तरी शिक्षकास कारण वाटल्यास हात पुढें केलेल्या मुलांपैकीं दुसऱ्या एखाद्या मुलाचें ही उत्तर ऐकावें आणि गरज असेल तर तें शुद्ध करण्याचा ही प्रकार पहिल्याप्रमाणें करावा. सर्व वर्गांतील मुलांचें लक्ष जागृत राहावें, यासाठीं शिक्षकास नेहमीं झटलें पाहिजे आणि अनुभवा अंतीं त्याची अशी खात्री होईल कीं, कसला ही विषय हातीं घेतला असला, तरी प्रश्न उत्तम रीतीनें योजिले असतां मुलांचें लक्ष जागृत ठेवितां येईल. प्रश्न विचारावयाचे ते मुलांचे चित्तास हुशारी येण्यासारखे असले म्हणजे विषय कोणता ही असला तरी त्यांस आळस येत नाहीं. हे प्रश्न फार सोपे ही असूं नयेत आणि उत्तर सुचण्याची मुलांची निराशा होईल इतके अवघड ही असूं नयेत. पण ते अशा प्रकारचे असावे कीं, आपण आपल्या च मतें दुसऱ्याला विचारल्याशिवाय मनापासून यत्न केला तर आपणास उत्तर सुचेल, अशी विद्यार्थ्यांस हुशारी राहावी. वर्ग करते-वेळेस चांगले जपून केले असले, आणि वर्गांतील उत्तम आणि कनिष्ठ मुलें ह्यांजमध्यें अतिशय तफावत नसली, म्हणजे वर सां-

गितल्याप्रमाणें योजून प्रश्न विचारण्यास मोठी अडचण पडत नाहीं; आणि असे बेताचे प्रश्न विचारावयास सांपडतात कीं, त्यांच्या योगानें उत्तम प्रतीचीं मुलें असतील त्यांना आपणांस येत आहे तें च पुनः पुनः चाललें आहे असें वाटून कंटाळा येत नाहीं आणि कनिष्ठ मुलें यांत आपली बुद्धि चालत नाहीं असें म्हणून निरुत्साह होत नाहींत. जर शिक्षकाच्या कृतीवरून विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर घेण्याची त्याची खरी हौस उघड होत आहे आणि शिक्षक व विद्यार्थी यांजमध्यें जी परस्पर एकचित्तता अवश्य असावी ती आहे, तर या पद्धतीनें काम चाललें असतां मुलांची उत्तर देण्याविषयीं अतिशय उत्सुकता दृष्टीस पडेल. ही उत्सुकता नको नको म्हटल्यासारखें करून वाढविली पाहिजे. हें काम नाजुकपणानें करण्यास फार च चातुर्य लागतें. मुलगा उत्तर देण्याची फार उत्सुकता दाखवूं लागला आणि कांहीं वेळपर्यंत त्याला उत्तर देण्याचा प्रसंग न देतां त्याला तसा च दाबून ठेविला म्हणजे असें होतें कीं, जर तो फटदिशीं अंमळसें अशुद्ध उत्तर देणार असला तर तें दुरुस्त करण्यास त्याला सवड सांपडते आणि त्याचा उत्साह ही अतिशय वाढतो. शिकविण्यांत अतिमहत्वाची वेळ ही च आहे; या वेळेस जी मनाची आसक्ति असते व कल्पनेचें आणि उत्साहाचें त्या विषयाचा विचार करण्याचे कामीं जें तन्मयत्व होतें, त्याहून शिक्षकास कांहींएक अधिक नाहीं. त्याचे सर्व यत्न ही स्थिति उत्पन्न करण्याकरितां च असतात; आणि उत्तर हें केवळ त्या स्थितीचें अवसान होय. विद्यार्थ्यांस उत्तर सुचल्यापासून तें देई तोंपर्यंत जो बुद्धीचा प्रबळ व्यापार चालतो त्यापुढें जें उत्तर मुलांपासून घ्यावयाचें तें कांहीं च नाहीं; परंतु जशी दोरी अतिशय ओढतां ओढतां केव्हां तरी तुटते, तसा मुलांचा उत्साह वाढविण्यासाठीं त्याला दाबून ठेवतां ठेवतां केव्हां तरी त्याचा भंग होतो, याकरितां शिक्षकानें फार ओढून आणतां कामास नये. हा उत्साह कोठपर्यंत कायम राहील हें सांगतां येत नाहीं. याजविषयीं अनुभव घेतां घेतां शिक्षकाला जशी काय एक प्रकारची आंगची बुद्धि च उत्पन्न होते. वर सांगितलेल्या

धोरणानें विद्यार्थ्यांपासून काढलेलें उत्तर जरी मतलबांत बराबर असलें तरी त्याच्या वाक्यांत भाषेच्या शुद्धतेच्या संबंधानें एखादा दोष असेल किंवा दुसरी कांहीं किरकोळ चूक असेल. असें असलें तर ज्या मुलानें येथपर्यंत आपली हुशारी दाखविली, त्याला च आपलें वाक्य पूर्णपणें शुद्ध करण्याची सवड द्यावी, व त्याच्या हातून तें न झालें तर, त्याच्या उत्तरांतील दोषाबद्दल पुनः पहिल्याप्रमाणें प्रश्न विचारावा. असें केल्यानें मुलांची शुद्ध आणि नियमित प्रकारें बोलण्याची शक्ति वाढत जाते. लहान मुलांना शिकवितांना इकडे कोणी फारसें लक्ष देत नाहीं, परंतु हें फार उपयोगी आहे आणि पुढें व्याकरण वगैरे शिकवावयाचें असतें त्याचा उपक्रम या रीतीनें चांगला होतो. परंतु दरएक मुलगा आपल्या बुद्धीप्रमाणें साध्या रीतीनें आणि पारिभाषिक शब्दांचा प्रयोग केल्याखेरीज जें उत्तर देईल त्याचा आशय चांगला मनांत आणून तें मोठ्या संतोषानें स्वीकारावें. अभ्यासानें याप्रमाणें मुलांचें हृद्गत शिक्षकास लवकर लवकर समजूं लागतें. आणि या रीतीनें नीट पाठ देतां देतां मुलांच्या चुक्या ही कमी कमी होऊं लागतात. दरएक विद्यार्थ्यास वेगवेगळाले प्रश्न विचारून अध्यापन करण्याची पद्धति शहाणपणानें चालविली असतां मुलें दगडासारखीं निर्जीव बसणार नाहींत आणि शिकविण्याचें काम हीं मजुरीसारखें कंटाळवाणें होणार नाहीं. असें शिकवीत असतां एकमेकांच्या कल्पना साहजिक रीतीनें एकमेकांस कळून जो सर्वांस संतोष होतो आणि विचारशक्ति वाढत जाते, ती पाहिल्यानंतर सामाजिक पद्धति म्हणजे सगळ्या वर्गाला एकदम सांगावयाचें आणि सगळ्यांचीं उत्तरें एकदम ऐकावयाचीं, ही पद्धति पाहिली तर मनास कंटाळा येतो. कोणी म्हणेल कीं, या दुसऱ्या पद्धतीपासून मुलांना अधिक येऊं लागतें. परंतु आधीं ही गोष्ट खरी च नाहीं; व कदाचित् असली तरी हा विचार केला पाहिजे कीं, सामाजिक पद्धतीनें जें अधिक ज्ञान मुलांस येतें, तें ज्ञान कोणत्या प्रकारचें असतें; कोणाच्या ही सहज ध्यानांत येईल कीं, शाळा सोडतांक्षणीं च ज्या गोष्टी विसरण्यास आरंभ होतो, असल्या गोष्टी मात्र त्या पद्धतीनें

मुलांस अधिक येऊं लागतात; परंतु त्यांचा उपयोग काय ? व्यक्ति-विशिष्ट शिक्षणपद्धतीनें जें शिकवावें, तें मुलांच्या मनांतील इतर माहितीशीं एकरूप होऊन कधीं न विसरे असें होतें, आणि मुलांची आपलें ज्ञान वृद्धिंगत करण्याची इच्छा व शक्ति अधिक अधिक होत जाते. याप्रकारें सर्व शिक्षणाचा आणि अध्यापनाचा जो अति उत्तम उद्देश, म्हणजे मनुष्यांमध्यें स्वतः ज्ञानसंपादन करण्याची शक्ति आणि अभ्यास वाढावा हा, तो यथास्थित सिद्धीस जातो.''

---

## विद्यार्थ्यांचें मन आकर्षण करून घेणें व त्यांची बुद्धि प्रौढ दशेस आणणें.

अध्यापन प्रकरणांतील हा तिसरा भाग आहे असें मागें पृ० १०४ यांत सांगितलें आहे, परंतु हा सर्व विषय वस्तुतः मागील दोन भागांत येऊन चुकला. कारण, शिक्षकाला जें सांगावयाचें तें मुलांस समजे अशा सोप्या रीतीनें सांगतां आलें म्हणजे त्यांचें लक्ष लागण्याकरितां आणि त्यांची बुद्धि वाढविण्याकरितां वेगळे श्रम करावयास नकोत. म्हणून आतां या विषयावर अधिक कांहीं सांगण्याची जरूरी नाहीं. इतकें मात्र ध्यानांत ठेवावें कीं, दरएक पाठ झाल्यानंतर, किंवा कधीं कधीं पाठाचा एखादा भाग सरल्यावर ही, मुलांनीं लक्ष दिलें किंवा नाहीं आणि त्यांना विषय समजला किंवा नाहीं हें पाहण्याकरितां परीक्षा घेत जावी. हे परीक्षेचे प्रश्न जलद जलद विचारावे आणि ते असे असावे कीं, त्यांपासून मुलांना विषय वास्तविक समजला आहे कीं नाहीं हें उघड व्हावें आणि त्या पाठांत ज्या मुद्याच्या गोष्टी असतील त्या सर्वांची उत्तरांच्या रूपानें आवृत्ति व्हावी.

## शाळेंत नित्य आणि नेमलेल्या वेळीं येणें.

विद्यार्थी नित्य आणि नेमलेल्या वेळीं शाळेंत आले तर शिकविणें व्यवस्थितपणें आणि वेळच्या वेळीं होईल. म्हणून या दोन्ही गोष्टी शाळेचें काम चांगलें चालण्यास अवश्य आहेत. पूर्वीं सांगितलें

आहे कीं, अध्यापन सर्व वर्गाच्या सारखें उपयोगी असावें. विद्यार्थी शाळत नित्य न आल्यास अध्यापनाचे आंगीं हा सारखा उपयोगीपणा राहत नाहीं. कारण, जे मुलगे मधून मधून गैरहजर राहतात, त्यांना पाठ चांगला समजत नाहीं; कारण उत्तम पंतोजीचे पाठ एका मागून एक क्रमानें सांखळीच्या कड्यांसारखे जुळलेले असतात त्यांतून मधले च कांहीं विद्यार्थ्यानें ऐकले नसले म्हणजे जी नवीन माहिती पंतोजी सांगतो तिचा त्या विषयाचे इतर भागांशीं काय संबंध आहे, हें त्यास पुरतें समजत नाहीं. मागील पाठ माहीत नसल्यामुळें पुढले पाठ ही समजत नाहींत. ज्या गोष्टी त्याच्या कानांवर पडतात त्यांचा परस्पर कांहीं संबंध नाहीं असें त्यास वाटतें. अशा मुलांना चाललेला पाठ समजत नाहीं, म्हणून त्याची त्यांना गोडी लागत नाहीं, आणि गोडी न लागली म्हणजे पाठ चालला असतां ते उत्साहानें पाठ शिकत नाहींत. यामुळें त्या नेहमीं न येणाऱ्या मुलांचें मात्र नुकसान होतें असें नाहीं, तर सर्व वर्गाचें ही नुकसान होतें. कारण, दुर्लक्ष करणारीं पांच चार मुलें वर्गांत असलीं ह्मणजे तेणेंकरून पंतोजीचे हातून जसें शिकविणें व्हावें तसें होत नाहीं. असे थोडे च शिक्षक असतात कीं, कितीएक मुलें लक्ष देवोत अगर न देवोत त्यांचा पाठ जसा उत्साहानें चालावा तसा उत्साहानें चालावयाचा च. कित्येकांना तर अशीं दुर्लक्ष करणारीं मुलें असलीं तर वर्ग संभाळितां च येत नाहीं आणि वर्गांत बंडाळी झाल्यानें त्यांच्या शिकविण्याचा व्हावा तसा उपयोग घडत नाहीं. या उघड दिसणाऱ्या दोषाशिवाय मुलांच्या अव्यवस्थित येण्यानें दुसरें फार वाईट प्रकारचें नुकसान आहे, तें इतकें लवकर लक्षांत येत नाहीं. विद्यार्थ्याला आज थोडेंसें सांगितलें आणि पुष्कळ वेळ मध्यें गेल्यावर त्याशीं असंबद्ध असें दुसरें कांहीं त्याच्या कानीं पडलें तर त्याचा काय उपयोग होणार आहे? ज्या गोष्टी ऐकण्यांत येतील त्यांजवर विचार करावयाची, त्या ऐकमेकांशीं ताडून पाहण्याची, आणि त्यांमध्यें परस्पर संबंध काय आहे, हें शोधून काढण्याची शक्ति विद्यार्थ्यांचे आंगीं अधिकाधिक यावी, हा शिक्षणाचा

मुख्य उद्देश आहे. केवळ घोंकविण्याहून शिक्षण भिन्न ह्मणावयाचें, तें ह्याकरितां कीं, शिक्षणापासून ही वरील सांगितलेली विद्यार्थ्यांची शक्ति वाढावी. पूर्वीं शिक्षकापासून ऐकलें त्याचा आणि आज ऐकलें त्याचा काय संबंध आहे, हें विद्यार्थ्यांस समजलें नाहीं, तर त्यांची कल्पनाशक्ति वगैरे वाढविण्याचें नांव च घ्यावयास नको. सारांश विद्यार्थी शाळेंत नित्य न आल्यानें त्यांची बुद्धि प्रौढ दशेस आणण्याचा जो शिक्षणाचा मूळ उद्देश तो सर्वथा बुडून जातो.

मागील विषय माहीत नसल्यामुळें आपल्या वर्गांतील बऱ्या च मुलांस आपण सांगतों तें समजत नाहीं आणि त्यामुळें आपण मनापासून जे श्रम घेतों, ते फुकट जातात; असें पाहिलें ह्मणजे शिक्षकाचें मन अस्वस्थ झाल्याशिवाय राहत नाहीं. कितीएक या कारणामुळें वारंवार रागावतात, त्यामुळें शिकविणें बरोबर होत नाहीं. मुलें शाळेंत नित्य न आल्यामुळें घडणारे वाईट परिणाम अनेक आहेत; त्यांतील वर सांगितलेले मुख्य आहेत.

**नेमलेल्या वेळीं शाळेंत न येणें**:—हा दोष नित्य न येण्यापेक्षां ही एका प्रकारानें अधिक घातक आहे असें म्हटलें तरी चालेल. मुलें नित्य न आल्यामुळें जें नुकसान होतें, तें फारकरून नित्य न येणाऱ्या मुलांचें च होतें. परंतु नेमलेल्या वेळीं मुलें न आल्यानें जें नुकसान होतें, तें वेळचे वेळेस येणारे मुलांचे ही वांटणीस येतें. नेमलेली वेळ झाल्यावर घटका अर्धी घटका झाली तरी शाळा न भरणें आणि मग उशीर झाला म्हणून साऱ्यांनीं गर्दी गर्दीनें आणि घोंटाळा करून येणें या गोष्टी सुरळीतपणें शिकविण्यास फार प्रतिबंधक आहेत. हा पहिला घोंटाळा सरासरी आटपून धडा सुरू केला तरी तो स्वस्थपणें आणि वेळ फुकट जाऊं दिल्याशिवाय चालविणें अवघड आहे. कारण, वेळोवेळीं कोणी तरी उशीर झालेला मुलगा येऊन उशीरां येण्याचें कारण सांगूं लागेल, तो शिकविण्याचे कामांत हरकत आणणार च. किंवा माझ्या मुलाला अमुक अमुक कारणासाठीं उशीर झाला असें सांगण्याकरितां कोणी वडील मनुष्य येईल, त्याशीं बोलण्याकरितां उठावें लागणार च. हा सर्व घोंटाळा

शाळेचें काम चालू होण्याचे वेळेस च होतो. आणि ती वेळ तर मोठी महत्त्वाची आहे. कारण, एक तर बहुतकरून पहिला धडा महत्त्वाचे विषयाचा असतो; दुसरें, त्या वेळेला मुलें ताजीं आणि हुशार असतात; आणि तिसरें, एकदां शाळेंत येण्याबरोबर पहिल्या तासांत जर काम हुशारीनें सुरू झालें तर दिवसभर तसें च चालतें आणि एकदां मुलें आळसलीं ह्मणजे सारा दिवसभर तशीं च राहतात. नेहमीं नेमलेल्या वेळीं नेमलेलें काम करणें अवघड आहे. पण कोणती ही अवघड गोष्ट वारंवार केल्यानें सुलभ होते. वारंवार गोष्ट केल्यानें च संवय लागते. आणि एकदां संवय लागली म्हणजे कांहीं सुद्धां अवघड वाटत नाहीं. नेमलेल्या वेळीं काम करण्याची संवय मनुष्याला पुढें रोजगार धंद्यांत यश मिळविण्यास उपयोगीं पडते, तितकी दुसरी कोणती ही गोष्ट उपयोगीं पडत नाहीं. या अनियमितपणामुळें आणि यापासून सहज उत्पन्न होणाऱ्या आजचें काम उद्यांवर ढकलण्याच्या खोडीमुळें कितीएक मोठमोठ्या बुद्धिवान् पुरुषांचें जन्माचें नुकसान झालें आहे. आपल्या लोकांपेक्षां इंग्रज लोक नियमित वेळीं काम करण्याची शिस्त फार जपून ठेवितात, त्यामुळें त्यांचे हातून उद्योग फार होतो. आपल्या इकडे ही जुन्या चालीचे लोकांत हा गुण अधिक असल्याचें आपल्या ऐकण्यांत आहे. एके इंग्रजानें म्हटलें आहे कीं, नाना फडणवीस याची वेळच्या वेळीं काम करण्याची शिस्त अपूर्व होती व त्यामुळें त्या पुरुषाचे हातून दररोज जितकें काम होत असे, तितकें करणारा युरोपियन् देखील विरळा. पाहांटेस लवकर उठून स्नान करणें, नमस्कार किंवा इतर शारीर व्यायाम करणें, संध्याकाळीं देवदर्शनाकरितां अथवा दुसऱ्या कामाकरितां मोकळे हवेवर फिरून सूर्यास्ताचे वेळेस घरीं येणें, इत्यादि वृद्ध लोकांच्या चाली कित्ता घेण्यासारख्या आहेत. त्यांकडे दुर्लक्ष करून पाहिजे त्या वेळीं पाहिजे तो व्यवहार करण्याचा प्रकार अलीकडे आपल्या लोकांत फार शिरला आहे; तो काढून टाकून, आपण व विद्यार्थ्यांनीं नियमित आणि निरालस्य व्हावें, याविषयीं सर्व शिक्षकांनीं यत्न केला पाहिजे.

कारण, विद्यार्थी शाळेंत असतां जें त्याचे हातून काम व्हावयाचें, त्याजकडे अथवा पुढें मोठेपणीं त्याचे हातून जीं प्रपंच्याचीं अथवा इतर कामें व्हावयाचीं, त्यांजकडे बारीक लक्ष देऊन पाहिलें असतां त्यानें रोजचें काम रोज करणें, आणि तें वेळचे वेळेस करणें, हें अगदीं अवश्य आहे, यांत संशय नाहीं. याकरितां ती गोष्ट साधण्याविषयीं काय काय साधन केलें पाहिजे, याचा विचार करणें योग्य आहे. हा विचार करतेवेळीं प्रथम गोष्ट लक्षांत येते ती ही कीं, "यथा राजा तथा प्रजा" हा नियम शिक्षक आणि विद्यार्थी यांस ही लागू आहे. शिक्षक गाफील आणि मुलें व्यवस्थित किंवा शिक्षक लबाड आणि मुलें खरें बोलणारीं, असें सहसा घडत नाहीं. त्या च प्रमाणें शिक्षक पाहिजे ते वेळेस येणार, आणि विद्यार्थी मात्र वेळच्या वेळेस येणार, असें ही कधीं घडावयाचें नाहीं.

मुलांनीं नित्य शाळेंत यावें याकरितां खालीं लिहिलेले नियम ध्यानांत ठेवले पाहिजेत.

१. शाळेचे कामावर मुलांचें मन लागे असें करावें.

२. आपल्या शिकविण्यापासून फार उपयोग आहे अशी लोकांची पक्की खातरी करावी.

३. दरएक मुलाची रोजची हजेरी मांडण्याकरितां हजेरीवही ठेवावी.

४. मुलें गैरहजर असलीं म्हणजे त्यांच्या घरीं लिहून कळवावें.

यांपैकीं पहिला नियम फार महत्त्वाचा आहे. त्याचें महत्त्व इतकें आहे कीं, शाळा चालविण्याची सर्व गुरुकिल्ली त्यांत च आहे, म्हटलें तरी चालेल. ही एकवेळ हातीं लागली म्हणजे शाळेसंबंधी सर्व काम हस्तगत झालें, असें समजावें. हा नियम पाळण्यास मुख्य साधन म्हटलें म्हणजे उत्साहपूर्वक आणि सर्व मुलांस सहज समजे असें शिकविणें हें होय; त्या शिकविण्याबरोबर शहाणपणानें आणि दृढपणानें व्यवस्था ठेवण्याचा ही गुण शिक्षकाचे आंगीं असावा. इतकें असून, म्हणजे शिकविणें समजे असें आणि उत्साहपूर्वक असावें असें जें मागें सांगितलें, तसें असून ज्या गोष्टी मुलांच्या नित्य ऐकण्यांत व पाहण्यांत असतात, त्यांशीं त्याचा निकट संबंध असला, व

नित्य व्यवहारांत तें त्यांच्या उपयोगीं पडण्यासारखें असलें, तर मग त्यांचें चित्त शाळेचे कामाकडे फार च उत्कृष्ट रीतीनें लागेल. अध्यापनाचा मुलांस वास्तविक उपयोग व्हावा आणि त्याची थोरवी त्यांस समजावी, असें मनांत असलें तर, रोजच्या कामांत त्यापासून आपणांस काय लाभ होईल, हें मुलांच्या ध्यानांत आणून दिलें पाहिजे. असें केल्यावर 'असल्या शिकण्यांत काय आहे?' असें म्हणून तीं त्याची हेळसांड करणार नाहींत. पुस्तकांतून जें मुलें वाचतात, त्याचा आणि व्यवहारांतील गोष्टींचा संबंध जुळवून दाखविला पाहिजे, ही गोष्ट नेहमीं ध्यानांत ठेवावी. पुस्तकांतील आशयावरून, व्यवहार कसकसा असतो, हें प्रथम दाखवावें; आणि पुनः व्यवहारांतलीं उदाहरणें घेऊन जें पुस्तकांत सांगितलें असेल, त्याच्या खरेपणाविषयीं समजूत घालावी. तात्पर्य, आपण जें पुस्तकांत वाचतों, तें कांहीं तरी, दृष्टिगोचर सृष्टीपासून अगदीं भिन्न आहे, व त्याची आणि आपली अगदीं ओळख सुद्धां नाहीं, असें मुलांस वाटूं नये; उलटें त्यांना असें समजावें कीं, आपणांपूर्वी झालेल्या लोकांनीं जें प्रत्यक्ष या सृष्टींत पाहिलें आणि त्यापासून ज्या गोष्टी त्यांच्या मनांत आल्या, त्यांचा च उल्लेख पुस्तकांत आहे आणि त्या च वस्तु किंवा त्यांसारख्या इतर वस्तु नित्यशः आपल्या दृष्टीस पडताहेत आणि आपण बुद्धिपुरःसर डोळे न मिटले, तर त्यापासून हजारों कल्पना आपणांस सुचण्यासारख्या आहेत. मुलांस आणखी असें वाटावें कीं, जें आपण पुस्तकांत वाचतों, त्याचीं उदाहरणें शोधण्यास लांब जावयास नको. जे पदार्थ आणि जीं कृत्यें नित्यशः आपल्या पाहण्यांत आहेत, त्यांत च त्यांचीं अतिउत्कृष्ट उदाहरणें दृष्टीस यावयाजोगीं आहेत. याप्रमाणें, शिकविणें अगदीं सुलभ आणि रोजच्या व्यवहारांतील गोष्टींच्या संबंधाचें असावें, ही तजवीज ठेवीत असतां सर्व शिक्षणाचा जो मुख्य उद्देश त्याजकडे दुर्लक्ष करूं नये. तो उद्देश मुलांची बुद्धि प्रौढ दशेस यावी आणि त्यांस कार्याकार्यभाव समजावा, हा होय. वास्तविक पाहतां वर जो शिक्षणाचा प्रकार सांगितला, तो च मनापासून चालविला तर मुलांची बुद्धि विकसित झाल्यावांचून कधीं ही

राहणार नाहीं. कारण, जरी अध्यापनाचे उद्देश सांगत असतां अमुक एक विषयानें मुलांच्या बुद्धीवर फार ओझें पडतें, शिकण्यानें मुलांचें मन कंटाळून जातें, इत्यादि लिहिण्यावरून कठीण विषयाचा अभ्यास करणें हा बुद्धीच्या व्यापारास प्रतिकूळ असा उद्योग आहे, असें दिसतें; तरी एक गोष्ट मोठी ध्यानांत ठेवण्यासारखी आहे, ती ही कीं, मनुष्य जसजसें अधिक ज्ञान संपादन करितो, आणि तें चिंतनाच्या अभ्यासानें दृढ करितो, तसतशी त्याची ज्ञान संपादन करण्याची आणि स्मरण ठेवण्याची शक्ति अधिक अधिक वाढते. यास उदाहरण दुसरें घ्यावयास नको. शरीराचें च पहा. कोणते ही जातीचे श्रम करण्यानें मनुष्य थकतो. त्यामुळें असें वाटतें कीं, श्रम करणें हा व्यापार शरीररचनेस अनुकूळ नाहीं, असता तर, त्यापासून कंटाळा आणि थकवा कसा आला असता? परंतु हें सर्वांच्या अनुभवास आलें आहे कीं, शारीरश्रम नित्य नित्य केल्यानें शरीर क्षीण न होतां उलटें बळकट होऊन त्याची श्रम सोसण्याची शक्ति वाढत जाते. याप्रमाणें च मनाचें ही आहे, कोणत्या ही विषयाचा अभ्यास करीत असलें ह्मणजे तेणेंकरून त्या वेळेस बुद्धि थकून जाते खरी, परंतु याप्रमाणें वारंवार केल्यानें तिचें सामर्थ्य वाढतें; जसें शरीरास अन्न तसें बुद्धीस ज्ञान होय. श्रमाच्या योगेंकरून अधिक अन्नाचें पचन झालें असतां शरीर बळकट होऊन पचनाची शक्ति वाढते. त्याप्रमाणें अभ्यासानें अधिक ज्ञान संपादन करून तें मनांत मुरलें म्हणजे तेणेंकरून च उत्तरोत्तर बुद्धि निर्मळ आणि प्रबळ होते. विचारशक्ति वाढल्यानें मनुष्याला काय करावें आणि काय न करावें, हें अधिक समजूं लागतें; आणि आपल्या मनाच्या निश्चयानें जें सत्कार्य ठरलें तें करण्याची व अकार्य ठरलें तें न करण्याची शक्ति वाढते हें पूर्वीं एकवेळ थोडक्यांत सांगितलें च आहे, त्याचें विस्मरण होऊं नये म्हणून येथें उगीच दिक्प्रदर्शन मात्र केलें आहे. विद्येचा आणि कार्याकार्यविचारशक्तीचा फार निकट संबंध आहे. ज्याची विद्या खरी आहे, त्याची शास्त्रादिकांतील खरी गोष्ट कोणती याचा पक्का शोध लावण्याची आणि त्याविरुद्ध जेथें जेथें समजूत

अगर व्यवहार असेल तेथें तेथें आपलें मत प्रतिपादन करून वास्तविक गोष्टींचें ज्ञान आणि प्रचार वाढविण्याची इच्छा त्याजमध्यें प्रबळ असते. या च इच्छेची व्यवहाराकडे योजना केली म्हणजे च त्याला सत्यशीलता असें म्हणतात. शास्त्रादिकांचें खरें ज्ञान संपादन होण्याकरितां मनांतील सर्व आग्रह सोडून देऊन मुलाप्रमाणें निरभिमानपणानें विचार करावयास आरंभ करावा लागतो. इतर मनुष्यांशीं या च बुद्धीनें आचरण केलें म्हणजे त्याला लोक नम्र असें म्हणतात. सारांश विद्वान् होण्यास जे गुण, वृत्ति, इत्यादि लागतात, त्यांच्या च योगानें मनुष्याच्या आंगीं सौजन्य ही येतें. याकरितां शिकवितेवेळेस आपल्या शिकविण्यापासून सत्यासत्यविचार आणि कार्याकार्यविचार हे दोन्ही विद्यार्थ्यांत उत्पन्न व्हावयाचे आहेत, इकडे शिक्षकाचें लक्ष असावें.

**आपल्या शिकविण्यापासून उपयोग आहे अशी लोकांची पक्की खातरी करावीः**—मुलांचें शाळेंतल्या कामाकडे लक्ष लागलें, ह्मणजे या नियमाचा उद्देश सहज सिद्धीस जातो. शाळेंतल्या शिकण्याविषयीं मुलें जें बोलतात, आणि त्या संबंधानें मुलें जो उद्योग करितात, त्यावरून लोकांचा शाळेविषयीं अभिप्राय होतो. ज्या मुलाचें शाळेचे कामाकडे लक्ष लागलें आहे, त्याच्या तोंडीं नेहमीं शाळेच्या गोष्टी असतात. जेव्हां जेव्हां त्याला वेळ सांपडेल, तेव्हां तेव्हां तो शाळेंतल्या कामाची तयारी करीत असतो आणि घरीं न राहण्याविषयीं मनापासून झटत असतो. कांहीं तरी निमित्त काढून घरीं राहावें असें त्याजकडून घडणार नाहीं; इतकें च नव्हे, तर एक घटकाभर देखील त्याची शाळा बुडाली तर तो रडूं रडूं करितो. हे सर्व प्रकार घरच्या मनुष्यांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहत नाहींत. आणि असें दृष्टीस पडलें, म्हणजे शाळेचें काम चांगलें चाललें आहे आणि शाळेंत गेल्यापासून मुलाचें बरें होतें असें त्यांस वाटतें. आणि मग मुलास फार पुढें उपयोगीं पडणारा जो अभ्यास तो बुडवून त्यास घरीं ठेवणें हें फार वाईट आहे, अशी त्यांची खातरी होते. शाळेंत जें शिकवितात तें रोजच्या व्यवहारांत उपयोगी आहे असें घरच्या

माणसांस कळून आलें ह्मणजे तर तीं मुलास घटकाभरसुद्धां काम सांगत नाहींत.

आपलें शिकविणें फार उपयोगी आहे अशी लोकांची खातरी करण्याकरितां यत्न करावा म्हणून सांगितलें, याचा अर्थ उगीच डौल दाखवून लोकांस फसवावें असा नाहीं. उगीच निरुपयोगी परंतु ज्यांचें लोकांस आश्चर्य वाटेल असल्या गोष्टी मुलांकडून लोकांसमक्ष बोलविण्यांत कांहीं हांसल नाहीं. शाळेचें काम चांगलें चालवून मुलांची विद्या वाढावी, त्यांची वागणूक सुधारावी व त्यांची व्यवहारांत बुद्धि वाढावी, याविषयीं झटावें. ह्या गोष्टी साधल्या ह्मणजे मुलें शाळेंत घातल्यापासून काय लाभ आहेत, हें सर्वांना समजल्याशिवाय राहणार च नाहीं. याकरितां लोकांस शिक्षण चांगलें दिसावें, असा इलाज करण्यापेक्षां शिक्षण च चांगलें ठेवावें हें योग्य आहे. शिक्षण चांगलें असल्याशिवाय पोकळ डौल घालूं लागलें, म्हणजे फजिती व्हावयाची च. याकरितां आपले खरे दोष असतील ते सुधारण्याचा इमानानें यत्न करावा, आणि आपले हातून चांगलें काम जितकें चांगले रीतीनें होईल तितकें चांगले रीतीनें करावें, ह्मणजे फजिती झाल्याखेरीज लोकांची आपणावर भक्ति जडेल.

**दरएक मुलाची रोजची हजेरी मांडण्याकरितां हजेरीवही ठेवावी**:—मुलांनीं शाळेंत नित्य यावें हा हेतु सिद्ध होण्याकरितां वर जे दोन उपाय सांगितले त्यांपेक्षां हा अंमळ कमी प्रतीचा आहे. पहिले दोन उत्तम रीतीनें साधले असतां मुलांनीं शाळेंत नित्य यावें एवढ्या च करितां हजेरी लिहिण्याचें कांहीं कारण नाहीं; परंतु इतर अनेक कारणांनीं हजेरी ठेवणें अवश्य आहे. वरिष्ठ अधिकाऱ्याचे माहितीकरितां नानातऱ्हेचीं पत्रकें पाठवावीं लागतात, त्याजकरितां हजेरीवहीचीं सर्व कोष्टकें वेळचे वेळेस भरून तयारी ठेवणें अवश्य आहे. हजेरीवही नीट ठेवल्यानें कोणत्या ही वारंवार घरीं राहणाऱ्या मुलाचें शाळेंतील किती काम बुडालें तें दाखवितां येतें. हजेरी ठेविल्यापासून आणिक ही फायदा आहे याविषयीं येथें थोडेंसें सांगतों. एखादा मुलगा नेहमीं शाळेंत येत नसला आणि त्याबद्दल

पंतोजीनें त्यास सांगितलें कीं, "तूं शाळेंत सतत येत नाहींस, तेव्हां तुझें शिकणें होणार नाहीं अथवा ती च गोष्ट पंतोजीनें बापास कळविली, तरी फारसा उपयोग घडत नाहीं. मुलगा अथवा त्याचा बाप मुकाट्यानें तें ऐकून घेतो म्हणजे झालें. त्याचा पुढें कांहीं गुण येत नाहीं. परंतु जर पंतोजीनें मागल्या एका महिन्याची अथवा दोन तीन महिन्यांची हजेरी काढिली, आणि दाखविलें कीं, ज्या ज्या वेळेस तो मुलगा गैरहजर राहिला त्या त्या वेळेस त्याची गैर-हजेरी मांडून ठेविली आहे आणि एकंदर शाळेचें काम चाललेले दिवसांतून अमुक च दिवस तो गैरहजर होता, हें ही बरोबर दाखविलें, तर ती गोष्ट वेगळी आहे. विशेषेंकरून जर असें दृष्टीस पडलें कीं, तो मुलगा शेंकडा पंचवीस अथवा पन्नास दिवस गैरहजर होता तर काम तेव्हां च होईल. कधीं कधीं मुलें याहून देखील अधिक गैरह-जर असतात. आपण ज्या ज्या वेळेस गैरहजर राहिलों ती ती वेळ पंतोजीनें नियमानें टिपून ध्यानांत ठेविली आहे, असें मुलास समजलें, म्हणजे त्याला अचंबा वाटतो. एवढा मोठा अपराध केल्याबद्दल त्याचें च मन त्याला खाऊं लागतें. आणि तो अगदीं च निर्ढावलेला नसला तर इतका वेळ गैरहजेरी पडूं द्यावयाची नाहीं असा नेम करितो. मुलाच्या घरचीं माणसें मुद्दाम मुलास अधिक वेळ घरीं ठेवितात असें नाहीं; जेव्हां जेव्हां तीं त्यास घरीं ठेवितात, तेव्हां तेव्हां त्यांचे मनांत असतें कीं, एखादे वेळेस मुलास घरीं ठेवल्यानें काय होणार आहे? असें तीं दरएक वेळेस म्हणतात, आणि या-प्रकारें मुलगा किती दिवस घरीं राहिला हें त्यांच्या ध्यानांत मुळीं च नसतें. एकदम त्यांच्या दृष्टीस पडलें कीं, आपण महिन्यांतून आठ दिवस किंवा दहा दिवस मुलाला घरीं ठेविलें, तर लागलें च त्यांच्या मनांत येतें कीं, इतके मुलाचे दिवस फुकट गेले आणि आपण दि-लेला फीचा पैसा ही फुकट गेला. याप्रमाणें मुलगा आणि त्याच्या घरचीं माणसें या उभयतांचे ही मनांत गैरहजेरी फार वेळ होऊं नये असें येतें. पंतोजीनें मात्र हजेरीवही चांगली ठेवून तिजवरून मुलांच्या

झालेल्या नुकसानीबद्दल त्यांची चांगली खातरी करून त्यांना बजावून सांगितलें पाहिजे.

**मुलें गैरहजर असलीं ह्मणजे त्यांच्या घरीं लिहून कळवावें:**—वर सांगितलेले उपाय योजल्यानंतर मुलें फारशीं गैरहजर राहणार नाहींत; परंतु अगदीं च गैरहजेरी नाहीं, असें होणें अशक्य आहे; कोणी ना कोणी तरी गैरहजर राहील च. राहिला कीं, त्याचे घरीं कळविण्याचें कधीं विसरूं नये. असें केल्यानें मुलें आईबापांस विचारल्याशिवाय घरीं राहतात तो प्रकार अगदीं च बंद पडेल; आणि कळून मुलगा घरीं ठेवणें ही थोड्याबहुत अंशानें तरी बंद पडेल. वरच्या नियमांत वडिलांस कळविणें ह्मणून म्हटलें तें, महिन्या दोन महिन्यांनीं, अगर चार सहा महिन्यांनीं, तितक्या मुदतींत मुलगा एकंदर किती दिवस गैरहजर राहिला तें त्यांस कळण्याकरितां आहे; आणि येथें जें सांगितलें तें मुलगा कामाखेरीज अगर घरीं विचारल्याखेरीज राहूं नये ह्मणून आहे. एकंदर गैरहजेरी कमी पडण्याकरितां जेव्हांचे तेव्हां च गैरहजेरी मुलांच्या घरीं कळविण्यापेक्षां दुसरा चांगला इलाज नाहीं.

मुलें रोज शाळेंत येऊं लागलीं म्हणजे त्यांनीं वेळचे वेळेस यावें असा बंदोबस्त ठेवण्यास फारसा प्रयास पडत नाहीं. बहुतेक जे उपाय वर सांगितले, ते या कामाकरितां ही उपयोगी आहेत, तथापि त्याबद्दल ही कांहीं नियम खालीं लिहिले आहेत.

मुलांनीं शाळेंत नेमलेल्या वेळीं येण्याकरितां:—

१ पंतोजीनें स्वत: वेळचे वेळीं यावें.

२ सर्वांनीं येण्याची एक वेळ बांधलेली असावी व त्यापुढें येणारे सर्व उशिरां आले असें समजावें.

३ रोजचा पहिला पाठ फार उपयोगी असून मुलांस त्याचा मोठेपणा वाटे असा असावा.

४ उशीर होण्याचें कारण लेखी अथवा तोंडजबानी वरच्या माणसांनीं न कळविलें तर मुलांस शिक्षा केल्याशिवाय राहूं नये.

५. घरून गैरहजेरीचें कारण समजलें तरी मुलास थोडीशी शिक्षा करावी च.

१ पंतोजी स्वत: नेमलेल्या वेळीं येणारा नसला, म्हणजे त्याला उशिरां येणाऱ्या मुलांस नीटसें रागें भरतां येत नाहीं. शाळेचा बंदोबस्त बरा च असला, तर मुलांच्यानें "तुम्हाला उशीर होतो तसा च मला झाला" असें कधीं ही पंतोजीच्या तोंडावर म्हणवणार नाहीं; परंतु मुलांच्या मनांत असें येत असेल, इतकें पंतोजीला वाटलें ह्मणजे उशिरां येणें हा मोठा अपराध आहे, असें दाखविण्याचा त्याचा आव तेव्हां च ढांसळतो. शिक्षक उशिरां शाळेंत आला ह्मणजे त्याची हजेरी घेण्याची आणि आपले कामास आरंभ करण्याची एक च तारंबळ होते आणि एकदां शिकविण्याचें बस्तान बिघडलें ह्मणजे मग तें दिवसभर सुधरत नाहीं.

२ अमुक वेळेपुढें मुलगा आला ह्मणजे त्याला उशीर झाला असें समजावयाचें, ह्मणून जो नियम केला असेल तो वारंवार बदलूं नये. कांहीं दिवस एक आणि कांहीं वेळ दुसरी अशी वेळ ठेविली ह्मणजे कोणते दिवशीं केव्हां जावयाचें आहे, हें मुलांना समजत नाहीं. आणि समजलें तरी त्यांना " माझी अशी समजूत झाली, " असें ह्मणण्यास सवड सांपडते. तसें होऊं देऊं नये. होईल तितका यत्न करून शाळेंत घड्याळ ठेवावें.

३ इकडील लोकांची समजूत अक्षर चांगलें होणें आणि हिशेब चांगले करितां येणें या गोष्टी मुख्य आहेत अशी आहे, आणि पाहांटेच्या वेळीं हात चांगला वळतो अशी ही समजूत आहे. याकरितां सकाळीं पहिला तास लिहिण्याकडे योजावा आणि दोनप्रहरचा पहिला तास गणिताकडे योजावा. शाळेंतील वर्गांच्या आणि शिक्षकांच्या संख्येप्रमाणें वेगवेगळाले ठिकाणीं प्रसंगोपात्त वेगळी वेगळी योजना करावी लागेल. परंतु सामान्यत: एवढें ध्यानांत ठेवावें कीं, जसें एकंदरींत शाळेंतील अभ्यासाविषयीं मुलांचे मनांत गोडी उत्पन्न केली ह्मणजे तीं नित्य येतात, तसें च नित्य पहिला पाठ द्याव-

याचा तो मुलांच्या आवडीचा असला ह्मणजे तीं नियमित वेळीं येऊं लागतात.

४ उशीर होण्याचें कारण घरच्या वडील माणसांनीं समक्ष अथवा लिहून कळवावें, अशी चाल ठेविल्यानें मुलांस ही शाळेंत वेळच्या वेळेस जावेंसें वाटतें; आणि वडील माणसें ही त्यांस घरीं ठेवीत नाहींत. घरच्या मनुष्यांना लिहिण्याचा अथवा समक्ष येऊन बोलण्याचा कंटाळा असतो. आणि चिटी अथवा निरोप घेतल्याशिवाय उशिरां गेलें असतां खचीत शिक्षा होईल अशी विद्यार्थ्यांची खातरी असली म्हणजे खरें कारण नसेल आणि चिटी वगैरे मिळण्यासारखी नसेल तर ते उशीर करणार नाहींत. आतां असल्या चिठ्या केव्हां केव्हां खोट्या देखील येतात; परंतु पंतोजी अंमळ बारीक पाहणारा आहे असा लौकिक असला तर पांच पंचवीस चिठ्यांत एखादी खोटी येईल, अधिक येणार नाहींत. याकरितां एखादे वेळेस दोष उत्पन्न होईल एवढ्या च निमित्तानें हा नियम पाळण्यास मागें पुढें पाहूं नये.

५ जरी मुलांनीं चिटी आणिली तरी अगदीं च शिक्षा केल्याशिवाय त्यांस सोडूं नये:—चिटीवरून अथवा घरच्या माणसांच्या सांगण्यावरून असें वाटेल कीं, घरच्या माणसांच्या आणि मुलांच्या नाइलाजामुळें उशीर झाला तर फार शिक्षा देणें योग्य नाहीं. मुलगा आजारी असेल आणि वैद्यास हात दाखविल्याखेरीज अथवा औषध घेतल्याखेरीज तो शाळेंत आला असतां त्याची प्रकृति बिघडेल असें असलें तर त्यास शिक्षा कां करावी? याकरितां अशा मुलाला वर्गाचे शेवटीं मात्र बसवावें; याहून अधिक शिक्षा करणें नीट नाहीं, असें दिसतें; चिटीवरून घरच्या माणसांच्या निष्काळजीपणामुळें मुलास उशीर झाला असें वाटलें, तर मुलास उभा करावा. या अप्रतिष्ठेनें मुलास वाईट वाटलें ह्मणजे, शाळेचे वेळेस वडील माणसें काम सांगूं लागलीं तरी, पुष्कळ आढेवेढे घेऊन, काम दुसऱ्याच्या हातून होण्यासारखें असलें, किंवा घटकाभऱ्यानें करण्यासारखें असलें, तर शाळेची वेळ न चुके अशी तजवीज तो करितो. उशिरांकरितां मुलाला उभें केलें, किंवा वर्गांतून बाहेर बसविलें,

म्हणजे त्याचा वेळ फुकट जातो असें कोणी म्हणतात. पण ह्यांत कांहीं हांसल नाहीं. एक वेळ एवढी शिक्षा केली म्हणजे मुलगा वेळच्या वेळेस येऊं च लागतो. आपल्या बरोबरचीं मुलें आनंदानें शिकत आहेत, आणि आपण उगीच उभे राहिलों आहों व मधून मधून आपले सोबती कोणी कोणी तिरस्कारानें आणि कोणी कोणी दयेनें आपणाकडे पाहत आहेत, अशी उशिरां आलें असतां मोठी बेअब्रू होते, असें मुलाच्या अनुभवास आलें म्हणजे तो पुनः सहसा उशीर करीत नाहीं. आणि पुनः शिक्षेचें ही कारण पडत नाहीं. चिटीशिवाय जो मुलगा उशिरां येईल किंवा ज्याला घरीं काम होतें असें सांगावयास कोणी येणार नाहीं, त्याला शाळा सुटल्यावर कांहीं वेळ अडकवून ठेवावा. आणि तितक्या वेळांत त्याला कांहीं लिहावयास वगैरे नेमून द्यावें. तितका सारा वेळ पंतोजीनें आपण त्याचे जवळ बसण्याचें कारण नाहीं; परंतु लिहिणें झाल्यावर जितकें सांगितलें होतें, तितकें पुरतें लिहिलें आहे किंवा नाहीं आणि तें नीट लिहिलें आहे किंवा नाहीं हें पाहण्याचें कधीं विसरूं नये. जेथें पुष्कळ शिक्षक आहेत अथवा गडी माणूस आहे, अशा शाळेंत कोणी एक मनुष्यानें शिक्षा दिलेल्या मुलाबरोबर शाळेंत असलें म्हणजे पुरे. मुलानें केलेलें काम मात्र ज्याचें त्या शिक्षकानें पाहावें.

शिक्षेपासून मुलांस गुण येतो तो शिक्षा कडक असली म्हणजे येतो असें नाहीं. फारकरून शिक्षा करून घेणें वाईट आहे आणि चुकी केली असतां तिजबद्दल शिक्षा झाल्यावांचून राहणार नाहीं, असें मुलांस वाटल्यापासून शिक्षेचें फळ दृष्टीस पडतें. मुलांस पुनः अपराध करूं नये असें वाटतें तें ह्यापासून च वाटतें. पंतोजीनें ध्यानांत ठेवावें कीं, शिक्षा करण्याचे उद्देश दोन आहेत. पहिला, पुढें अपराध न घडणें आणि दुसरा, झालेल्या अपराधाबद्दल दंड होणें, हा होय. कित्येकांचें तर असें म्हणणें आहे कीं, शिक्षेचा न्याय्य उद्देश पहिला मात्र आहे; तें खरें असो अगर नसो, परंतु शिक्षा करितांना मुख्य धोरण पुनः तसा अपराध घडूं नये हें ठेविलें पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे. याकरितां शिक्षा मुलांला जितकी अधिक कंटाळवाणी वाटेल,

तितकें बरें. कधीं कधीं असें ही होईल कीं, मुलाला छड्या मारण्यापेक्षां नुसते चार शब्द बोललें तर त्यांपासून त्यांस दुःख अधिक होईल, आणि शिक्षेचें फळ ही अधिक होईल; असल्या नाजूक मनाच्या मुलाला सुद्धां छड्या मारून सोडून देणें योग्य नाहीं. कित्येक लोकांचा असा अभिप्राय आहे कीं, मुळींच शिक्षेशिवाय शाळेचें काम चालेल; परंतु ही भ्रांति आहे. जे कोणी शिक्षा देऊं नये असें म्हणतात, त्यांना च पुढें एक नाहीं तर दुसऱ्या प्रकारें शिक्षा देण्याचा प्रसंग येतो; इतकें च नव्हे, तर जेथें थोड्या शिक्षेनें काम होण्यासारखें असतें, तेथें अधिक मात्र शिक्षा करावी लागते.

---

## पंतोजी शिकवीत असतां त्याच्या कामाची परीक्षा कशी करावी.

ह्याविषयीं खालीं कांहीं मुद्दे लिहिले आहेत, हे परीक्षकाचे उपयोगीं असून उमेदवार पंतोजीच्या ही उपयोगी आहेत; कारण, परीक्षेचे वेळेस कोणकोणत्या गोष्टींकडे विशेष लक्ष देतात, तें ज्याची परीक्षा व्हावयाची आहे त्याला कळलें म्हणजे त्याला त्या त्या मुद्यांकडे अधिक लक्ष देण्यास बरें पडतें.

(क) शिक्षकाच्या चालचर्येविषयीं:—

१ आपल्या वर्गांत काय चाललें आहे तें त्याच्या ध्यानांत लवकर येतें काय?

२ त्याचे आंगीं तरतरीतपणा आहे काय?

३ एकदां बघण्याबरोबर सगळ्या वर्गावर त्याची नजर पोहोंचते काय?

४ पुष्कळ मुलांनीं एकदम उत्तरें दिलीं असतां त्यांतलें खरें कोणतें हें ओळखून, तें कोणीं दिलें हें त्याला समजतें काय?

५ त्याचा आवाज कसा आहे?

६ त्याचा उच्चार कसा आहे?

७ त्याचें बोलणें मुलांस लवकर समजतें काय?

८ त्याला एखादा शब्द वारंवार बोलण्याची वगैरे खोड आहे कीं काय ?

(ख) वर्ग संभाळण्याविषयीं:—

९ सगळ्या वर्गाचें लक्ष आपल्या शिकविण्यावर सारखें लागावें असें चातुर्य त्याचे आंगीं आहे काय ?

१० व्यर्थ ओरडाओरड केल्याशिवाय अथवा रागें भरल्याशिवाय तो मुलांचें चित्त अभ्यासावर ठेवितो काय ?

११ त्याचें अध्यापन सगळ्या वर्गास अनुलक्षून आहे काय ?

(ग) पाठ समजावून सांगणें आणि उदाहरणें देणें यांविषयीं:—

१२ योग्य प्रसंगीं शाहाणपणानें आणि जलदीनें तो फळ्यावर लिहून दाखवितो काय ?

१३ पाठ शिकवितेवेळेस तो खरोखरी ग्रंथाचे मूळाचा अर्थ सांगतो किंवा उगीच शब्दाचे अपरपर्याय ऐकून अथवा सांगून काम चालवून घेतो ?

१४ वाचनपाठांत तो प्रश्न विचारतो ते केवळ भाषेसंबंधी असतात किंवा केवळ विषयासंबंधीं असतात किंवा दोहोंचे मिळून असावे तसे असतात ?

१५ भाषेच्या संबंधाचे मार्मीक प्रश्न त्याला विचारतां येतात काय ?

१६ मुलांचीं उत्तरें झटकन् समजून त्यांवरून सुचण्यासारखे प्रश्न असतील ते तो विचारतो काय ?

१७ मुलांच्या मनांत एकामागून एक कल्पना कशा येतात तें ओळखण्याचें चातुर्य त्याचे आंगीं आहे काय ? आणि तें ओळखून त्या धोरणानें त्याला प्रश्न विचारतां येतात काय ?

१८ मुलांस नवीन शिकवावयाचें तें त्यांच्या मागील माहितीशीं जोडून त्यांत च त्याचा समावेश होईल असा यत्न तो करितो काय ?

१९ उदाहरणें देते वेळेस मुलांच्या रोजच्या पाहण्यांतील आणि माहितींतील गोष्टींवरून समजूत घालण्याचें चातुर्य त्याच्या आंगीं आहे काय ?

२० आपण जें सांगतों तें सर्वांस समजल्याशिवाय पुढें पाठ चालवावयाचा च नाहीं असा त्याचा निश्चय स्पष्ट दृष्टीस पडतो काय?

२१ तो मुलांस समजूत देतो ती सुबोध आणि योग्य मुद्यावर असते काय?

२२ त्याचे प्रश्न एक नियमित उत्तर येण्यासारखे असतात कीं, नानातऱ्हेचीं उत्तरें संभवतील असे असतात?

२३ पाठाचा खरा विषय सोडून तो भलतें च कांहींतरी सांगत बसतो कीं काय?

२४ त्याला पाल्हाळ करण्याची आणि बोलण्यांत मोठमोठे व अवघड शब्द घालण्याची खोड आहे काय?

२५ विषयाच्या मानानें अवश्य असतील त्याहून अधिक पारिभाषिक आणि कंटाळा येण्याजोगे प्रश्न तो विचारतो काय?

२६ त्याचे प्रश्न एकामागून एक व परस्पर निकट संबंधानें जोडलेले असतात किंवा इकडचा एक, तिकडचा एक, असे असंबद्ध असतात? आणि तें देखील विचारण्याकरितां त्याला पुनः पुनः पुस्तकांत पाहावें लागतें कीं काय?

२७ वाचनादि अभ्यास चालले असतां विषयाची सरणी ओळखून प्रश्न विचारण्याची त्याची नेहमीं तयारी असते काय?

२८ मुलांना उत्तर सुचेनासें झालें तर योग्य साहाय्य देऊन त्यांजकडून त्याला उत्तर काढतां येतें काय?

२९ मुलांना प्रश्न विचारतां च तो प्रश्न त्यांस समजला आहे किंवा नाहीं तें ओळखून समजला नसल्यास त्याला तो च प्रश्न दुसऱ्या रूपानें विचारतां येतो काय?

३० मुलानें चुकी केली असतां ती चुकी अगदीं उघडी करून तिजविषयीं त्याची पक्की खातरी करून जें सुधारून सांगितलें तें न विसरे असें त्यास करितां येतें काय?

३१ पाठाचे नीट विभाग करून दर एकाकडे सारखें लक्ष देऊन सर्वांचें विवेचन त्याला सारखें करितां येतें काय?

३२ मुलांनीं अशुद्ध प्रयोग केले असता तो तिकडे कान्हाडोळा करितो, किंवा प्रयोग योग्य च असावे असा नेहमीं त्याचा आग्रह असतो ?

(घ) परीक्षाः—

३३ तो प्रश्न हुशारीनें विचारतो काय ?

३४ त्याच्या प्रश्नांवरून मुलांस विषयाचें वास्तविक ज्ञान आहे कीं नाहीं हें कळतें काय ?

३५ प्रश्नांमध्यें झालेल्या पाठांतील मुख्य मुख्य मुद्यांचा समावेश होतो काय ?

३६ त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें सर्व एकत्र केलीं असतां विषयाची क्रमवार ( पांक्त ) उजळणी होते काय ?

(ङ) साधारणः—

३७ त्याच्या शिकविण्यावरून मुलांच्या ज्ञानावर आणि बुद्धीवर एकंदर कसा काय परिणाम होण्यासारखा आहे ?

समाप्त.

## परिशिष्ट १.

## शाळेच्या इमारतीच्या खोल्यांतून मोकळी हवा खेळेल व भरपूर उजेड राहील अशी तजवीज ठेवणें ह्याविषयीं.

# जाहिरात.

शाळेच्या इमारतीच्या खोल्यांतून मोकळी हवा खेळेल व भरपूर उजेड राहील अशी तजवीज ठेवण्याविषयींच्या खालीं दिलेल्या सूचना मध्यभागांतील शाळाखात्याचे अधिकारी व सदर खात्याच्या कमिट्या ह्यांस माहीत व्हाव्या व त्यांनीं तदनुसार सदोदित वहिवाट ठेवावी अशा हेतूनें प्रसिद्ध करण्यांत येत आहेत. खालीं संक्षिप्त रीतीनें सांगितलेले मुद्दे शाळांकरतां ज्या सर्व इमारती ह्या पुढें बांधल्या जातील त्यांच्या संबंधानें सक्तीनें अमलांत आणले जातील. तसेंच हल्लीं ज्या इमारती शाळांकरतां बांधलेल्या आहेत त्यांत फेरफार करणें झाल्यास प्रत्येक शाळेच्या स्थितीप्रमाणें व सोईप्रमाणें सदरील मुद्दे जितके अमलांत आणण्याजोगे असतील तितके अमलांत आणले जातील.

पुणें, तारीख ६ माहे मे इसवी सन १८८९. } (सही) टी॰ बी॰ करख्याम,
एज्युकेशनल इन्स्पेक्टर, मध्य भाग.

## सूचना.

शाळाखात्याच्या देखरेखीखालीं ज्या शाळा आहेत त्यांच्या मुख्य इमारती, आवारें व त्यांतील इतर लहानसान इमारती ह्यांत "उजेड चांगला भरपूर असावा व मोकळी हवा खेळेल अशी तजवीज ठेवावी" असा ठराव आहे (कोड भाग १ कलम ५). सदरच्या गोष्टींपैकीं

प्रत्येक गोष्टीच्या संबंधानें कोणत्या कोणत्या मुख्य मुद्यांकडे लक्ष पुरविलें पाहिजे हें खालीं दिलेल्या टांचणावरून समजून येईल.

## उजेडाच्या तजविजीविषयीं.

१ शाळेच्या एकंदर सर्व इमारतींत किंवा ज्या खोल्यांतून वर्ग बसवितात त्या खोल्यांत चांगला भरपूर उजेड असणें ही गोष्ट पुढें दिलेल्या दोन मुद्यांवर अवलंबून असते. (१) जितक्या उजेडाची अवश्य जरूरी आहे तितका उजेड खोलींत येईल व राहील अशी तजवीज राखणें. (२) आंत आलेल्या उजेडाचा ज्या रीतीनें आपल्यास उत्तम उपयोग करून घेतां येईल अशा रीतीनें त्याची वांटणी करणें किंवा तो कामीं लावणें.

२ अवश्य पाहिजे च इतक्या उजेडाचा पुरवठा व्हावा ह्या संबंधानें सामान्य नियम असा बांधतां येईल कीं ज्या खोलींत उजेड द्यावयाचा असेल त्या खोलींतील जमिनीचें जें क्षेत्रफळ असेल त्याच्या सुमारें १/५ इतकें उजेड येण्याकरतां राखलेल्या द्वारांचें किंवा खिडक्यांचें क्षेत्रफळ असावें. २० फूट लांब व २० फूट रुंद अशा खोलींत सुमारें ८० चौरस फूट उजेड पाहिजे. दुसरें एक मान असें बसवितां येतें कीं प्रत्येक विद्यार्थ्यास २०० चौरस इंच उजेड मिळेल अशी तजवीज राखली पाहिजे. परंतु बऱ्याच गोष्टी शाळेच्या इमारतीचें ठिकाण कसें आहे, तिचें तोंड कोणीकडे आहे, इत्यादि गोष्टींवर अवलंबून असतात. आणि साधारणपणें एखाद्या खोलींत किंवा घरांत पुरेसा उजेड आहे किंवा नाहीं ही गोष्ट सहज कळण्याजोगी आहे.

३ उजेडाचा उपयोग कसा करावा ह्या संबंधानें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे ही. जेणेंकरून मुलांच्या दृष्टीस ताण बसेल किंवा त्यांच्या डोळ्यांस त्रास होईल अशा प्रकारचा उजेड सर्वथा वर्ज्य करावा. दृष्टि त्रासते ती एक अतिशय सहन होत नाहीं इतका उजेड असेल तर किंवा उजेड पाहिजे त्यापेक्षां कमी असेल तर त्रासते. कमी उजेडांत किंवा सावलींत काम करणें आणि भगभगीत उजेडांत काम करणें ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच अपाय-

कारक आहेत. मुलें बसण्याच्या जागेची व्यवस्था अशी केलेली असावी कीं वर्गांतील बहुतेक मुलांस किंबहुना एकूण एक मुलांस उजेडांत काम करतां यावें. आतां ज्या उजेडांत काम करावयाचें तो उजेड त्यांच्या डाव्या बाजूकडून येईल व साधेल तितका वरून येईल अशी ही त्यांतल्या त्यांत आणखी तजवीज होईल असें करावें. ह्याच्या खालोखाल चांगला उजेड म्हटला म्हणजे उजव्या बाजूकडून येणारा होय. पाठीकडून येणारा उजेड वाईट. कारण अशा उजेडांत मुलें जें काम करीत असतात त्यावर त्यांच्या च आंगाचा अंधार पडतो. सर्वांत अपायकारक उजेड ह्मटला ह्मणजे समोरून येणारा व मुलांच्या तोंडावर पडणारा उजेड हा होय. ह्या उजेडाचे परिणाम फारच वाईट आहेत, व हा वर्ज्य करण्याविषयीं नेहमीं खबरदारी ठेवावी. ज्या शाळांतून लिहिण्याकरतां वगैरे मेजांचा उपयोग करीत असतील तेथें खिडकीची शिला किंवा चौकटीचा पायथा व त्याला लागून असणारा भिंतीचा भाग हा मेजांपेक्षां उंच असावा. कारण खालून येणाऱ्या उजेडापासून त्रास व थकवा हीं येतात. जेव्हां कारण पडेल तेव्हां सूर्याचे किरण प्रत्यक्ष पडत असतील तर त्यांचें निवारण करतां यावें म्हणून खिडक्यांना झडपें असावीं. ह्या ठिकाणीं आणखी ही एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं ज्या शाळा रात्रीच्या चालतात त्यांतून जे दिवे वगैरे लावावयाचे ते स्थिर व संथ जळणारे असावे. त्यांचा उजेड घटकेंत कमी, घटकेंत जास्त, असा होऊं नये. नुसती सफेती दिलेल्या भिंतींपेक्षां रंग दिलेल्या भिंती चांगल्या. कारण सफेती दिलेल्या भिंतींच्या योगानें उजेड भणभणीत पडून त्रास होण्याचा बराच संभव असतो. फ्रेंच करडा, फिका दगडी किंवा फिका निळा हे रंग इकडच्या प्रांतांतून सहज मिळण्यासारखे आहेत व नुसत्या पांढऱ्या रंगापासून खोलींत उजेड फांकण्यास जी मदत होते तिजपेक्षां वर सांगितलेल्या रंगांपासून जास्त मदत होते.

## मोकळी हवा खेळूं देण्याविषयीं.

४. भरपूर उजेड असणें हें जसें दोन गोष्टींवर अवलंबून राहतें तसें च हवा चांगली खेळती असणें ही गोष्ट ही दोन गोष्टींवर अवलंबून

राहते. ( १ ) जितकी हवा जरूर पाहिजे च तितक्या हवेचा पुरवठा; किंवा जितक्या मुलांची सोय करावयाची असेल तितक्या मुलांच्या मानानें खोलीचें घन क्षेत्र, ( २ ) कामीं लागून जी हवा बिघडली ती खराब झाली न झाली तों लागली च ती बदलण्याची तरतूद.

५. हवेच्या पुरवठ्याच्या संबंधानें आरोग्य रक्षणाच्या कामावर जे अधिकारी नेमले आहेत त्यांचें असें म्हणणें आहे कीं, प्रत्येक विद्यार्थ्यास २०० किंवा ह्याहून जास्त घनफूट हवा पाहिजेच पाहिजे. परंतु ह्या देशांत ( हिंदुस्थानांत ) घरांचे दरवाजे व खिडक्या ह्या नेहमीं उघड्या च ठेवण्याची चाल पडून गेली आहे ह्मणून नुसत्या जमिनीच्या क्षेत्रफळावर च नजर देऊन काम भागण्याजोगें आहे. खोल्या १० किंवा १२ फूट उंचीच्या आहेत असें घेऊन आपण चाललों ( खोलीची उंची १४ फूट असेल तर फार च चांगलें ) तर कमींत कमी १० चौरसफूट जागा प्रायमरी स्कुलांत ( प्राथमिक शिक्षणाच्या शाळेंत ) जाणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यांच्या वांट्यास आली च पाहिजे. सेकंदरी स्कुलांत ( उच्च प्रतीच्या शिक्षणाच्या शाळेंत ) प्रत्येक विद्यार्थ्यांच्या वांट्यास १५ किंवा १५ पेक्षां जास्त चौरसफूट जागा येईल अशी तजवीज ठेवावी. तरुण किंवा प्रौढ वयाचीं मुलें ज्या शाळेंत असतात त्या शाळेंत प्रत्येक विद्यार्थ्यास २० पासून २५ चौरस फूट जागा फार होणार नाहीं.

६. खराब झालेली हवा बदलण्याच्या संबंधानें जी मुख्य गोष्ट साधली पाहिजे ती ही कीं, "हवा तर खेळती राहवी पण वारा सो सो आंत येऊं नये." कोणच्या ही दिशेनें कां वारा वाहीना, बाहेरचा वारा आंत येईल व आंतली बिघडलेली हवा बाहेर जाईल अशी तजवीज हरप्रयत्नानें केली पाहिजे. पण ह्यांत मुद्याची गोष्ट लक्ष पुरवण्याजोगी अशी आहे कीं, वारा खोलींत खेळावा परंतु तो प्रत्यक्ष मुलांच्या आंगाला लागूं नये.

७. वर सांगितलेल्या गोष्टींवरून असें उघड दिसून येईल कीं शाळेची इमारत किंवा ज्यांतून वर्ग बसवितात अशा खोल्या ह्यांतून उजेड चांगला भरपूर राहावा व हवा मोकळी खेळावी अशी तजवीज

राखण्याकरतां उत्तम खिडक्या ह्मटल्या म्हणजे खालीं लिहिल्या प्रमाणें असाव्या. खिडक्यांच्या शिला ( चौकटीचे पायथे ) व त्याला लागून असलेला भिंतीचा भाग रुंद असावा. खिडक्या जमिनीपासून ४½ फुटींच्या उंचीवर असाव्या, व त्या छतापर्यंत उंच गेलेल्या अशा असाव्या. अशा खिडक्या असल्या म्हणजे उजेड वरून येतो व मुलांना वाऱ्याचा सोसाटा बाधण्याचें भय राहत नाहीं. लहान लहान भिंगांच्या तावदानाच्या खिडक्या नसाव्या. सामान्यतः खिडक्यना लोखंडी गज व बिजागरींवर बसविलेलीं झडपें असलीं ह्मणजे काम चालतें. खिडक्यांना बाहेरून पडवीचा आसरा नसेल तर त्यांना सायवानें किंवा छपऱ्या कराव्या. म्हणजे ऊन फार असतां किंवा पाऊस आला असतां झडपें लावण्याचें कारण राहत नाहीं. भोंकें पाडलेले जस्ती वगैरे पत्रे खिडक्यांस लावल्यानें हवेची व्हावी तितकी बदल होण्यास हरकत होते असें पुष्कळ ठिकाणीं नजरेस आलें आहे; म्हणून त्यांचा उपयोग करणें तो नीट लक्षपूर्वक पाहून प्रचीति घेऊन मग करावा. प्रत्येक मधल्या सुटीच्या वेळीं व तसल्या इतर हर एक प्रसंगीं जेव्हां करतां येईल तेव्हां शाळेच्या प्रत्येक वर्ग बसण्याच्या खोल्यांचे सगळे दरवाजे व खिडक्या उघडून टाकाव्या व ताज्या हवेची आंत रेलचेल करून द्यावी, ही गोष्ट एथें सांगितली पाहिजे असें नाहीं. सर्व नव्या इमारतींतून व ज्यांतून तशी व्यवस्था करतां येईल अशा जुन्या इमारतींतून हवादानें बसविण्याची किंवा आढ्याकडे उजेड व हवा ह्यांकरतां खिडक्या राखण्याची पद्धति सुरू करावी.

८. हवा बिघडली आहे किंवा काय हें पाहणें असल्यास खालीं दर्शविलेली सोपी कृति कधीं कधीं करून पाहण्यास फार सोईची व अत्यंत उपयोगीं आहे. १०½ द्रव मानाचें औंस पाणी जींत मावेल अशी एक शिशी घेऊन तींत स्वच्छ निर्मळ पाणी भरावें. नंतर एक लहानसा भाता घेऊन खोलींतील हवा त्या शिशींत भरावी. भाता नसेल तर शिशींतील पाणी हालवावें म्हणजे तें पाणी तेथील हवा शोषून घेईल. इतकें झाल्यावर त्या शिशींत ½ औंस किंवा एक मोठा चमचाभर ( टेबलस्पूनभर ) चुन्याची निवळी घालावी व शिशीस

बूच बसवून ती पुनः हालवावी. शिशी हालविल्यावर जर पाण्याचा रंग पांडुरका झाला ( कारण चुना व कार्बानिक आसिद वायु ह्यांच्या संयोगानें खडू ( चाक ) उत्पन्न होतो. ) तर असें समजावें कीं, येथील हवेंत प्रकृतीस अपाय करील इतकें कार्बानिक आसिद वायूचें प्रमाण होतें. असो. प्रायः आपण ज्या हवेमध्यें असूं ती हवा शुद्ध आहे किंवा दूषित आहे ही गोष्ट आपलें नाक च सांगतें. आतां बिघडलेल्या हवेंत फार वेळ राहिल्यानें त्याचा तिखटपणा गेला असला किंवा मंद झाला असला तर गोष्ट वेगळी. जर हवेच्या संबंधानें व्यवस्था नीट ठेवलेली आहे तर स्वच्छ ताज्या हवेंतून कोठें ही आंत आपण गेलों तर आपण दुसऱ्या हवेंत आलों असें सकृद्दर्शनीं वाटण्या जोगा भेद च असणार नाहीं.

पुणें तारीख १ माहे जानेवारी इसवी सन १८८९. } ( सही ) टी. बी. करख्याम
एजुकेशनल इन्स्पेक्टर मध्यभाग.



## परिशिष्ट २.

# पुणें ट्रेनिंग कॉलेजांतील कितीएक परीक्षांमध्यें शिक्षण व अध्यापन या विषयावर आलेले प्रश्न नमुन्या दाखल.

---

१. सिद्धांतांचें ज्ञान आणि अनुभवावरून बांधलेलें तांत्रिक नियम ह्यांचें वर्णन करून ह्यांविषयीं बेकन साहेबांनीं काय म्हटलें आहे तें सांगा.

२. कितीएक लोक व्यापक सिद्धांताच्या ज्ञानाची हेळणा कशी करितात?

३. कोणताही धंदा चांगल्या प्रकारें करावयाचा असला, तर त्या-संबंधी आपणास कोणत्या प्रकारचें ज्ञान करून घेणें आवश्यक आहे हें लिहून त्याविषयीं अज्ञानी लोक कशी हेळणा करितात, तें ही लिहा.

४. सामान्य सिद्धांत व त्यांवरून अभ्यास आणि प्रसंगास उपयोगी नियम, यांची योग्यता सविस्तर सांगा.

५. शिक्षकानें आपल्या कामाचा आरंभ कसा करावा तें सकारण सांगा.

६. एक मनुष्य शाळाखात्याचे अधिकाऱ्याकडे जाऊन म्हणाला, "रावसाहेब, आज तीन वर्षें झालीं; मुलकी खात्यांत, न्यायखात्यांत, मोजणीकडे व पोष्टाकडे नोकरी मिळेल, म्हणून होता तितका प्रयत्न केला; पण कोठें ही माझी दाद लागली नाहीं. आतां आपणाकडे आलों आहें, तर आपण तरी माझी गरिबाची कांहीं तजवीज करा." अशा मनुष्याविषयीं शाळेकडील अधिकाऱ्याचा कसा ग्रह होईल ? व कां ?

७. पंतोजींचें वजन मुलांवर कसें पडेल तें सविस्तर सांगा.

८. विद्यार्थी व शिक्षक यांची एकचित्तता होण्यास कारणें कोणतीं आहेत तीं सविस्तर सांगा.

९. विद्यार्थी मंडळीस आपण चांगले आहों असें वाटावें असें पंतोजीच्या मनांत असल्यास त्यानें कोणती मुख्य गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे ती सांगून तीविषयीं सविस्तर वर्णन करा.

१०. शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांस प्रिय होण्याकरितां त्याच्या आंगीं प्रथम कोणता गण अवश्य असला पाहिजे तें सविस्तर सांगा.

११. शिक्षकाची वागणूक कशी असावी ती सविस्तर सांगा.

१२. आरंभीं च पंतोजीचे आंगीं निश्चय व स्थिरपणा असला तर पुढें त्याचें काम सुरळीत चालतें, याविषयीं एक दाखला सांगा.

१३. शिक्षकाची वागणूक इतर धंदे करणाऱ्यांपेक्षां उत्कृष्ट असली पाहिजे, याचें कारण सविस्तर सांगा.

१४. कोणत्या शिक्षकाला मुलाकडून चांगली मेहनत करवितां येते ? व कां?

१५. शिक्षकाचे हातून त्याचें काम उत्तम रीतीनें होण्यास बहुत गोष्टी आवश्यक आहेत, त्यांपैकीं मुख्य गोष्ट लिहून तिचें सविस्तर वर्णन करा.

१६. हल्लीं काम करीत असलेल्या शिक्षकांचे आंगीं कोणकोणत्या गुणांचा अभाव असल्यामुळें त्यांस त्यांचे कामांत सांगण्यासारखें यश मिळत नाहीं व यश मिळण्याकरितां त्यांनीं आपलें काम कोणत्या रीतीनें केलें पाहिजे तें सविस्तर सांगा.

१७. शिक्षकाचें वजन मुलांवर पडण्याकरितां त्याचे आंगीं कोणकोणते गुण अवश्य असले पाहिजेत ?

१८. शिक्षकाचे धंद्याची योग्यता वाढविण्याकरितां पंतोजींनीं काय केलें पाहिजे ?

१९. आपल्या देशांत शिक्षकाच्या धंद्यास विशेष तेजी नाहीं याचें कारण काय तें स्पष्ट करून सांगा.

२०. पंतोजीची स्थिति हल्लीं इतर खात्यांतील नोकरांप्रमाणें विशेष भरभराटीची नाहीं. यामुळें पंतोजीचे धंद्यास जितकी तेजी पाहिजे तितकी नाहीं. असें होण्याचीं कारणें काय आहेत तीं सांगून तीं दूर कशानें होतील तें सांगा.

२१. शिक्षकांचे धंद्याविषयीं **टिंडाल** साहेबांचा अभिप्राय सांगा.

२२. शिक्षकाचे धंद्यांत स्वहितपर लोकांचा प्रवेश झाल्यामुळें काय परिणाम झाले आहेत तें सांगून ते टाळण्याविषयीं कांहीं उपाय सांगा.

२३. "ज्या मनुष्यास भक्तिपुरःसर शिकविण्याचें काम आवडत नाहीं त्याच्या हातून जो या कामाची भक्ति बाळगितो त्याप्रमाणें कधीं च काम होणार नाहीं." हा नियम स्पष्ट करून सांगा.

२४. "पंतोजीस मुलांची आवड असावी," हा नियम सविस्तर सांगून, एका प्रसिद्ध पंतोजीची आपल्या मुलांवर आवड कशी होती तें सांगा.

२५. पंतोजींत प्रथम अवश्य गुण कोणता असला पाहिजे तें सविस्तर सांगा.

२६. पंतोजीचे आंगीं मुलें कह्यांत ठेवण्याचीं साधनें कोणतीं असलीं पाहिजेत तीं सांगून त्यांचें निरूपण करा.

२७. "मुलें कह्यांत ठेवतां येणें," हा गुण थोड्या च लोकांमध्यें असून; तो पुष्कळ लोकांमध्यें मुळींच नसतो. व तो संपादन करणें हें फार कठीण पडतें; असें असतां तो गुण पंतोजींमध्यें मुख्यत्वेंकरून असला पाहिजे, असें विधान करणें असंभवनीय नव्हे काय? ह्याविषयीं **फौलर** साहेबांनीं समर्थन अथवा निरसन कसें केलें आहे तें सविस्तर सांगा.

२८. "हातचें काम खास करावयाचें असा निश्चय करा व भरंवसा तिळमात्र सोडूं नका म्हणजे काम होईल; कधीं फसणार नाहीं." हें वाक्य कोणत्या ग्रंथांतलें आहे तें सांगून त्याचा उपयोग शिक्षणपद्धतींत कोठें व कसा केला आहे तें सविस्तर सांगा.

२९. विद्यार्थ्यांस शिक्षण लावण्याचीं मुख्य साधनें कोणतीं तीं सांगून त्या प्रत्येकाचें पूर्णपणें विवेचन करा.

३०. दृढपणा वाढविण्यासाठीं मुख्य नियम कोणते आहेत ते सांगून त्यांचें सविस्तर निरूपण करा.

३१. "पुरता विचार केल्याशिवाय कोणताही हुकूम देऊं नये; प-

रंतु एकवार हुकूम दिला म्हणजे तो सर्वांनीं पाळिला च पाहिजे असा बंदोबस्त ठेवावा." हा नियम सिद्ध करून दाखवा.

३२. हुकूम दिल्यावर त्याच्या योग्यायोग्यतेविषयीं वाटाघाट करूं दिल्यानें काय होईल तें सांगा.

३३. जो मनुष्य आपण सांगितलें तें मुलें ऐकतात कीं नाहीं ह्याकडे कांहीं लक्ष देत नाहीं, त्याला पुढें त्या मुलांपासून किती त्रास होतो, ह्याबद्दल एक दाखला द्या.

३४. "कांग्र्याचा नायटा होतो" ह्या म्हणीचा उपयोग कोणत्या प्रसंगीं केला आहे तें सविस्तर सांगा.

३५. पंतोजीस जें यश मिळतें तें केवळ त्याच्या विद्वत्तेवर अवलंबून नसतें, तर तो आपल्या कामांत जशी आसक्ति, प्रीति व कळकळ बाळगितो तसें तें त्यास मिळतें. हा नियम ज्या कारणांवरून सिद्ध होतो तीं कारणें सविस्तर सांगा.

३६. चांगल्या शिक्षकाचे आंगीं कोणते गुण अवश्य पाहिजेत व ते नसतील तर काय परिणाम होईल?

३७. "फारच द्वाड विद्यार्थी असेल तर आधीं युक्तीनें त्याला सोईवार आणून मग हुकूम करावा. आपण हुकूम करून त्यानें मोडावा असा प्रसंग आणूं नये." हा नियम स्पष्ट करून सांगा व त्याबद्दल एक उदाहरण द्या.

३८. एखादा विद्यार्थी इतका द्वाड असतो कीं त्यावर पंतोजीचा अंमल चालत नाहीं, अशा अवघड ठिकाणीं पंतोजीनें कसें वर्तन करावें तें सांगा.

३९. शिक्षा देणें अवश्य कां आहे हें सांगून थोडे लोकांस ती केल्यानें सर्वांची वागणूक सुधारते, हें एक उदाहरण देऊन स्पष्ट करून दाखवा.

४०. यूरोपच्या इतिहासांतील एक उतारा "शिक्षण आणि अध्यापन" यांत घेतला आहे तो कोणता तें सांगून तो कशाकरितां घेतला आहे तें ही सांगा.

४१. शिक्षकानें विद्यार्थ्यास सैल सोडून बहुतांस शिक्षेस पात्र

करण्यापेक्षां थोडक्यांत कायदेशीर रीतीनें शिक्षा करून इतरांस ओ-ळीवर आणावें हें बरें; ह्याविषयीं एक दाखला द्या.

४२. शिक्षेचे मुख्य हेतु कोणते ते लिहा. कोणते प्रकारचे शिक्षकांचें शिक्षा केल्या खेरीज क्षणभर ही चालत नाहीं? शिक्षा करण्याचा प्रसंग मुळीं च न यावा अशी इच्छा असेल, तर शिक्षकानें काय तजवीज केली पाहिजे?

४३. शिक्षेशिवाय मुलांस वळण लावण्याचे अन्य मार्ग असल्यास ते कोणते तें सविस्तर सांगा.

४४. खरा गुरुजी मुलांस सन्मार्गास लावण्यांत मुख्यत्वेंकरून कशावर भिस्त ठेवितो?

४५. "खरा शिक्षक त्यास च म्हटलें पाहिजे कीं जो क्रियेचे हेतु शोधितो आणि शुद्ध करितो." ह्या वाक्याचें पूर्ण स्पष्टीकरण करा व ह्याच अर्थाचीं दुसरीं वाक्यें तुम्हांस माहित असल्यास तीं लिहून कोठें आहेत तें सांगा.

४६. खरा शिक्षक कोणाला म्हणावें?

४७. मुलांस सन्मार्गास लावण्याच्या साधनांपैकीं कांहीं साधनें सदोष व कांहीं निर्दोष आहेत. हीं दोन्हीं प्रकारचीं साधनें सांगून त्यांचें सविस्तर वर्णन करा.

४८. विद्यार्थ्यांवर धाक बसविण्याकरितां जो शिक्षक छडीवर अवलंबून राहातो त्याविषयीं तुमचें काय मत आहे तें लिहा.

४९. शिक्षेशिवाय शिक्षकाचें काम चांगलें चालेल किंवा कसें तें सविस्तर सांगा.

५०. मुलांस चांगली ओढ लावण्यांत शिक्षकानें मुख्यत्वेंकरून काय करावें तें खुलासेवार सांगा.

५१. मुलांस सन्मार्गास लावण्यास अति प्रशस्त मार्ग कोणता तें सविस्तर सांगा.

५२. मुलास अपराधाबद्दल शिक्षा केली तरी पुनः अपराध करण्याची त्याची इच्छा समूळ नाहींशी होत नाहीं. ती नाहींशी होण्याकरितां तुह्मी काय कराल तें सविस्तर सांगा.

५३. "छडी मारणें म्हणजे लांछनास्पद आहे; असें केल्यानें मुलांची योग्यता जाऊन त्यांस पशूंचें साम्य येतें," असें जें कित्येकांचें म्हणणें आहे त्याविषयीं तुमचें काय मत आहे तें सांगा.

५४. शिक्षेविषयीं **आर्नोल्ड** व **लॉक** ह्यांचे अभिप्राय सांगा.

५५. जुन्या लोकांची समजूत अशी आहे कीं पंतोजीनें छडीचा उपयोग केल्याशिवाय मुलांस विद्या यावयाची नाहीं. ही समजूत व इंग्लंडांतील प्रसिद्ध शिक्षणशास्त्रवेत्ते यांची याविषयीं जी समजूत आहे ती या दोहोंत कांहीं मेळ आहे किंवा कसें? असल्यास तो कसा तें स्पष्ट करून सांगा.

५६. **डाक्तर जॉन्सन्** यांनीं शारीरशिक्षेविषयीं कसें वर्णन केलें आहे तें सांगा.

५७. शिक्षा कोणते कारणांनीं कमी अथवा थोडा वेळ करावी? याबद्दल पूर्णपणें नियम सांगा. शारीरदंड करण्याचे कामीं कोणते नियम शिक्षकांनीं पाळले पाहिजेत?

५८. शिक्षेचे दोन हेतु सांगून त्यांचें विवरण करा.

५९. शिक्षेचे उपयोग किती आहेत ते सांगून त्यांचें उपपादन करा.

६०. शिक्षण म्हणजे काय व तें तुम्ही मुलांस कसें लावाल तें सविस्तर सांगा.

६१. शिक्षेच्या प्रकारांचे मुख्य दोन भाग सांगून प्रत्येक भागांतील पोटभेद सांगा व प्रत्येक भागांतील एका प्रकाराचें निरूपण करा.

६२. शिक्षेचे प्रकार किती आहेत ते सांगून त्यांचे पोटभेद ही सांगा व त्यांविषयीं सामान्य निरूपण करा.

६३. पंतोजीस शारीरदंडाशिवाय आपलें काम कसें करितां येईल तें सविस्तर सांगा.

६४. कांहीं दिवस शाळेंत येण्याचें बंद करणें, ही शिक्षा जीं मुलें मुळींच शाळेंत येण्याची चुकवाचुकव करितात त्यांस द्यावी ह्मणून सांगितलें आहे; तर त्यांस ही शिक्षा कशी होईल तें स्पष्ट करून दाखवा.

६५. "शाळेंतून घालवून देणें" ही शिक्षा कधीं करावी तें सविस्तर सांगा.

६६. शिक्षेच्या चौथ्या प्रकाराविषयीं निरूपण करा.

६७. "अधिक लिहावयास अगर पाठ करावयास देणें," या शिक्षेच्या प्रकाराविषयीं सविस्तर वर्णन करा.

६८. अध्यापनाचें काम चांगलें होण्याकरितां जसा शिक्षेचा उपयोग आहे, तसा त्याचे उलट कोणत्या गोष्टीपासून, व कोणत्या तऱ्हेनें शिक्षकास उपयोग करून घेतां येईल, तें सांगा.

६९. शिक्षेचे प्रकार किती आहेत ते सांगून त्यांपैकीं पांचव्या प्रकाराचें विवरण करा.

७०. शारीरशिक्षा करितेवेळीं कोणकोणत्या गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत? व कां?

७१. शिक्षेच्या प्रकारांपैकीं शेवटच्या प्रकाराचें सविस्तर वर्णन करा.

७२. शारीरशिक्षेविषयीं कांहीं लोकांची समजूत कशी असते तें सांगून तिचें खंडण करा व या शिक्षेविषयीं तुह्मांस काय सांगणें असेल तें सविस्तर सांगा.

७३. सर्व शिक्षांबद्दल सामान्य नियम सांगून त्यांपैकीं एकाचें वर्णन करा.

७४. फारच द्वाड विद्यार्थी असेल तर त्यास कसा सोईवर आणावा?

७५. शिक्षा करण्याच्या कामांत न्यूनाधिक करणें इष्ट आहे किंवा कसें; असल्यास, तें कोणत्या प्रसंगीं कसें करावें तें सविस्तर सांगा.

७६. "शिक्षा करणें ती गुण येई पावेतों करावी," हा नियम स्पष्ट करून सांगा.

७७. शिक्षेचे हेतु कोणते आहेत व ज्या शाळेंत ती देण्याचा प्रसंग मुळींच आला नाहीं त्या शाळेविषयीं तुम्ही आपला अभिप्राय कसा द्याल?

७८. शिक्षेच्या समानतेविषयीं निरूपण करा.

७९. शिक्षेचे जसे प्रकार सांगितले आहेत तसे बक्षिसाचे प्रकार

करितां येतील किंवा नाहीं? येत असल्यास ते करून दाखवा व त्यांचें थोडक्यांत निरूपण करा.

८०. शिक्षा देण्याच्या संबंधानें रिक्तरचा काय अभिप्राय आहे तो सांगा.

८१. शिक्षा व बक्षीस ह्यांखेरीज मुलांकडून इच्छिलेलीं कामें करून घेण्यास शिक्षकास पुष्कळ साधनें आहेत, तीं कोणतीं तें सविस्तर लिहा.

८२. उत्तम बक्षीस कोणतें? त्यापासून उपयोग काय व केव्हां होतो तें सांगा.

८३. बक्षिसांपासून काय उपयोग होतो व बक्षीस देण्याचे प्रकार कोणते आहेत आणि त्यांचा उपयोग तुम्ही कोणत्या प्रसंगीं कराल तें सांगा.

८४. कांहीं माणसें अडचणी असून ही काम नीट चालवितात, आणि कांहीं नसत्या काढितात. यांपैकीं पंतोजीनें कोणतें धोरण राखावें तें स्पष्ट करून सांगा.

८५. कोणत्या शिक्षकाला वाईट मुलांचा कंटाळा येत नाहीं? व कां?

८६. "पंतोजीला मनाच्या वृत्तीचें थोडेंबहुत ज्ञान असावें व त्यानें तें वाढवीत असावें," असा हेतु ठेविल्यानें काय परिणाम होतो तें सांगा.

८७. "शिक्षकाचे आंगीं समयसूचकता असून प्रसंगीं आपणास हरकत करणाराचे हातून ही आपलें काम साधून घेण्याची अटकळ असावी" हा नियम स्पष्ट करण्याकरितां एक उतारा द्या.

८८. शिक्षकाचे आंगीं "आपणास हरकत करणाराचे हातून ही आपलें काम साधून घेण्याची अटकळ असावी." हा नियम स्पष्ट करून दाखविण्याकरितां एखादा दाखला द्या.

८९. शिक्षकाचें मुलावर वजन पडण्याचीं कारणें सांगून त्यांपैकीं एकाचें वर्णन करा.

९०. शिक्षकाचे आंगीं ममता, समदृष्टि आणि दृढनिश्चय हे गुण अवश्य कां असले पाहिजेत तें सांगा.

९१. शिक्षकाचा विद्यार्थ्यांवर अंमल कोणकोणत्या कारणांनीं बसतो ।विस्तर सांगा.

९२. शिक्षकाचा अंमल मुलांवर बसण्यास त्याच्या आंगीं मुख्य गुण अवश्य असले पाहिजेत, ते कोणते तें स्पष्ट करून सांगा.

९३. शिक्षकाचा अंमल विद्यार्थ्यांवर कोणकोणत्या कारणांनीं ब- तीं कारणें सांगून त्यांपैकीं शेवटच्या कारणाचें निरूपण करा.

९४. शिक्षकानें आपलें वजन मुलांवर पाडण्याकरितां आपले व- त कोणकोणते नियम पाळावे ?

९५. मुलांस चांगल्या संवयी कशा लावाल ?

९६. "विद्यार्थ्यांस आपल्या इच्छेप्रमाणें वर्तविण्यास त्यांच्या आं- कोणते स्वाभाविक गुण व मनोधर्म उपयोगी आहेत." तें सांगून ।। उपयोग तुह्मी शिक्षणाचे कामांत कसा कराल ?

९७. विद्यार्थ्यांस आपल्या इच्छेप्रमाणें वर्तविण्यास त्यांच्या आंगीं ते स्वाभाविक गुण व मनोधर्म उपयोगी आहेत तें सांगून त्यांपैकीं ।व्या गुणाचें निरूपण करा.

९८. मुलांस आपल्या इच्छेप्रमाणें वर्तविण्यास त्यांचे आंगचे को- गुण व मनोधर्म उपयोगी आहेत त्यांविषयीं सविस्तर वर्णन करा.

९९. मुलांचे स्वभाव, इच्छा आणि सवयी यांसंबंधीं पंतोजीस त्याच्या ांत कोणत्या मुख्य हरकती येतात त्या सांगून त्यांचें निरसन कसें तां येईल तें सविस्तर सांगा.

१००. "थोरपणीं जो उद्योग करावा लागेल त्याची तयारी करणें," ुण बहुतकरून कोणांमध्यें असतो, तें सांगून त्यांचें निरूपण करा.

१०१. कांहीं विषय असे असतात कीं ते मुलांस व त्यांच्या वडि- ही आवडत नसतात. असे विषय आवडते करण्यास शिक्षकानें केलें पाहिजे तें सविस्तर उदाहरण देऊन सांगा.

१०२. कांहीं विषय मुलांस आवडत नसतात; ते त्यांस आवडतील तजविजीनें शिकविलें पाहिजे, हा नियम उदाहरण देऊन स्पष्ट र सांगा.

१०३. मुलें कित्येक विषयांच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष करितात इत-

कें च नाहीं, तर त्यांचे आईबाप देखील ते विषय मुलांस पढण्याचें कारण नाहीं असें सांगतात. अशा प्रसंगीं शिक्षकानें काय करावें तें उदाहरण देऊन सविस्तर सांगा.

१०४. चांगले अध्यापनास कोणकोणत्या गोष्टी अवश्य आहेत त्यांचें निरूपण करा.

१०५. शिक्षकाचे आंगीं अध्यापनाचे कामांत अवश्य गुण कोणते असले पाहिजेत ते सविस्तर सांगा.

१०६. शिक्षकास अवश्य करतां आल्या पाहिजेत अशा गोष्टी कोणत्या त्यांचें साद्यंत वर्णन करा.

१०७. "जो विषय शिकवावयाचा असेल त्याची पूर्ण माहिती शिक्षकास असून, त्याचा इतर विषयांशीं काय संबंध आहे हें ही त्यास माहित असलें पाहिजे." हा नियम एक दोन उदाहरणें देऊन स्पष्ट करून दाखवा.

१०८. "मुलांस समजे अशा रीतीनें विषय शिकवितां येण्यास मूळ गोष्ट अवश्य आहे ती कोणती" तें सविस्तर सांगा.

१०९. मुलांस समजे अशा रीतीनें विषय शिकवितां येण्यास मूळ गोष्ट अवश्य आहे ती कोणती, हें सांगून तें उदाहरणानें सिद्ध करा.

११०. विषय सोपा करून तो पूर्णपणें शिकविण्याचें एक उदाहरण द्या.

१११. प्रश्नपद्धतीनें व व्याख्यानपद्धतीनें शिकविणाऱ्या शिक्षकांमध्यें गुण सारखे असतात किंवा कमजास्त असतात ? त्यांच्या गुणांमध्यें फरक असतो असें तुम्हांस वाटेल तर पहिल्या प्रकारच्या शिक्षकाचे आंगीं कोणते विशेष गुण असले पाहिजेत म्हणजे तो आपलें काम उत्तम प्रकारें करील ?

११२. "शिक्षकानें व्यासंग करण्याची सवय कायम ठेविली पाहिजे." ह्या नियमाचें निरूपण करा आणि ही सवय कायम ठेवण्यांत त्यानें कोणकोणत्या गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत ?

११३. शिक्षकास उत्तम रीतीनें अध्यापन करितां येण्यास त्याचे

आंगीं कोणते गुण अवश्य असले पाहिजेत, तें सांगून, त्यांपैकीं एकाचें निरूपण करा.

११४. शिक्षकाची विद्वत्ता अध्यापनाचे कामांत मुलांच्या किती उपयोगीं पडते तें सविस्तर सांगा.

११५. शिक्षकानें आपल्या विद्वत्तेचा अध्यापनाचे कामीं कसा उपयोग करावा तें सकारण सांगा.

११६. कोणत्या शिक्षकाला मुलांस समजेल असें शिकवितां येत नाहीं? व कां?

११७. विद्यार्थ्यांचे मनांतले विचार ओळखून कसें शिकवावें याबद्दल एक दाखला द्या.

११८. विद्यार्थ्यानें दिलेलें उत्तर घेऊन च शिक्षक आपली कल्पना त्यांजकडून काढवीत गेला ह्मणजे कोणकोणते फायदे होतील व कां तें सांगा.

११९. "मुलांना ज्ञान संपादन कसें करावें हें शिकविणें पंतोजीचें काम आहे," ह्याबद्दल एक उतारा द्या.

१२०. (अ) विद्यार्थ्यांस प्रश्न विचारतेवेळीं कोणत्या गोष्टी शिक्षकांनीं लक्षांत ठेवाव्या? व (ब) त्यांनीं चाललेल्या धड्याकडे नीट लक्ष द्यावें, याबद्दल काय काय उपाय योजिले पाहिजेत?

१२१. "संज्ञा फार उपयोगाच्या आहेत," हा नियम स्पष्ट करून सांगा.

१२२. उत्तरांत धर सोड करूं दिल्यानें मुलांच्या बुद्धीवर व वागणुकीवर काय परिणाम होतील?

१२३. प्रश्नपद्धति व व्याख्यानपद्धति यांचें निरूपण करून त्यांतील अंतर व गुणदोष यांचें वर्णन करा.

१२४. शिकविण्याचे प्रकार किती आहेत ते सांगून त्यांचे गुणदोष सांगा.

१२५. "शिकविणें आणि परीक्षा घेणें या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत," हें कसें तें स्पष्ट करून सांगा.

१२६. प्रश्नपद्धतीनें शिकवितांना प्रश्न विचारणें ते कसे विचारावे तें सविस्तर सांगा.

१२७. कोणचे प्रश्न सावकाश विचारावे व कोणचे जलद विचारावे व कां?

१२८. "कित्येक शिक्षक नियमादिकांची उपपत्ति सांगूं लागले म्हणजे त्यांतील कांहीं भाग सामान्य रीतीनें सांगतात, व कांहीं भाग एखाद्या विशेष उदाहरणाच्या संबंधानें सांगतात." हें कसें तें एक उदाहरण देऊन सविस्तर सांगा.

१२९. पाठ चालवितांना कोणकोणत्या गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत त्या सांगून त्यांपैकीं एकीचें वर्णन करा.

१३०. पाठ चालविते वेळेस शिक्षकानें कोणकोणत्या गोष्टींकडे लक्ष पुरवावें व कां?

१३१. फळ्याचा उपयोग कसा करावा?

१३२. फळ्यावर मुख्यत्वेंकरून कोणत्या गोष्टी, केव्हां लिहून दाखवाव्या?

१३३. प्रश्नपद्धतीनें शिकविण्यापासून कोणते लाभ होतात ते सांगा.

१३४. प्रश्नपद्धतीनें शिकवीत असतां विद्यार्थ्यांना विचार करावयास शिकविण्यांत अति महत्त्वाची वेळ कोणती तें सविस्तर सांगा.

१३५. प्रमाण म्हणजे काय हें प्रश्नपद्धतीनें कसें शिकवाल?

१३६. वर्गाचें लक्ष शिकविणाराकडे लागण्याकरितां त्यानें काय केलें पाहिजे?

१३७. मुलांनीं (१) नित्य, व (२) नियमित वेळीं शाळेंत येण्याकरितां शिक्षकांनीं कोणते उपाय योजिले पाहिजेत?

१३८. "आपण जें शिकवितों तें फुकट जाऊं नये व त्यापासून विद्यार्थ्यांचें हित व्हावें असें पंतोजीचे मनांत असेल" तर त्यानें काय करावें तें सविस्तर सांगा.

१३९. मुलें शाळेंत दररोज येऊं लागल्यापासून कोणते फायदे होतात व त्यांस रोज व नेमलेल्या वेळीं शाळेंत येण्याची सवय लावण्याकरितां तुम्ही काय कराल?

१४०. "जैसा बोले तैसा चाले ॥ त्याचिं वंदावीं पाउलें" ॥

हा तुकारामाचा अभंग पंतोजीच्या कामांत कसा लागू कराल तें सविस्तर सांगा.

१४१. पंतोजी शिकवीत असतां त्याचे कामाची परीक्षा कशी करावी तें सविस्तर सांगा.

१४२. शिक्षकानें कसें शिकविलें व शिक्षक चांगला आहे किंवा नाहीं याची परीक्षा कशी करावी तें सविस्तर सांगा.

१४३. शिक्षकाचे चालचर्येविषयीं तपास करणें असेल तर कसा करावा?

१४४. पंतोजीच्या कामांत पाहण्याच्या मुख्याच्या गोष्टी कोणत्या त्या संक्षेपानें सांगा.

१४५. वेळापत्रक तयार करितांना कोणकोणत्या गोष्टींचा तुम्ही विचार कराल? जास्त तास कोणत्या विषयांला किती द्याल?

१४६. मुलांस संख्या शिकतांना कोणत्या अडचणी येतात व त्या तुह्मी कशा दूर कराल?

१४७. मुलांस कविता तोंडपाठ करण्यास सांगण्यापूर्वीं मुख्य दोन गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत त्या कोणत्या तें सकारण सांगा.

१४८. शुद्ध लेखन शिकविण्यास आरंभ कोणत्या इयत्तेंत होतो व त्या इयत्तेखालच्या इयत्ता शिकणाऱ्या मुलांस त्या विषयाची अगाऊ तयारी करण्याकरितां तुह्मी कसें शिकवाल?

१४९. तुह्मी लोकप्रिय होण्याकरितां काय कराल?

१५०. खालीं लिहिलेला एका धड्यांतील भाग कसा शिकवावा तें सांगा.

"रसायनव्यापारानें शरीरावर जो फेरफार होणार त्याचा प्रतीकार जीव करितो. जीव गेल्यावर शरीर तसें च राहूं दिलें तर तें लागलेंच कुजूं लागतें. जीवाच्या जबरदस्त शक्तीचा जोर नाहींसा झाला म्हणजे शरीराचे अवयवांस रसायनव्यापार लागू होतो, आणि शरीर कुजून त्यांतून कार्बानिक आसिद ग्यास, पोतासा, सोदा, वगैरे नवे च पदार्थ उत्पन्न होतात."

१५१. सहा वर्षांच्या आंतील वयांच्या मुलांस शिक्षण देणें असेल, तर कसें द्याल ?

१५२. मुलांशीं, लोकांशीं व वरिष्ठांशीं शिक्षकानें आपलें वर्तन कसें ठेवावें तें सविस्तर सांगा.

१५३. सात वर्षांच्या आंतील वयांच्या मुलांची शाळा चालविणें असल्यास त्यांस तुह्मी कसें शिकवाल तें सांगा.

१५४. शाळेंत पदार्थसंग्रह करण्याची पद्धति चालू केली असतां तीपासून कोणते फायदे होतील, तें सांगा.

१५५. हल्लींच्या शिक्षणक्रमांत मुलांच्या पठणशक्तीवर विशेष भिस्त ठेवितात असा लोकांत विशेष गवगवा आहे. तो साधार आहे किंवा कसें तें सविस्तर सांगून तो दूर करण्याकरितां तुह्मी आपली शिकण्याची शिस्त कशी ठेवाल तें पूर्णपणें सांगा.

१५६. स्मरण करणें आणि पाठ करणें ह्यांत भेद काय ? पाठ करण्याची शक्ति कशी वाढवितां येईल? असे कोणते विशेष विषय आहेत कीं त्यांतील शब्द व वाक्यें मुलांस पाठ करण्यास सांगणें इष्ट आहे.

१५७. खालीं लिहिलेली कविता कशी शिकवाल तें लिहा:—

हरि तनुविकलत्व क्षिप्र तो देव देहा ॥
वरि कर फिरवूनी वृत्त सारें वदे हा ॥
मग मणिसह कन्या अर्पिली पादपद्मीं ॥
कवि सकळ निवेदी ये जई पात्र सद्मीं ॥

१५८. शिक्षणाचे प्रकार किती आहेत ते सविस्तर सांगा. सर्व प्रकारचें शिक्षण शाळेंत देतां येईल किंवा कसें ?

१५९. बुद्धिविषयक शिक्षण आणि नीतिविषयक शिक्षण या दोहोंत परस्पर संबंध आहे किंवा कसें? असल्यास तो स्पष्ट करून दाखवा.

१६०. नीति अथवा सद्वर्तन कशास ह्मणतात? मुलांमध्यें सत्यशीलता उत्पन्न करण्यास पंतोजीनें काय केलें पाहिजे तें सविस्तर सांगा.

१६१. सृष्ट पदार्थविषयक पाठ शिकवितांना कोण कोणत्या गोष्टींचा विचार केला पाहिजे? तांबें याविषयीं पाठ शिकविणें असेल तर त्याकरितां तुम्ही आपल्या जवळ टिपण कसें करून ठेवाल?

१६२. चांद्रमास व सौरमास यांविषयीं मुलांस माहिती सांगावयाची आहे ती कशी सांगाल तें सविस्तर सांगा.

१६३. खालीं लिहिलेलें वाक्य कसें शिकवाल तें सांगा.

"पदार्थांचे ठायीं निरनिराळी प्रसरणशीलता असते, ती त्यांच्या अवयवांत कमजास्त प्रमाणानें स्नेहाकर्षण असल्यामुळें असते, ह्यास्तव नेहमीं स्थितिस्थापक गुण ज्यांत राहतो, असे जे वायुरूप पदार्थ, त्यांमध्यें प्रसरणशीलतेचा कमजास्तपणा असावयाचा नाहीं."

१६४. इंग्लंडची राज्यपद्धति मराठी चौथ्या पुस्तकांत दिलेल्या माहितीवरून शिकवावयाची आहे ती कशी शिकवाल तें शिकवून दाखवा.

१६५. तुह्मी पुढील विषय कोणत्या रीतीनें शिकवाल तें लिहून दाखवाः—

१ हिंदुस्थानचा भूगोल. २ व्याकरणांतील शब्दांच्या जाति.
३ तोंडचे हिशोब.

१६६. पुढें लिहिलेली कविता कशी शिकवावी तें लिहून दाखवाः—

सुगंधें जी टाकी सकलहि दिशा व्यापुनि निजें ॥
अपूर्वा कांतीतें निरखुनि जियेच्या मन रिझे ॥
अशी होई भोगक्षम कमलिनी तों भ्रमर हा ॥
विदेशातें जाई विधि अदय कैसा तरि पहा ॥ १ ॥

१६७. पुढें लिहिलेली कविता तिसऱ्या इयत्तेच्या वर्गास कशी शिकवावी तें लिहून दाखवाः—

आस ही तुझी फार लागली ॥
दे दयानिधे बुद्धि चांगली ॥
देउं तूं नको दुष्ट वासना ॥
तूंच आवरीं माझिया मना ॥ १ ॥

१६८. "पहिल्यानें विशेष उदाहरण सांगून नंतर त्यावरून सामान्य नियम समजावून द्यावा," हा नियम स्पष्ट करून सांगा.

१६९. खालीं लिहिलेली कविता कशी शिकवावी तें लिहून दाखवा:—

तो अंगराग चिरकाळ तसाचि ओला ॥
यत्सौरभीं भ्रमरपंक्ति सदैव लोला ॥
घ्राणेक्षणांसि म्हणती कुसुमें हि डोला ॥
वेणी नवी च न सतीयश शक्य बोला ॥ १ ॥

१७०. खालीं लिहिलेली कविता कशी शिकवाल तें लिहून दाखवा:—

"इतर जे मळ, संतापाचें मूळ ॥ धुऊनी सकळ टाका ते ही ॥१॥
जैसे जैसे आह्मी, प्रौढ वया येऊं ॥ भरूनीयां जाऊं प्रेमानंदें" ॥ २ ॥

१७१. मुंबई इलाख्यांतील आगगाडीच्या रस्त्यांविषयीं मुलांस माहिती सांगावयाची आहे ती कशी सांगाल तें लिहून दाखवा ?

१७२. पुढें लिहिलेली कविता चवथ्या इयत्तेच्या वर्गास शिकवावयाची आहे असें समजून ती कशी शिकवाल तें लिहून दाखवा ?

दया-मेघा देवा द्रवसि तरि संताप शमती ॥
कराया वृष्टीतें प्रभु तुज असे काय कमती ॥
प्रभो विश्वाधारा जरि पतित मी मंद कुमती ॥
तरी जाणें त्यांतें फलसि तुज जे मंद नमती ॥ १ ॥

१७३. विद्यार्थ्यांचे मनांतले विचार ओळखून कसें शिकवावें तें एक दोन व्यावहारिक उदाहरणें घेऊन स्पष्ट करून दाखवा.

१७४. "कोठें जाल उभेरे मत्स्येश्वरधेनुपश्यतोहर हो ॥
सोडा गोधन नाहीं तरि वधिन तुम्हांसि वश्य तो हर हो"॥

ही आर्या मुलांस समजेल अशा रीतीनें शिकवा.

१७५. चार वर्षांपासून सहा वर्षांच्या वयांच्या मुलांस तुम्ही कसें शिकवाल तें सांगून एक उदाहरण घेऊन कसें शिकवाल तें लिहून दाखवा.

१७६. "लक्ष्यलक्षणसंगति" म्हणजे काय? दरएक विषय या धोरणानें शिकविणें झाल्यास तो कसा शिकवावा तें एक उदाहरण घेऊन दाखवा.

१७७. पुढें लिहिलेला अभंग दुसऱ्या इयत्तेच्या वर्गास कसा शिकवाल, तें लिहून दाखवा.

देवापरिस मोठा नाहीं जगीं कोणी ॥ ऐसें सत्य मानीं सर्वकाळ ॥ १ ॥
समर्थ जो देव त्यास चुकवूनी ॥ अन्याय करूनी जाल कोठें ॥ २ ॥

१७८. हिंदुस्थानची राज्यपद्धति मुलांस शिकवावयाची आहे ती शिकवून दाखवा.

१७९. भांडवलाचा धडा मुलांनीं एकवार वाचला आहे; त्याची माहिती त्यांस चांगली करून द्यावयाची आहे, ती कशी द्याल?

१८०. शिक्षणाचा खरा पाया कोणता तें सांगून शिक्षण लावण्यांत कोणतीं तत्वें ध्यानांत ठेविलीं पाहिजेत तें सविस्तर सांगा.

१८१. मुलांची स्मरणशक्ति वाढविण्यासाठीं कोणत्या गोष्टी अवश्य आहेत तें सांगून ती शक्ति राखण्याकरितां तुम्ही कोणते उपाय योजाल?

१८२. नीतीचीं साधनें कोणतीं तीं सविस्तर सांगा.

१८३. मुलांस सत्य बोलण्याची सवय कशी लावाल तें सविस्तर सांगा.

१८४. पाठांच्या टांचणापासून काय उपयोग होतो तें सांगून कारागिरीच्या पदार्थांच्या पाठांचीं टांचणें कशीं कराल व त्यांचा उपयोग शिकविण्याच्या कामांत कसा कराल तें सांगा.

१८५. "गुरुत्वाकर्षण" हा विषय मुलांस शिकवावयाचा आहे तो कसा शिकवाल तें सांगा.

१८६. शिक्षणपद्धतीचे किती प्रकार आहेत तें सांगून प्रत्येकापासून होणारे तोटे व नफे कोणते आहेत याचें निरूपण करा.

१८७. वस्तुदर्शनपाठ म्हणजे काय व त्यांपासून कोणते फायदे होतात तें सांगा.

१८८. जेव्हां शिक्षक मुलांस शिकवितांना त्यांस एखाद्या गोष्टीचीं

अथवा दृष्टिविषयाचीं कारणें शोधावयास लावतो, तेव्हां तो कोणत्या शिक्षणपद्धतीचा उपयोग करितो, तें खुलासेवार सांगा.

१८९. भूमिति शिकविल्यापासून मुख्य दोन फायदे होतात ते कोणते तें सांगा, व क्रमिक व क्रमविरुद्ध सिद्धता यांतील भेद स्पष्ट करून सांगा.

१९०. लहान मुलांस शिकवितांना त्यांचीं कोणतीं इंद्रियें तुह्मी व्यापृत व विकसित कराल, तें सकारण सांगा.

१९१. शिक्षण ( वळण लावणें नव्हे ) ह्मणजे काय तें सांगा आणि खऱ्या शिक्षकाचें कर्तव्यकर्म कोणतें तें खुलासेवार सांगा.

१९२. फ्रोबेल साहेब कोण होते ? त्यांनीं कोणती शिक्षणपद्धति सुरू केली व तीपासून फायदे कोणते ?

१९३. पाठांच्या टांचणांचीं सामान्य तत्वें सांगा.

१९४. सिंहाचा पाठ शिकवितांना असा प्रश्न विचारिला कीं त्यास त्याच्या कळ्यापासून काय उपयोग होतो ? या प्रश्नाचें उत्तर मुलांस कदाचित् देतां येणार नाहीं, व तें त्यांपासून तर काढून घ्यावयाचें आहे, तें तुह्मी कसें काढून घ्याल ?

१९५. वस्तुदर्शन पाठ म्हणजे काय ? अशा पाठांपासून कोणते फायदे होतात ? "पाण्यांत विरघळणारे व न विरघळणारे पदार्थ," हा पाठ शिकवावयाचा आहे तो कसा शिकवाल ?

१९६. **बालोद्यान** अथवा **शिशुशिक्षणपद्धति** म्हणजे काय? ती प्रथम कोणीं, कोठें व कधीं शोधून काढिली आणि ती हल्लीं कोठें प्रचारांत आहे? या पद्धतीपासून होणारे मुख्य फायदे कोणते? या पद्धतीचा उपयोग एखादा पाठ शिकवून दाखवा.

१९७. पाठांच्या टांचणांपासून शिक्षकांस व विद्यार्थ्यांस काय फायदे होतात तें सांगून **शिष्टजनचरित्रपाठांचीं** टांचणें तयार करा व त्यांचा उपयोग एखादा पाठ शिकविण्यांत करून दाखवा.

१९८. पदार्थांचें ज्ञान होण्याचीं साधनें सांगून त्यांचा उपयोग **पदार्थदर्शन**पाठांमध्यें कसा होतो तें सांगा. पदार्थदर्शनपाठ सर्व मुलांस सारखे शिकवितां येतील किंवा नाहीं तें सकारण सांगून

**साखरेविषयीं** माहिती, पहिली व चौथी इयत्ता शिकणाऱ्या मुलांस सांगावयाची आहे ती कशी सांगाल?

१९९. **घन पदार्थांचें विशिष्टगुरुत्व** हा पाठ मुलांस सप्रयोग शिकवावयाचा आहे तो कसा शिकवाल.

२००. **नैतिक** व **बौद्धिक** शिक्षण म्हणजे काय? **बौद्धिक** शिक्षणांत **नैतिक** शिक्षणाचा समावेश होतो किंवा नाहीं, तें सविस्तर सांगा. तुम्हांस आपल्या शाळेंत **नैतिक शिक्षण** देणें असेल तर तुम्ही तें कसें द्याल? मुलांस **खरें** बोलण्याची संवय लावणें असेल तर ती कशी लावाल?

२०१. शिक्षकांचें मुख्य कर्तव्य कर्म सांगून तुह्मी लोकप्रिय होण्याकरितां काय कराल तें ही सांगा.

२०२. कोणत्या मुलांस लोकलफंड देणारे तुम्ही ह्मणाल?

२०३. लेखन व वाचन तुह्मी कसें शिकवाल?

२०४. हल्लींचा शिक्षणक्रम मुलांस सद्वर्तन लावण्याचे कामीं किती उपयोगी आहे? तो अधिक उपयोगी करण्याकरितां काय तजवीज केली पाहिजे?

२०५. "मुलांस सद्वर्तन लावणें तें शाळेंतच लाविलें पाहिजे," हें कसें तें सांगा. याविषयीं लाकसाहेबांचा कसा अभिप्राय होता तो सांगा.

२०६. मुलांस नीतिशिक्षण लावण्याकरितां तुह्मी काय तजविजी योजाल तें सविस्तर सांगा.

२०७. खनिज पदार्थांविषयीं किंवा लढाईविषयीं पाठांचीं टांचणें कशीं कराल तें सांगून त्यांचा उपयोग एक उदाहरण घेऊन करून दाखवा.

२०८. **पदार्थांची स्थितिस्थापकता** याविषयीं पाठ सांगावयाचा आहे. तो कसा सांगाल?

२०९. मुलांस शिक्षण देण्याचा मुख्य हेतु, त्यांस **द्रव्यार्जनक्षम** करणें, हा आहे, असें कित्येकांचें मत आहे. ह्या मताच्या सत्यासत्यतेविषयीं तुमचा काय अभिप्राय आहे तो सकारण सांगावा.

२१०. हल्लींच्या शिक्षणक्रमांत तुमच्या मतें कोणती उणीव आहे? तीपासून कोणते घातक परिणाम होतात व ते कसे टाळतां येतील?

२११. मुलें ज्या कारणांनीं असत्याचरण करणारीं होतात तीं कारणें सविस्तर सांगून तीं तुम्ही कशीं दूर कराल तें सांगा.

२१२. नैतिकगुणविषयक पाठांचीं टांचणें कशीं कराल तें सांगून त्यांचा उपयोग "परोपकार" याविषयीं पाठ शिकवितांना करून दाखवा.

२१३. घन पदार्थांचें विशिष्टगुरुत्व याविषयीं पाठ शिकवावयाचा आहे, तो कसा शिकवाल?

२१४. "बालोद्यानपद्धति" हें नांव कशावरून पडलें तें सांगून त्या पद्धतीचें थोडें वर्णन करा.

---